


नोंदणी क्रं. एफ.१६०१४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत






## आचार्य भागवत जन्मशताब्दी विशेषांक व 'नवभारत' विचारधारा

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

अतिथी संपादक
देवदत्त दाभोलकर

एप्रिल - मे - जून - जुलै २००३






अनुक्रमणिका



## आचार्यांची विविध रूपे

आचार्यांच्या तथाकथित उग्र रूपाचा अनुभव मला कधी आला नाही. कदाचित केव्हा कधी ओझरता आलाही असावा. कारण काही दिवसापूर्वी निमा (निर्मला जोशी-पाटकर) मला म्हणाली, 'मला लहानपणची एक घटना अजून आठवते. कशावरून तरी तुमचे आणि आजोबांचे संभाषण तापले होते. निघताना तुम्ही म्हणालात, 'बघ, तुझ्या आजोबांना मी रागावू शकतो की नाही.'

मला तर ही घटना पुसटशी देखील आठवत नाही. माझे स्मरण अखंड स्नेहधारेचे आहे.



यशोदा भागवत यांच्या 'बोलका कॅमेरा' ग्रंथातून ांच्या सौजन्याने उपलब्ध झालेल्या फोटोशेजारी त्यांची पणी अशी आहे.

"श्री. पु. भागवत यांच्या सांगण्यावरून, १९६९-७० । सुमारास केलेलं, व्यक्तिचित्रणामधलं माझं हे पहिलं काम. टो पाहताना मनात येतं, की फोटोग्राफीचं तंत्रशुद्ध शिक्षण मी लं होतं खरं, पण केवळ त्या आधारे एवढे 'बोलके' फोटो । येतात का?... उत्तर येतं, 'नाही, कधीच नाही.'

खरं तर, फोटो पाहून माझं मलाच नवल वाटत होतं. मधले बाराच्या बाराही फोटो उत्तम आले होते. (त्या वेळी 'याशिका मॅट' वापरत होते.) आचार्य भागवतांचं नशील, परिपक्व नि संपन्न व्यक्तिमत्त्व त्या प्रत्येक मध्ये स्पष्ट उमटलं होतं."



विनोबाजींच्या बाबत वर्ध्याचे प्रा. दे. ज. हातेकर एकदा सांगत होते, 'एके दिवशी पहाटे फिरत फिरत विनोबा । घरी आले. त्यांना प्रत्यक्ष माझ्या दारात उभे पाहून मी र्यचकित झालो. विनोबा म्हणाले, 'अरे, पूर्वीचा विनोबा आता विनोबाचा प्रेमयोग सुरू झाला आहे.'

आचार्यांनाही मी त्यांच्या प्रेमयोगाच्या कालखंडात ... तील तीन फोटोही निमाने मला नुकतेच दिले. ... होती हेही मला








प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५७ । अंक ७-८-९-१० । एप्रिल-मे-जून-जुलै २००३
चैत्र-वैशाख-ज्येष्ठ-आषाढ, शके १९२५
वार्षिक वर्गणी २०० रुपये.
या अंकाची विशेष किंमत रु. ८०/-

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक सहमत असतीलच, असे नाही.

## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल असा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
कार्यकारी संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री. ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकाचा मंडळाच्या "नियतकालिकांचा स्थायी निधी" योजनेत समावेश केला असला तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच, असे नाही.

अनुक्रमणिका

## लेखक परिचय

| | | |
|---|---|---|
| तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | : | अध्यक्ष, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई. |
| अ० के० भागवत | : | संपादक, आचार्य भागवत संकलित वाङ्मय. |
| माधवराव बागल | : | कोल्हापूर संस्थान प्रजा परिषदेचे प्रमुख नेते. |
| वि० म० बेडेकर | : | पहिले कार्यकारी संपादक, नवभारत. |
| मे० पु० रेगे | : | माजी संपादक, नवभारत. |
| देवदत्त दाभोलकर | : | 'नवभारत'शी दीर्घकाल संबंधित. **पत्ता** : 'शान्तिनिकेतन' ४३, गुरुकृपा हौ. सो., शाहूनगर, गोडोली, सातारा - ४१५००१. दूरध्वनी (०२१६२) २२०३७८ |
| निर्मला जोशी पाटकर | : | कर्मवीर हिरे महाविद्यालय, मौनी विद्यापीठ, गारगोटी जि. कोल्हापूर येथे मराठीच्या प्राध्यापक. |
| वि० रा० करंदीकर | : | रामकृष्ण-विवेकानंद, राष्ट्रीय स्वयंसेवक संघ आदि विषयांवर लेखन. **पत्ता** : मृगशीर्ष, क्षिप्रा सहनिवास, कर्वेनगर, पुणे - ४११०५२ |
| वसंत पळशीकर | : | माजी संपादक, नवभारत. **पत्ता** : ३२२ व, मधली आळी, लौकिक सदन वाई, जि. सातारा - ४१२८०३ |
| स० मा० गर्गे | : | समाजविज्ञान कोशाचे संपादक. **पत्ता** : १२०५/४, 'ज्ञानेश', शिवाजीनगर, पुणे - ४११००४. |
| विश्वास नाईकनवरे | : | रॉयवादी विचारसरणीतील प्रमुख. **पत्ता** : सकाळनगर, बाणेर रस्ता, औंध, पुणे - ४११००७ |
| डॉ० शं० रा० तळघट्टी | : | प्राध्यापक, तत्त्वज्ञान विभाग, पुणे विद्यापीठ |

## ऋणनिर्देश


१. या अंकातील बहुतेक लेख 'नवभारत'च्या पूर्वीच्या अंकांतून व आचार्य भागवत यांच्या 'जीवन-चिंतन' या ग्रंथातून घेतलेले आहेत.

२. श्री. माधवराव बागल यांचा लेख 'साधना' साप्ताहिकाच्या जानेवारी १९७३ च्या अंकातून घेतला आहे.

३. प्रा. देवदत्त दाभोलकर यांचा लेख समाजप्रबोधन पत्रिकेतून (फेब्रुवारी १९७३) घेतला आहे.

४. डॉ. वि. रा. करंदीकर यांचा लेख त्यांच्या 'वेध ऋणानुबंधाचा' या ग्रंथातून घेतला आहे.

५. प्रा. अ. के. भागवत यांचा लेख महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ प्रकाशित 'आचार्य भागवत संकलित वाङ्मय' (संपादक : प्रा. अ. के. भागवत) या ग्रंथातून घेतला आहे.

६. छायाचित्रे निर्मला जोशी-पाटकर यांच्या संग्रहातून व यशोदा भागवत (३, वेस्ट व्ह्यू, नप्पू रोड, दादर (पूर्व) मुंबई - ४०००१४) यांच्या 'बोलका कॅमेरा' या ग्रंथातून घेतली आहेत.

**या सर्वांच्या सौजन्यासाठी त्यांचे आभार.**


अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका












# अतिथी संपादक : हृद्गत

आचार्य सखाराम जगन्नाथ भागवत
यांचा जन्म : २६ एप्रिल १९०३
निधन : ८ जानेवारी १९७३

२६ एप्रिल २००३ हा त्यांचा जन्मशताब्दी दिन.

या संपादकीयाचाच एक भाग म्हणून मलपृष्ठावरील आवाहन पहावे.

'नवभारत' मासिकाच्या काही विलंबित अंकांचे अतिथी संपादक म्हणून संपादन करण्याची जवाबदारी मी स्वीकारली आहे. त्यानुसार हा आचार्य भागवत जन्मशताब्दी विशेषांक प्रथम प्रकाशित होत आहे. आचार्य भागवत यांचे भावनिक व वैचारिक ऋण मी मानतो. त्यामुळे हा विशेषांक सिध्द करण्यात मला असा सहभाग देता येत आहे याचे मला एक आगळेवेगळे समाधान आहे.

'नवभारत' मासिक सुरू झाल्यानंतर दोन-तीन वर्षांतच आचार्यांचा आणि माझा संबंध आला. वाचक म्हणून आणि नंतर लवकरच लेखक म्हणूनही. आचार्य भागवत यांचा आणि माझा प्रत्यक्ष परिचय त्याच संबंधात व त्याच सुमारास झाला. प्रा० वि० म० बेडेकर हे त्या काळात 'नवभारत'चे कार्यकारी संपादक होते. सौम्यशीतल व अत्यंत दक्ष. त्यांच्याकडे लेखन पाठवले आणि लागलीच त्यांचे उत्तर आले नाही असे कधी झाले नाही. १९४८ ते १९५३ मी पुण्यात फर्ग्युसन महाविद्यालयात होतो. प्रा० बेडेकर यांच्या घरी दर महिन्याला 'नवभारत'च्या पुण्यातील समविचारी लोकांची चहापानाची बैठक होत असे. तिला मी जात असे. गं० बा० सरदार, दि० के० बेडेकर, स० बा० कोगेकर, अ० रा० कामत, आदि त्या ठिकाणी नियमितपणे असत. पुण्यात असत त्यावेळी आचार्य भागवतही असत.

कोल्हापूरचा कोरगावकर ट्रस्ट त्याकाळी दरवर्षी दोन-तीन दिवसांचे एक वैचारिक संमेलन आयोजित करीत असे. तेथेही हा परिचय वाढत गेला. त्या संमेलनाला शंकरराव








देव, जे० पी० नाईक, चित्रा नाईक, माधवराव वागल, अ० भि० शहा, ग० प्र० प्रधान, वसंत नारगोळकर व कुसुम नारगोळकर, मे० पु० रेगे, भा० शं० भणगे, बाबा आमटे, साधना आमटे, अण्णासाहेब सहस्रबुद्धे, वसंत पळशीकर आदि मंडळी येत. तीन दिवस हा विचार-उत्सव असे. एवढ्या व अशाच मंडळींपुरता मर्यादित असा तो असे. प्रभाकरपंत कोरगावकर याचे आयोजन अगत्याने, सुजाण श्रोत्याची भूमिका घेऊन पार पाडीत असत. एकही मुद्दा त्यांच्या नजरेतून सुटत नसे परंतु ते कधीही आपले मौन सोडत नसत.

अशा पद्धतीने आचार्य भागवत आणि मी यांचा परिचय वाढत गेला व त्याला नंतर कौटुंबिक उत्कटतेचे रूप प्राप्त झाले. त्याचे काही प्रत्यक्ष अप्रत्यक्ष दर्शन या अंकात अनेक ठिकाणी आढळेल म्हणून त्याचा अधिक तपशील येथे देत नाही.

या विशेषांकाच्या रचनेविषयी विचार करताना असे वाटले की यात आचार्यांचे व त्यांच्याविषयी इतरांचे काही लेखन तर येईलच परंतु 'नवभारत'ची विचारधाराही सामान्यपणे या अंकात प्रतिबिंबित व्हावी. शंकरराव देव, आचार्य भागवत, शं० द० जावडेकर व ह० कृ० मोहनी हे तर 'नवभारत'चे संस्थापक सदस्य. त्यांच्या विचारधारांचे दर्शन यात असावे, त्याचप्रमाणे प्राज्ञपाठशाळा मंडळाकडे 'नवभारत' दिल्यानंतरच्या कालखंडातील संपादकांच्या विचारधारांचे काही दर्शनही प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष स्वरूपात या विशेषांकात यावे.

प्राज्ञपाठशाळेकडे 'नवभारत' देण्यात आले व प्राज्ञपाठशाळा मंडळाने ते स्वीकारले यालाही काही विशेष अर्थ आहे. प्राज्ञपाठशाळा मंडळाची प्रारंभापासूनची वैचारिक वैठक विधायक धर्मपरिवर्तनासाठी सखोल धर्माध्ययनाची व तदनुसार सामाजिक प्रवोधनाची. 'नवभारत'च्या कालखंडात तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी प्राज्ञपाठशाळा मंडळाचे अध्यक्ष होते. त्याचप्रमाणे ते व त्यांचे मित्र गोवर्धन पारीख यांचा व मानवेंद्रनाथ रॉय यांचा निकटचा परिचय होता. त्या दोघांनीही रॉय यांची नवमानवतावादाची विचारसरणी आत्मसात केलेली होती. प्राज्ञपाठशाळा मंडळाकडे येण्यापूर्वीच्या नवभारताची धर्मविषयक भूमिका व प्राज्ञपाठशाळा मंडळाची भूमिका या परस्पर पूरकच होत्या. परंतु गांधीजी आणि रॉय यांच्याविषयीच्या भूमिकांविषयी असे म्हणता येणार नाही. परंतु तरीही त्या विचारभिन्नतेची अडचण 'नवभारत'ला कधी वाटली नाही. याला वैचारिक समन्वयाची प्रवृत्ती म्हणावे की वैचारिक साक्षेपाचा अभाव असे म्हणावे हा ज्याच्या त्याच्या रुचीचा प्रश्न आहे. मला यात वैचारिक समन्वयाची प्रवृत्ती दिसते. कारण माझी स्वतःची मनःप्रकृती वैचारिक संदिग्धतेची व (त्यामुळेही कदाचित्) वैचारिक समन्वयाची आहे. ('नवभारत'ला साजेसे हे क्लिष्ट वाक्य झाले असेल अशी मला आशा आहे. 'शतकातले निःसंदिग्ध अर्थहीन विधान' असा त्याच निर्देश सुजाण वाचक करू शकतील. असो.)

अंकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लेखाची जबाबदारी त्या त्या लेखकाची असते अशी 'नवभारत'ची प्रारंभापासूनची भूमिका आहे. हे संपादक, कार्यकारी संपादक व अतिथी संपादकांनाही लागू आहे. परंतु या अंकाच्या स्वरूपाची व रचनेची जबाबदारी मला विशेषत्वाने व एकट्यानेच स्वीकारली पाहिजे.

नवभारत हे मुक्त विचाराचे व्यासपीठ व समाजप्रबोधनाचे साधन व्हावे अशी प्रारंभापासूनची कल्पना आहे. 'नवभारत'ला अजूनही या आद्य प्रेरणेत रस आहे व त्या दृष्टीने करता येण्यासारखेही खूप आहे.

त्याविषयी, संधी मिळेल त्याप्रमाणे पुढे केव्हा तरी.

चर्चेच्या ओघात आचार्य भागवत मला एकदा म्हणाले होते :

'हे पहा. हे जग काही आपण निर्माण केले नाही. त्यामुळे त्याची जबाबदारी आपल्यावर नाही. हे जग काहीसे तरी अधिक चांगले कसे होईल हे पाहणे एवढीच आपली जबाबदारी आहे परंतु तेवढी मात्र आहेच आहे.'

'परंतु, तेवढी मात्र आहेच आहे'<br>
हे त्यांचे शब्द<br>
सतत साथ करीत असतात<br>
व करीत राहतील.

**- देवदत्त दाभोलकर**

# हृदयेन अपराजितः

देवदत्त दाभोलकर

आचार्य गेले !

ज्या व्यक्तीच्या नावाच्या मागे 'आचार्य' या पदवीने सार्थ अभिमानाने मिरवावे ती स. ज. भागवत या नावाची व्यक्ती निघून गेली.

निघताना त्यांनी आपल्याला अन्याय केला असे वाटावे अशा तातडीने आचार्य निघून गेले.

हे दुःख आता निरंतर अंतःकरणात वागवावे लागणार आहे.

'इदं ब्राह्मं इदं क्षात्रम्' याचा प्रत्यय ज्याच्या केवळ दर्शनातही मिळत असे असा एक महान जीवनसाधक आपली साधना पुरी करून निघून गेला.

ही साधना त्यांनी जीवनभर अखंड चालविली होती व कोणत्याही क्षणी ती पूर्ण करण्याची त्यांनी आपल्या मनाची सिद्धता ठेवलेली होती.

यात कोणत्याही कसोटीच्या क्षणी कणभरही उणे पडताना मी त्यांना कधी पाहिले नाही. सांगलीला काही वर्षांमागे अचानक छातीतून पुनरपि रक्तस्राव सुरू झाला त्या वेळी नाही किंवा फुप्फुसाच्या शस्त्रक्रियेसाठी घटप्रभेला ऑपरेशन टेबलवर जात असतानाही नाही. सहज गावी जाताना निरोप घ्यावा तशा पद्धतीने व सुहास्य मुद्रेने त्यांनी हात वर केला होता.

'जाबार दिने' ही रवींद्रनाथांची आचार्यांची आवडती अशी कविता होती.

ही कविता त्यांनी मला समजावून सांगितली होती आणि तिचा अनुवाद माझ्याकडून करवून घेतला होता.

अखेर जायच्या दिनी गीत हेच एकसे
जीवनात पाहिले लाधले अमोलसे
खुले प्रकाशसागरी सहस्रपद्म शोभन
मधुप मुग्ध मी असे धन्य धन्य जीवन
अखेर जायच्या दिनी गीत हेच गाउ दे
अखेर जायच्या दिनी भाव हाच राहु दे

विश्ववाटिकेत या अमूप खेळ खेळता
नेत्र भरुनि साजिरे अरूप रूप देखता
सुदूर स्पर्शही कुणा नसो तदीय लाभला
मदीय रोमरोमि हा संचरोनि राहिला
या क्षणीच व्हायचा असेल अन्त होउ दे
हेच गीत गात मज इथून जाउ दे

अशी ही कविता आहे.

आचार्यांना अंतकाली काही क्षण जी शारीरिक वेदनेची कळ सोसावी लागली असेल, त्या वेदनेच्याही आत रवींद्रनाथांच्या या गीतातील भाव त्यांच्या अंतःकरणात जागे राहिले असतील याविषयी माझ्या मनात शंका नाही. या वृत्तीची सहजसाधना त्यांनी केलेली होती.

ही साधना सोपी नव्हती. ही करीत असताना त्यांना जीवनातील कितीतरी दुःखे अनुभवावी लागली होती, रिचवावी लागली होती.

रवींद्रनाथांनीच कालिदासाविषयीच्या त्यांच्या एका कवितेत म्हटले आहे :

'जीवनातील आघात, दुःखे काय तुला कधी सहनच करावी लागली नसतील ? परंतु ती दुःखे तू आपली आपण सहन केलीस आणि आम्हाला मात्र तुझ्या कलेचे आनंदकमल देऊन गेलास.'

आचार्यांनी सर्व काही सहन केले. प्रतिक्षणी ज्या व्याधीविषयी जागरूक राहिले पाहिजे अशी शारीरिक व्याधी ते जवळजवळ चार दशके वागवीत राहिले. गेल्या दशकात शारीरिक दुर्बलतेमुळे आपल्या सामाजिक कार्यक्षेत्राचा झालेला संकोच त्यांना शांतपणे सहन करावा लागला.

परंतु या दोहोंविषयी त्यांच्याकडून एकही उद्वेगाचा उद्गार अनेक वेळा त्यांच्याशी निकटचे संभाषण होऊनही मी कधी ऐकला नाही.

असा उद्गार त्यांनी कधी काढला नाही याची जाणीव आज मला व्हावी, याचे मलाच राहून राहून आश्चर्य वाटते. आचार्यांच्या सहजवृत्तीमुळे हे इतके स्वाभाविक वाटत गेले की, कधी हे काही विशेष आहे हे लक्षातच आले नाही. परंतु या

अनुक्रमणिका







सहजवृत्तीमागे किती आंतरिक सामर्थ्य उभे असले पाहिजे याची आज तीव्रपणे जाणीव होत आहे.

आचार्य अत्यंत रागवत असत असे मी त्यांच्या तारुण्यकालातील अनेक निकटवर्तीयांकडून ऐकले आहे. परंतु त्यांच्या-माझ्या गेल्या दोन तपांतील परिचयात आणि काही निकटच्या सहवासात त्यांना खऱ्या अर्थाने रागावलेले असे मी फार तर एकदोनदाच पाहिले आहे. परंतु त्यांच्या रागालोभाची मूळ धार तीव्र असली पाहिजे हे सहज जाणवण्यासारखे असे.

विनोबाजींनी साने गुरुजींच्याविषयी काढलेल्या उद्‌गारांचाच वापर करता येईल -

'त्यांचे रागलोभ तीव्र होते, परंतु ते देवाच्या चरणी वाहिलेले होते.'

कोणतीही व्यक्तिगत ईर्षा, असूया, महत्त्वाकांक्षा त्यांच्या पाठीमागे नसे.

खरे तर देवदेखील नसे.

आचार्यांना मी कधीही एकटे असे देवाच्या प्रार्थनेला बसलेले पाहिले नाही. सामुदायिक प्रार्थनेत सहभागी होताना अनेकदा पाहिले आहे.

देव, धर्म, भारतीय संस्कृती या कल्पनांतील मांगल्य त्यांना प्रिय होते. परंतु त्या कल्पनांच्या कठोर कर्कश मर्यादाही त्यांनी ओळखल्या होत्या. आणि या कल्पनेतील मांगल्याविषयी ते जितक्या उत्साहाने बोलत असत तितक्याच हिरीरीने या मर्यादांवर तुटूनही पडत.

आणि त्यांच्या बुद्धीचा व भावनेचा हा असा अप्रतिहत संचार जीवनाच्या सर्वच क्षेत्रांत चालू असे.

अध्यात्म, तत्त्वज्ञान, कला, वाङ्मय, शास्त्र, राजकारण, अर्थकारण, समाजकारण अशा अनेकविध क्षेत्रांत त्यांना सखोल जाण होती; उत्कट रसही होता. कारण मानवी जीवन हेच त्यांच्या उत्साहाचे, चिंतनाचे विषय होते. 'Nothing that is human is alien to me' ही त्यांची मनोमन प्रतिज्ञा होती.

या जीवनरसधारेने महाराष्ट्रातील अनेक जीवने भिजविली आहेत; अनेक संस्था फुलविल्या आहेत.

आचार्यांचा वारसा जतन करावयाचा आहे.

'Generation gap' ज्याने कधी आपल्या जीवनात निर्माणच होऊ दिली नाही - स्वत्व सोडले नाही, परंतु नवीनाशी बौद्धिक व भावशील अनुबंध सतत राखला, अशा महान् दुर्लभतम आचार्यांचा हा वारसा आहे.

कालमान्य, राजमान्य, लोकमान्य अशा सामान्य रहस्य जाणणाऱ्या टीकेच्या मर्यादा ओलांडून अकृत्रिम अभिजात रसिकतेचे भान असलेल्या मर्मज्ञ रसिकाचा हा वारसा आहे.

मंगल परंपरा कृतज्ञतेने स्वीकारा, अमंगल ते निर्धाराने झिडकारा, प्रत्येक व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाच्या संपूर्ण विकासाला वाव मिळेल अशी समाजरचना निर्माण करा, असे आवर्जून व आग्रहाने सांगणाऱ्या कृतिशील प्रवोधनकाराचा हा वारसा आहे.

सुखं वा यदि वा दुःखं प्रियं वा यदि वाऽप्रियम् ।
प्राप्तं प्राप्तमुपासीत हृदयेनापराजितः ।।

हा तो वारसा आहे.

१९७३)





**जाबार दिने ?**

आचार्यांचे आकस्मिक निधन झाले त्यावेळी मी बांगलादेशाकडे गेलो होतो. परतताना जळगाव येथे ते वृत्त प्रथम मला समजले.

आचार्य मला एकदा म्हणाले होते : 'माझ्या दोन इच्छा आहेत. एक मृत्यूच्या वेळी बुद्धी सतेज असावी आणि शेवटी तुम्ही जवळ असावे.'

या वेदनेची छाया माझ्या वरील लेखनातील प्रारंभीच्या वाक्यांत आहे.

'जाबार दिने' या रवींद्रनाथांच्या कवितेचा भावानुवाद तर मी त्यांच्या आग्रहावरूनच केला होता; आणि तो त्यांना अतिशय रुचला होता.

अंतिम सावध क्षणी त्यांची भावना तशीच होती असणार या विषयी माझ्या मनात काहीही शंका नाही. कारण त्यांच्या जीवनाचा प्रत्येक क्षण त्याच भावनेने भारलेला असे.

- देवदत्त दाभोलकर (२००३)







अनुक्रमणिका

# आचार्य भागवत माझे गुरू ! मार्गदर्शक ! सल्लागार व मित्र

भाई माधवराव बागल

आचार्यांचे - माझे संबंध आले ते माझे परम मित्र प्रभाकरपंत कोरगावकर यांच्यामुळे. त्यांनी निर्माण केलेल्या ट्रस्टमुळे. प्रभाकरपंत स्वतः तसे फारसे शिकलेले नव्हते. विद्याव्यासंगी नव्हते. पण त्यांनी संग्रह केला तो महाराष्ट्रातील नामवंत विद्याव्यासंगी शेलक्या विद्वानांचा. त्यागी पुढाऱ्यांचा. आपले धन या सेवकांना सेवाभावे देऊन त्यांच्या जीवनाला व ध्येयाला स्वास्थ्य देण्याचा प्रयत्न त्यांनी केला. गोळा केलेल्या विद्वन्मालिकेतील कौस्तुभमणी होते आचार्य भागवत व आचार्य शंकरराव जावडेकर. गांधीवादी थोर पुढारी शंकरराव देव, एस. एम., गोरे, रावसाहेब पटवर्धन, केदारनाथजी, हरिभाऊ जोशी, जे. पी. नाईक वगैरे. त्या सर्वांच्या बैठकी व्हायच्या. त्या आचार्यांच्या गडगडाटाने हादरून जायच्या. त्यानंतर शंकरराव जावडेकरांच्या शीतल पर्जन्यवृष्टीने, शांत - शीतल वाणीने मंत्रमुग्ध व्हायच्या आणि या सर्वांचा समन्वय मोजक्या संयमी भाषेत व्हायचा शंकरराव देवांच्या समारोपात.

पण आचार्यांच्या प्रेमळ स्वभावाची, माणुसकीची, सेवाभावाची खरी ओळख झाली ती प्रभाकरपंतांच्या निवासस्थानी त्यांच्यासाठी खास व्यवस्था केलेल्या खोलीत. शंकरराव जवळच्याच खोलीत कॉटवर आजारी पडलेले होते. त्या वेळी मला आचार्यांच्या सेवाभावाची - मैत्रीची पुरी पुरी कल्पना आली. किती निःसीम प्रेम शंकरराव देवांवर ! कोण अभिमान. वाग्युद्ध सुरू झाले म्हणजे वाटे जणूं हाडवैरी; पण खोलीत शंकरराव आजारी असताना आचार्यांना पाहिले असते तर जणू नर्स. मातेने मुलाची सेवा करावी ती सारीसारी आचार्यांनी शंकररावांची केली. सर्व व्यवहार अंथरुणावर करावे लागत. आचार्यांनी जणू मी अर्भकाची सेवा करतो या भावनेने ती करावी. शंकररावांना असा दुसरा मित्र जगात मिळणे दुर्मिळ. आता शंकरराव एकाकी पडले. त्यांचा प्रेमाचा आधार तुटला ! प्रेम कसे करावे, मित्रासाठी कसे झिजावे - ते मला शिकवले आचार्यांनी.

आचार्य कोरगावकरांच्या घरातच राहत होते; त्या वेळी मी त्यांची बहुधा रोज भेट घेई. अभ्यासाशिवाय, प्रयत्नाशिवाय, ज्ञानाचा लाभ मिळण्याचा सोपा उपाय मला सापडला होता. आचार्य व भाऊसाहेब खांडेकर या दोन्ही व्यक्ती जवळ असल्यामुळे ग्रंथसंग्रहालयाकडे जाण्याची मला पाळीच यावयाची नाही. निरनिराळ्या विषयांची विनासायास माहिती मिळे. वाचनाने परिपक्व झालेली त्यांची मते मला ऐकायला मिळत. त्यांच्या सल्ला मसलतीचा मला फायदा मिळे. साहित्यात, राजकारणात, सामाजिक, धार्मिक बाबतीत तसे अगदी घरगुती बाबतीतही. आचार्यांना मी माझे गुरू मानत आलो. ते मला मित्र समजत. बरोबरीच्या नात्याने वागत, व वयाने मी बराच मोठा म्हणून वडीलकीचा मान देत.....

माझ्या 'जीवनप्रवाह' या आत्मचरित्राच्या प्रकाशनार्थ केशवराव भोसले थिएटरमध्ये तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या अध्यक्षतेखाली समारंभ झाला. त्या वेळी आजचे नामदार माझे परम मित्र र. के. खाडिलकर, एस. एम. जोशी, वि. स. खांडेकर वगैरे प्रमुख मंडळी आली होती. त्यांची भाषणे झाली. त्यानंतर र. के. खाडिलकर माझ्यावरच्या लोभामुळेच म्हणाले, 'माधवराव हे राजकारणी मुत्सद्दी नव्हेत. ते भावनाप्रधान आहेत. म्हणून ते अनेक वेळा फसले आहेत; लोक त्यांना फसवतात. अन् आपला फायदा तेवढा करून घेतात.'

आचार्यांना हे शब्द लागले; मला लागले नव्हते. म्हणून ते भर सभेत र. के. च्यावर भडकले. केशवराव थिएटर त्यांनी आपल्या आवाजाने, आवेशाने, आवेगाने, वक्तृत्वाने, व विद्वत्तेने भारून टाकले ! मेघांच्या गडगडाटाप्रमाणे एक एक शब्द श्रोत्यांच्या कानांवर आदळत होता. भाषणाच्या गतीबरोबर श्रोत्यांच्या भावना उचंबळून येत होत्या. सर्वांचे चेहरे खुलले होते.

'वाः ! वाः ! खाशी केलीत' असे उद्‌गार श्रोत्यांच्या मुखाद्वारे बाहेर पडले.

सात्त्विक संतापाचा तो स्फोट होता. वृद्ध जमदग्नीचा भास होत होता; पण केवळ तात्त्विक. त्यात व्यक्तिद्वेषाचा लवलेशही नव्हता. ते स्नेहसंमेलन होते. ज्यांच्यामुळे एवढे वादंग उठले ती व्यक्ती समारंभासाठी अगत्यानं पुण्याहून आली.







अनुक्रमणिका

होती. दोघेही माझे मित्र. पण या निमित्ताने 'भावना व बुद्धी' यावरच आचार्यांचे प्रवचन ऐकायला मिळाले. ते म्हणाले, "भावनेशिवाय बुद्धीला सामर्थ्य नाही. भावना म्हणजे अंतःकरण. अंतःकरणाचा ओलावा नसेल तर बुद्धीचा प्रभाव पडत नाही. भावना आणि बुद्धी या जीवनाच्या प्रमुख शक्ती. त्यात लहान कोणाला म्हणावे हा प्रश्नच आहे. यशस्वी जीवनाला दोघांची गरज असते. पण भावना श्रेष्ठ शक्ती मानावी लागेल. भावनेतून जीवनाला गती मिळते. बुद्धीचे काम गतीचे नियंत्रण करण्याचे असते. भावना हे इंजिन म्हटले तर बुद्धी ही सुकाणू ठरेल. एका अर्थाने बुद्धीलाही समर्थ करण्याचे काम भावनाच करते. यामुळे निवड करण्याचा प्रसंगच प्राप्त झाल्यास जीवनाच्या दृष्टीने मी भावनेलाच पसंत करीन !"

या अखेरच्या वाक्यावर टाळ्यावर टाळ्या पडू लागल्या. त्यांच्या भाषणाने, मजवरच्या प्रेमाने, व प्रभावी वाणीने मी गहिवरून आलो. आचार्य म्हणजे स्वतः भावना व बुद्धीचा गोड संगम, याची प्रचीती आली. आचार्यांच्या प्रेमामुळे मी कायमचा जिंकलो गेलो. आपुलकी, आपुलकीतून जिव्हाळा, जिव्हाळ्यातून मैत्री, मैत्रीतून स्वभावाची व विद्वत्तेची दालने उघडली - व त्यात मी जाऊन वसलो. त्यांचा आजार मला एका अर्थी उपकारक ठरला. त्यामुळे नेहमीचा सहवास घडला. घरोबा जमला.

माझ्या 'जीवनप्रवाहा'वर त्यांनी उत्कृष्ट अभिप्रायाची किती तरी पाने लिहिली आहेत. माझ्या एका पुस्तकास पडसाद हे त्यांनीच नाव दिले, व विस्तृत प्रस्तावना लिहिली. 'अशी होती संस्थानी राजवट' या लघुकथांची निवड आचार्यांनीच केली.

मला आचार्यांत भावनेचे भांडार सापडले, त्याहूनही मोठे विद्वत्तेचे भांडार उघडले. पण मला जिंकले ते मुख्यतः भावनेने.

ज्या आचार्यांनी भारतीय महतीच्या 'आधुनिक भारत' या ग्रंथराजाला प्रस्तावना लिहिली. त्यांनी माझ्या 'पडसाद' या पुस्तकाला प्रस्तावना लिहिली, हा मान मला 'पद्मभूषण'हून मोठा वाटतो. आचार्यांनी मला भावनेने जिंकले आणि अचानकपणे, अगदी अनपेक्षित, आचार्य गेले ही बातमी ऐकताच मी अगदी कोलमडून कॉटवर अश्रू ढाळत पडलो ! वयाहून लहान; पण माझ्याहून किती श्रेष्ठ ! त्यांना प्रणाम !



### नव्या महाराष्ट्राची जीवननिष्ठा

जन्मजात वर्ण - कल्पनेने महाराष्ट्र समाज बुद्धिहीन, पौरुषहीन आणि संपत्तिहीन झालेला आढळतो. अशा समाजात परस्परांविषयी अविश्वास, मत्सर, द्वेष इ. हीन वृत्तींचे साम्राज्य माजले तर त्यात आश्चर्य नाही. ज्या समाजात प्रत्येक व्यक्तीला अंगच्या गुणांचा विकास करण्याची संधी मिळणार नाही, तो समाज स्वतःचा नाश करणाऱ्या उपद्व्यापातच गुरफटून जाणे स्वाभाविक आहे. कोणालाही ब्राह्मणत्वाचे गुण संपादण्याची संधी जातिभेदाने नाकारली, इतकेच नव्हे तर ब्राह्मण म्हणविणाऱ्या अनेक जातींचेही संघटन वा एकीकरण या जातिकल्पनेने होऊ दिले नाही. यामुळे ब्राह्मण म्हणविणाऱ्या महाराष्ट्रातील असंख्य जातींनी खोट्या उच्चनीचतेच्या कल्पनेच्या आहारी जाऊन परस्परांचा मत्सर करण्यात, एकमेकांचा विनाश करण्यात आपल्या सामर्थ्याचा अपव्यय केला. गुणांच्या जोरावर क्षत्रिय होण्याची संधी देखील याच जातिकल्पनेने मिळू दिली नाही. इतकेच काय, ब्राह्मणांप्रमाणेच क्षत्रिय म्हणविणाऱ्या अनेक जातिउपजातींनी परस्परांचा द्रोह करण्यातच पुरुषार्थ मानला. हीच गोष्ट महाराष्ट्रातील वैश्य वर्गालाही लागू आहे. येथल्या वैश्यांचा महाराष्ट्रीयेतर वैश्यांशी विवाहसंबंध न झाल्यामुळे वैश्य वर्गातील विविध गटांचे संघटन व संवर्धन, होऊ शकले नाही.

चातुर्वर्ण्याच्या समाजशास्त्राने महाराष्ट्राची या रीतीने सर्व प्रकारची हानी केलेली आहे. चातुर्वर्ण्याच्या नावाने पोसलेली जातिसंस्था महाराष्ट्राने आपल्या जीवनातून संपूर्णपणे नष्ट करण्याची प्रतिज्ञा केली पाहिजे. समाजातील प्रत्येक घटकाला आपल्या प्रकृतीला अनुसरून आपला विकास करण्याची संधी समानत्वाने मिळाली पाहिजे. समाजविकासासाठी आपल्या सद्गुणांचा विनियोग करण्याचा संस्कार म्हणजे समाजधर्म होय. या धर्मात जन्माधिष्ठित जातिसंस्थेला स्थान नाही आणि भिन्न भिन्न सद्गुणांमध्ये श्रेष्ठ-कनिष्ठ असा भावही मानता येणार नाही. समाजविकासाला उपयोगी पडणारे सारे सद्गुण नैतिकदृष्ट्या समान योग्यतेचेच मानले पाहिजेत. नव्या महाराष्ट्राने जीवनाची ही नवी निष्ठा समाजाच्या सर्व व्यवहारात दाखल केली पाहिजे. या निष्ठेला अनुकूल होणारे संस्कार सतत परिश्रमाने महाराष्ट्रीय जनतेत रुजविले पाहिजेत. जातिविहीन समाज हे नव्या महाराष्ट्राचे ब्रीदवाक्य केले पाहिजे.

**- आचार्य भागवत**
(संकलित वाङ्मय खंड १)

# स्मृतीची चाळिता पाने... पाणावती लोचने

निर्मला जोशी - पाटकर

"माझ्या बुद्धिवादाचा कर्कश खडक फोडून ज्या कोणाला पलीकडे जाण्याची संधी मिळते त्याला माझ्या भावजीवनाचा प्रत्यय येतो, आणि त्याचा मजविपयी वरीलप्रमाणे गैरसमज होत नाही...."

आजोबांनीच म्हटल्याप्रमाणे त्यांच्या बुद्धिवादाचा कर्कश खडक फोडून त्यापलीकडे जाण्याची संधी मला मिळाली. त्यामुळे मी स्वतःला फार भाग्यवान समजते. नि त्यामुळेच त्यांच्या कडक नि कठोर सहवासापेक्षा मला तरी त्यांचा प्रेमळ सहवासच घडला. 'वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि' अशा माझ्या आजोबांचे मला मात्र 'मृदूनि कुसुमादपि' हेच दर्शन सतत घडले. माझ्या आईच्या मृत्यूनंतर ते माझी साक्षात आईच बनले व मी त्यांच्या अधिक जवळ गेले ! माझ्याशी यावावतीत वोलताना कितीतरी वेळा ते गहिवरले आहेत. माझ्या पत्रांना उत्तरे देताना "तुझे पत्र वाचताना माझे नेत्र अनेक वेळा भरून आले व तुझ्या दुःखाशी सहभागी झालो. तुझे पत्र पुन्हा एकदा चार वाजता वाचले त्यावेळीही जवळजवळ तोच अनुभव आला." असेही उल्लेख वरेच आहेत. नि मग वाटतं, 'एवढा कर्कश-कठोर माणूस एवढा हळवा होऊ शकतो ?' त्यांच्या मृत्यूनं मी आईचाच मृत्यू पुन्हा एकदा अनुभवला ! त्यामुळेच आता अधिक व्याकुळ व्हायला होतं.

आजोवांएवढी मी मोठी नाही. स्थितप्रज्ञ तर नाहीच नाही. त्यामुळेच त्यांच्याविपयीच्या माझ्या भावना आठवणी-रूपाने शव्दवद्ध करायला मी पूर्णतः असमर्थ आहे ! मनातील भावनांपुढे लिहिले गेलेले शव्द रुक्ष, मूल्यहीन व विचित्रच वाटतात. प्रकट झालेले शव्द मनातील भावना यथार्थपणे व्यक्तच करू शकत नाहीत. कारण आम्हा दोघी वहिणींची ते 'आई' होते ! आईचं स्मरण शव्दात नि कसं करायचं ?

आम्हाला दोघींना आमच्या आईच्या मृत्यूच्या दुःखातून त्यांनीच वाहेर काढलं - आईच्या मायेनं आमच्या भावनांना जपत जपत त्याकडे बुद्धिवादाने पाहण्याची दिव्य शिकवण देऊन ! नि आज...! आज त्यांनीच दिलेली शिकवण त्यांच्याच मृत्यूच्या दुःखात आठवून त्यांच्याच शिकवणुकीप्रमाणे मनाला शांत नि स्थिर ठेवण्याची वेळ आली आहे ! त्यासाठी मला आलेल्या त्यांच्याच पत्रातील विचारांचे हे स्मरण...

२१-७-७१ "विव्हलता येणे व काही कालाने नाहीशी होणे या चक्राकार अनुभवाचे वर्णन तू दिले आहेस ते वाचून फार कौतुक वाटले. आधुनिक मानसशास्त्राने या चक्राचा उलगडा केलेला आहे. माणसाचे 'अवोध मन' म्हणून फार महत्त्वाचा भाग आहे. त्याची ही सर्व क्रिया असते. आपले जीवन त्यामुळेच सुसह्य होत असते व प्रगती करीत राहते. या अवोध मनाचेही बुद्धीच्या तटस्थपणे निरीक्षण करता येणे शक्य असते व अशा त्रयस्थ निरीक्षणाने विव्हलता कमी होत जाते व शेवटी अगदी नाहीशीही होते. मला आशा आहे की तू आपल्या परीने या बुद्धी शक्तीचा उपयोग करू शकशील व या चक्राचा तुला उच्छेदही करिता येईल."

११-१२-७१ "आयुष्य हे असेच क्लेशदायक घटना घडवून आणते. त्यावेळी आपल्या खऱ्या विवेकशक्तीचा उपयोग कसून करावयाचा असतो. आईच्या मृत्यूमुळे तुझ्या मनावर खूपच आघात झाला आहे हे मला मान्य आहे. याही स्थितीतून तू धैर्याने पार पडशील असा मला विश्वास आहे. अशा घटना घडतात त्यावेळी माणसाच्या बुद्धीचे, कर्तृत्वाचे काही चालत नाही. पण अशाही वेळी आपले धैर्य प्रयत्नाने टिकवावेच लागते... आपली संकल्पशक्ती दृढ करणे हाच एक मार्ग यावेळी तुझ्यापुढे आहे. तो आचरण्याचे सामर्थ्य मिळविलेच पाहिजे. यावेळी अगदी हताश होता कामा नये. मला आशा आहे की, तुझी तूच स्वतःला सावरत राहशील."

२५-२-७२ "व्यक्तिगत पातळीवर दुःखाचे औषध केवळ काल हेच आहे. पण तात्त्विक व वैश्विक पातळीवर मृत्यूचे उत्तर निराळे मिळते व त्यामुळे माणसाची शुद्धी होते. सायन्स, आर्ट, मॉरल्स, मिस्टिसिझम इ. मार्गांनी व्यक्तिगत जीवनातून माणूस वैश्विक जीवनात प्रवेश करू शकतो. म्हणून






मृत्यू अथवा दुःख हे माणसाला कल्पक वनविण्यासाठी विधात्याने योजिलेले एक अपूर्व रसायन आहे. ते पचविलेच पाहिजे."

"सारेच जीवन हे सत्य-ज्ञानासाठी आहे. सत्य हे फार विविध व विरोधी अंगांनी नटलेले आहे. यासाठी आपली नेहमीच तर्कमार्गाने गेल्याने फसगत होते व अपेक्षाभंगामुळे व्याकुलता व संताप प्राप्त होतात. हेही एक शिक्षणच आहे असे मानल्यासच शांती लाभू शकते. ती तुला मिळावी अशी माझी इच्छा आहे. तुला शिक्षणशास्त्राचे अध्ययन करण्याची ही एक 'दारुण' संधी मिळाली असे समजून वाग.

"Good & Evil हे एक द्वंद्व आहे. Beyond Good & Evil परमसत्य असते. Evil चा दाहक अनुभव त्या परमसत्याकडे नेण्यास विशेष उपकारक असतो. मात्र ते Evil पचविले पाहिजे.

"आईचे सतत स्मरण होते हे साहजिकच आहे व योग्यही आहे. एकलेपणाची - रितेपणाची तीव्र जाणीव अशावेळी होणारच. तरी देखील आईची स्मरणे वुद्धीने व प्रेमभावनेने पाहत राहावे. पराभूत न होता दुःखावर विजय मिळविण्याचाच तो मार्ग आहे. दुःखाच्या तीव्र आघाताच्या वेळी देखील आपली बुद्धी जागृत ठेवण्याचा प्रयत्न करावा. हाच खरा स्थितप्रज्ञ होण्याचा मार्ग आहे. ... आपली चिंतनशीलता वाढवावी म्हणजे आपले प्रश्न सुटत जातात. मृत्यूचाही विचार करावा. त्याची जीवनातील अपरिहार्यता समजून घ्यावी. हाच मृत्यूवर विजय मिळविण्याचा उपाय आहे."

"माणसाला केव्हातरी दुःख भयंकर रूपाने भेटतेच. मृत्यू हे दुःखाचे सर्वात भयंकर स्वरूप आहे. त्या मृत्यूला शांतपणाने, धैर्याने व अस्तिक्य बुद्धीने स्वीकारण्यातच माणसाचा अध्यात्मिक उद्धार असतो."

❖❖❖

**निमाचे सांत्वन**

तिची आई सुशीला हिच्या अकाली निधनानंतर.

श्री

c/o गांधी भवन
कोथरूड, पुणे ४
२९.८.६९
रविवार सकाळी

चि. निमा नाईक हिस उदंड
आशीर्वाद,

तुझें ता. [illegible] चें कार्ड १९
ला उपासनी भवनावर [illegible] आले [illegible]
[illegible]

विरहदुःख येणे व कांही काळाने नाहीसे होणे, या चमत्कार अनुभवाचें वर्णन तू केलें आहेस तें वाचून फार कौतुक वाटलें. आधुनिक मानसशास्त्रात या चमत्काराचा उलगडा केलेला आहे. माणसाचें 'अबोध मन' म्हणून फार महत्त्वाचा भाग आहे त्याची ही सर्व क्रिया असते. आपले जाणीव रहित च सूक्ष्म होत असते व [illegible] राहाते. या अबोध मनाचें हि बुद्धीच्या [illegible] निरीक्षण करणे येणे शक्य असतें व उत्तरोत्तर स्व-

निरीक्षणाने विरहदुःख कमी होण्याचे व शेवटी अगदी नाहीसेहि होणे. मला आशा आहे की तू आपल्या परीने व पुढे शक्तीचा उपयोग करूं शकशील व या चमत्काराचा [illegible] हे कारणें [illegible].

निमा ही आचार्यांची ज्येष्ठ भगिनी यशोदा जोशी यांचे जामात र० ग० जोशी यांची कन्या.

अनुक्रमणिका








# आचार्य भागवत

## संवेदनशील स्थितप्रज्ञ

वि० रा० करंदीकर

अखेर आचार्य कोणाला काही न सांगता गेले. त्यांच्याबद्दल निरतिशय आदराची भावना बाळगणारी कितीतरी मंडळी पुण्यात आहेत. आचार्यांच्या विशेष लोभाला पात्र असलेल्या अशाही व्यक्ती आहेत. पण कोणाचाच निरोप न घेता आचार्यांनी आठ जानेवारी १९७३ या दिवशी परलोकी प्रयाण केले. सर्वसामान्य शिष्टाचाराची जी एक प्रखर जाणीव त्यांच्या वर्तनात आढळत असे. तिच्याशी हे सुसंगत नाही. एखाद्याकडे थोडा वेळ गेले, तरी व्यक्तीचा, एवढेच नव्हे, तर घरातील गृहिणीचाही हसतमुखाने निरोप घेतल्याखेरीज आचार्यांचे पाऊल बाहेर पडत नसे. अशा पृष्ठभूमीवर कोणाचाही निरोप न घेता आचार्यांनी काळाच्या पडद्याआड असे कायमचे अंतर्धान पावणे हे अनपेक्षित वाटते. कोथरूडच्या पलीकडे असलेल्या गांधीभवनाच्या आवारातील एका छोट्याश्या जागेत अलीकडे काही वर्षे आचार्य एकटेच राहत असत. अनेक वेळा ते गावात येत आणि सारा दिवस कोणाकडे तरी घालवल्यावर संध्याकाळच्या सावल्या अंधुक होण्याच्या सुमारास आपल्या मठीकडे एकटेच परत जात. आयुष्याची संध्याकाळ झाल्यावर मानव प्राण्यांनी गजबजलेल्या या मृत्युलोकातून उठून आचार्य अगदी तसेच निजधामी गेले, घराच्या एका खोलीतून उठून दुसऱ्या खोलीत जावे तितक्या सहजपणे. पण जातेवेळी आपल्याशी दोन शब्द बोलण्याची संधी कोणाला न देता गेले, एवढी रुखरुख त्यांच्या निकटवर्तीयांच्या मनात राहून गेली.

अखेर केव्हातरी असेच काहीतरी होणार, ही कल्पना मनाला नव्हती असे नाही. कमी - अधिक छत्तीस वर्षे आचार्यांच्या शरीरात रोगाने ठाण मांडलेले होते. त्या मानाने त्यांना जे जवळजवळ सत्तर वर्षांचे आयुष्य लाभले, ते कमी म्हणता येत नाही. घटप्रभेचे विख्यात धन्वंतरी डॉ. माधवराव वैद्य यांनी आचार्यांच्या फुप्फुसावर दहा वर्षांपूर्वी एक शस्त्रक्रिया केली होती. "त्यानंतर जे काही आयुष्य लाभलं आहे, त्याचं सारं श्रेय माधवरावांना आहे", असे आचार्य म्हणत असत. अनेक वेळा मनात येते, काहीएका किमान शारीरिक आरोग्याचा लाभ झाला असता, तर आचार्यांच्या हातून केवढे कार्य झाले असते व समाजाचे केवढे हित झाले असते. पण तसा योग नव्हता. दुर्धर अशा रोगाशी चाललेल्या तीन तपांच्या झुंजीचा विचार करता आचार्यांच्या जीवनाचा हा आकस्मिक अंत अनपेक्षित म्हणवत नाही. पण वर्षानुवर्षे शरीराची अशी विकल अवस्था असूनही आचार्य ज्या प्रसन्नतेने सगळीकडे वावरत असत, ते पाहिले म्हणजे मन केवळ विस्मयचकित होत असे. आपल्या वृत्तींना जे एक विचारपूर्वक वळण त्यांनी लावले होते, त्यातच त्यांच्या या यशाचे रहस्य शोधावे लागेल.

### विचारांचे जग

वरवर पाहता आचार्य आपणा सर्वांच्या बरोबर व्यवहारात वावरत असले, तरी विचारांचे जग हेच त्यांचे खरेखुरे जग होते. त्या जगातच ते सदैव विहार करीत असत. कोणत्याही विषयाबद्दल एखादा नवा विचार कोणी मांडलेला आढळला की, त्यांचे मन तिकडे आकृष्ट होत असे. आचार्यांचे हे विचारविश्व अनेक विषयांच्या विस्तीर्ण प्रदेशात पसरलेले होते. देशकालाची बंधने तर त्यांना नव्हतीच, पण विशिष्ठ विचारप्रणालीची आग्रही झापडेही उरलेली नव्हती. बर्ट्राण्ड रसेलच्या विचारविश्वाचा आढावा असो किंवा गौतम बुद्धाच्या तत्त्वज्ञानाचे परिशीलन असो, जपानमधील सर्वधर्मपरिषदेपुढे वाचला जाणारा हिन्दुधर्मविषयक निबंध असो किंवा महाराष्ट्रात गेल्या शतकात झालेल्या प्रबोधनाचा मागोवा असो, मर्ढेकरांच्या कवितेतील नवीनता असो किंवा माधव ज्यूलियनच्या चरित्राविषयीचे संशोधन असो, तात्यासाहेब केळकरांच्या व्यक्तिमत्त्वाचा शोध असो किंवा काकासाहेब खाडिलकरांच्या नाटकांतील संगीताचे वैशिष्ट्य असो, अशा कोणत्याही विषयामध्ये मानवी बुद्धीने केलेला मुक्त संचार पाहताना आचार्यांचे मन निखळ आनंदात बुडून जात असे. त्या विचाराचे परीक्षण किंवा मूल्यमापन हा भाग त्या वेळी त्यांच्या दृष्टीने गौण असे, निदान नंतरचा असे. त्यांचा खरा आनंद असे तो ही की, विचारांच्या क्षेत्रात काहीतरी घडले आहे, मानवी बुद्धीने एखादा छोटासा का होईना पण ज्ञानाचा प्रदेश पादाक्रांत केला आहे. एखाद्या विषयावर नवा ग्रंथ बाहेर पडला,

अनुक्रमणिका

तर ती आचार्यांच्या दृष्टीने मोठीच महत्त्वाची बातमी असे. सर्व विषयांबाबतचे त्यांचे कुतूहल नेहमी जागे असे. रोजचे वृत्तपत्र सकाळी दारात येऊन पडले की, आचार्य लागलीच उठून ते हातात घेत. देशात आणि परदेशात काय घडले आहे यावर तर त्यांची दृष्टी जाईच, पण त्यावरोबर अग्रलेख कोणत्या विषयावर आहे किंवा त्याच्या शेजारच्या लेखात कोणत्या विषयाचा परामर्श घेतलेला आहे, हे ते तितक्याच उत्सुकतेने पाहत असत. एवढ्याने भागत नसे. स्थानिक कार्यक्रमांवरूनही त्यांची दृष्टी फिरे. चित्रपटांचा शौकीन असलेला एखादा तरुण विद्यार्थी जितक्या उत्सुकतेने गावात कोणता नवा चित्रपट लागला आहे हे पाहील, तितक्याच उत्सुकतेने दररोज होणाऱ्या व्याख्यानांची नोंद आचार्य पाहत. एखादे व्याख्यान ऐकण्यासाठी ते गांधीभवनपासून सहासात किलोमीटर दूर असलेल्या साहित्य परिषदेत, शिक्षणशास्त्रसंस्थेच्या सभागृहात, केसरीच्या ग्रंथशालेत, किंवा फर्गसन महाविद्यालयात हौसेने येत असत. विचारांच्या जगात वावरण्याचा हा आनंद घेण्यातच स्वातंत्र्यानंतरची पंचवीस वर्षे आचार्यांनी घालवली होती.

'स्वातंत्र्यानंतरची' असे मुद्दामच म्हटले, कारण त्यापूर्वीच्या आयुष्यात आपल्या या आवडत्या विश्वात मुक्तपणे संचार करण्यास त्यांना पुरेसा वेळच मिळाला नव्हता. महात्माजींची असहकाराची हाक आल्यावरोवर १९२१ - मध्ये महाविद्यालयाला रामराम ठोकून आचार्यांनी राष्ट्रीय चळवळीत उडी घेतली, तेथपासून १९४७ च्या पंधरा ऑगस्टला स्वातंत्र्य प्राप्त होईतो त्यांच्या जीवनात राजकीय चळवळीला पहिले स्थान होते व इतर साऱ्या गोष्टी दुय्यम होत्या. प्रकृतीच्या दृष्टीने त्यांनी तुरुंगात जाणे इष्ट नाही, असा वैद्यकीय सल्ला मिळाला असताही त्यांनी तो धुडकावून लावला होता. पण आंदोलनाच्या काळातही त्यांची वैचारिक विश्वाकडची ओढ लपून राहिली नाही. त्या धांदलीतही त्यांचे वाचन चालू असे आणि तुरुंगात असताना बरोबरीच्या सहकाऱ्यांना व्याख्यानांच्या द्वारा नाना विषयांवर ज्ञान देण्याचे त्यांचे काम अव्याहत चालू असे. कितीएक बुद्धिमान तरुणांचा वैचारिक पिंड त्यांनी घडवलेला आहे. आजही त्यांचे ते ऋण कृतज्ञपणे सांगणारी माणसे भेटतात. आचार्यांच्या अशा प्रवृत्तीमुळे राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्यात त्यांचे मन विशेष रमले. मान्य अशा विद्यापीठाची कोणतीही पदवी प्राप्त करून घेतली नाही. पण ज्ञानाची लालसा व अध्यापनातील कुशलता या त्यांच्या गुणांमुळे 'आचार्य' ही उपाधी त्यांच्या नावामागे कायमची चिकटली. ते त्यांचे बिरुद त्यांना सर्वार्थाने शोभत होते.

विचारांच्या अमूर्त विश्वात वावरणारी माणसे एक तर रुक्ष होतात किंवा समाजापासून दूर जातात. पण आचार्यांच्या बावतीत या दोन्ही गोष्टी घडल्या नाहीत. याचे कारण बुद्धीइतकाच भावनेचा धर्मही त्यांच्या ठिकाणी जागा होता आणि विचारांची आवड असली, तरी माणसांबद्दल त्यांना एक खरीखुरी जिवंत अशी आस्था होती. किंवहुना त्यांचा सारा विचारप्रपंच मानवसापेक्ष होता. त्यामुळेच भावनेच्या जगाला ते पारखे झाले नव्हते. स्वतःचा संसार त्यांनी कधी केला नाही, पण सर्वसामान्य प्रापंचिक माणसाला ज्या साध्या साध्या गोष्टी हव्याशा वाटतात, त्या सर्वांमध्ये आचार्यांचे मन मोठ्या जिव्हाळ्याने समरस होत असे. प्रापंचिक जीवनातील छोट्या छोट्या आनंदाच्या क्षणांची त्यांनी कधी हेटाळणी केली नाही. कोणाचा विवाह तर कोणाचा वाढदिवस, कोणाची साठी तर कोणाच्या नातवाचे बारसे, अशा अगदी घरगुती कार्यक्रमांत आचार्य मनापासून भाग घेत. त्यांचे एकंदर व्यक्तिगत जीवन, त्यांनी पत्करलेली काही व्रते किंवा ते धारण करीत तो वेष, या साऱ्या गोष्टी सर्वसामान्य लौकिक जीवनाच्या प्रवाहाशी विसंगत होत्या. पण आपल्या प्रत्यक्ष वागण्यात त्यांनी तशी विसंगती कधी भासू दिली नाही. याचे कारण एकच की, ते मनाने संन्यस्त असले तरी वृत्तीने रसिक होते. आणि हे सारे ते किती उत्साहाने करीत ! त्यामुळे त्यांचा सहवास म्हणजे नेहमीच चैतन्याने ओतप्रोत भरलेला अनुभव असे. या चैतन्यशीलतेच्या जोडीला त्यांच्या वृत्तीतील निर्मळ अशी प्रसन्नता असे. अशा साऱ्या वैशिष्ट्यांमुळे आचार्यांचा सहवास हा सर्वांना मोह घालीत असे.

प्रसन्नतेला बाध यावा, अशा कितीतरी गोष्टी आचार्यांच्या जीवनात आरंभापासून त्यांची साथ करीत आल्या होत्या. प्रखर अशी बुद्धिमत्ता असूनही ध्येयवादाच्या उर्मीपोटी त्यांना उच्च शिक्षणाचा लाभ घेता आला नाही. मनात नसताना त्यांना विवाहबंधनात पडावे लागले आणि त्यातही त्यांच्या वाट्याला काहीशी वंचनाच आली. पत्नीच्या आणि मुलाच्या एकापाठोपाठ घडलेल्या मृत्यूमुळे जणू नियतीनेच त्यांची त्यातून सोडवणूक केली. पण संसारातील जिव्हाळ्याच्या अशा नाजूक नात्यामुळे मिळणारे प्रेम त्यांना कधी मिळाले नाही. ऐन पस्तिशीत शरीरात रोगाचा प्रादुर्भाव झाला. त्या रोगाने एक सततचे दुःख तर उत्पन्न केलेच, पण निष्ठेने स्वीकारलेल्या देशसेवेच्या कार्यातही त्यामुळे विक्षेप उत्पन्न झाला. निरामय आरोग्य असे पुन्हा कधी लाभले नाही, त्यामुळे जीवनातील साध्यासाध्या आनंदानाही ते पारखे झाले. आजारीपणामुळे






अनेक वेळा आठवडेच्या आठवडे त्यांना बिछान्यावर पडून सक्त विश्रांती घ्यावी लागली, एवढेच नव्हे, तर नित्याच्या आयुष्यातही त्यांना हे विश्रांतीचे पथ्य सांभाळावे लागत असे. पण यातील कोणत्याही कारणामुळे कटुतेचा, विषादाचा किंवा वैफल्याचा एवढासाही स्पर्श त्यांनी मनाला होऊ दिला नाही. अशा या साऱ्या परिस्थितीत आचार्यांच्या दृष्टीने भाग्याची गोष्ट एकच होती की, शरीर इतर अंगांनी कितीही दुर्बल झालेले असले, तरी त्यांची बुद्धी अखेरपर्यंत सतेज राहिली होती. आपल्याला काय लाभलेले नाही, याची खंत त्यांनी कधी मानली नाही. बरेचसे हरपल्यावरही आपल्या हाताशी काय आहे त्याची जाणीव त्यांनी राखली. अर्धाच भरलेला जो आपल्या जीवनाचा पेला आहे, त्यात काय साठवलेले आहे ते त्यांनी पाहिले आणि त्याचा आनंद पुरेपूर लुटला. हा त्यांचा आनंद बुद्धीचा विषय असलेल्या ज्ञानात व विचारात साठवलेला होता.

### आचार्य आणि यथार्थदीपिका

विचारांच्या क्षेत्राबद्दल आचार्यांना ही जी आस्था होती, तीमुळेच त्यांचा आणि माझा परिचय होण्याचा योग आला. हा परिचय झाला असे म्हणण्यापेक्षा तो त्यांनी आपणहोऊन करून घेतला, असे म्हणणे अधिक योग्य होईल. आचार्यांची प्रकृती बरी नव्हती म्हणून त्यांना भेटण्यासाठी १९६१ मध्ये केव्हातरी प्रा. दाभोलकर सांगलीहून घटप्रभेस असलेल्या कर्नाटक आरोग्यधाममध्ये गेले, तेव्हा केवळ एक कुतूहल म्हणून मी त्यांच्या बरोबर गेलो. रुग्णालयाचे संचालक डॉ. वैद्य तेव्हा आचार्यांवर उपचार करीत होते. किर्लोस्कर, स्त्री आणि मनोहर या सुप्रसिद्ध मासिकांच्या संपादकपदावरून निवृत्त होऊन श्री. शंकरराव किर्लोस्कर किर्लोस्करवाडीहून घटप्रभेस राहावयास आले होते. आरोग्यधामच्या आवारात त्यांनी स्वतःसाठी एक छोटेसे टुमदार घर बांधले होते. काँग्रेस सेवादलाचे संस्थापक डॉ. नानासाहेब हर्डीकर हे आपल्या सार्वजनिक कामामधून वयोमानानुसार बाजूला होऊन तेथे राहत होते. आचार्यही बराच काळ तेथे असत. डॉ. माधवराव वैद्य हे धंदेवाईक डॉक्टर नव्हते, त्यांचा काही ध्येयवाद होता. यापैकी प्रत्येकाजवळ ज्याचे त्याचे वैशिष्ट्यपूर्ण अनुभवाचे भंडार होते. आचार्य रुग्णशय्येवर होते, तरी या सर्वांशी त्यांच्या चालणाऱ्या काव्यशास्त्रविनोदात कोणतीही कमतरता येत नव्हती. या सर्वांच्या सहवासात नुसते असण्यानेही आपल्या वैचारिक विश्वात काही मोलाची भर पडत असल्याचा अनुभव आला.

त्या ओढीपोटी मी नंतरही चारपाच वेळा घटप्रभेला गेलो. या भेटी अर्थातच एका दिवसापुरत्या असत. पुढे विश्रांती घेण्याच्या निमित्ताने आचार्य सांगलीला दाभोलकरांकडे एक आठवडाभर राहण्यासाठी आले. डॉक्टरेटचा अभ्यास करण्याच्या निमित्ताने मी वामनपंडिताच्या यथार्थदीपिकेवर प्रबंध लिहिला आहे, हे दाभोलकरांकडून आचार्यांना बोलताबोलता समजले होते.

विलिंग्डन महाविद्यालयाच्या आवारात दाभोलकरांच्या घरापासून जवळच माझे निवासस्थान होते. एके दिवशी सकाळी आचार्य स्वतः होऊन माझ्याकडे आले, तेव्हा मला अतिशय नवल वाटले. आचार्य जावडेकर आणि शंकरराव देव यांच्या बरोबरीने आचार्य भागवतांचे नाव मी वयाच्या सतराव्या अठराव्या वर्षापासून ऐकत आलो होतो, त्याला एव्हाना वीस वर्षे उलटून गेली होती. या सर्वांबद्दल माझ्या मनात आदरभाव होता. जावडेकरांचा 'आधुनिक भारत' हा ग्रंथ मी बारकाईने वाचलेला होता. आचार्यांनी आपल्या घरी यावे असे त्यांना म्हणण्याइतकाही अधिकार आपल्याला नाही, अशी माझी धारणा होती. एवढी विद्वान आणि नामवंत व्यक्ती आपण होऊन आपल्या घरी यावी, याचा मला फार आनंद वाटला. यथार्थदिपिकेवरील प्रबंधाच्या कुतूहलापोटी आचार्य आले होते. तो सारा अभ्यास मी कसा केला ते तर त्यांनी मला विचारलेच, तेवढ्यावर ते थांबले नाहीत. माझी सारी कौटुंबिक माहिती त्यांनी विचारून घेतली, अगदी मी शिक्षण कसे घेतले तेथपासून तो मला भावंडे किती आहेत येथपर्यंत. माझे दोन धाकटे भाऊ त्या वेळी महाविद्यालयीन शिक्षणासाठी माझ्याकडे राहिले होते, कदाचित त्यामुळेही त्यांनी ती माहिती विचारली असावी. त्यांच्या चौकस वृत्तीचा हा मला आलेला पहिला अनुभव. त्या पहिल्याच भेटीत ते माझ्याकडे चांगले दोन तास बसले होते. अकराशे टंकलिखित पृष्ठे असलेला माझा प्रबंध त्यांनी पाहिला आणि तो वाचण्यासाठी म्हणून घेऊन गेले.

दीडपावणेदोन महिने उलटले आणि आचार्यांचा मला निरोप आला, म्हणून मी कोल्हापूरला त्यांना भेटावयास गेलो. तेथे लोहमार्ग स्थानकाच्या समोर असलेल्या कोरगावकरांच्या प्रशस्त घरात माडीवरील एका खोलीत ते तेव्हा राहत होते. ही भेट दोन तासांहून अधिक वेळ चालली. आचार्य प्रबंधातील विवेचनाबद्दल बोलत होते. तपशिलात जाऊन अनेक प्रश्न त्यांनी मला विचारले, काही मुद्यांची चर्चा केली. त्यांनी संपूर्ण प्रबंध अथपासून इतिपर्यंत बारकाईने वाचला होता, हे पाहून मला फार आश्चर्य वाटले. तोवर मला असे कोणीही भेटले नव्हते आणि आपला हा जड विषयावरील समग्र प्रबंध






डोळ्याखालून घालणारी कोणी व्यक्ती आपल्या आयुष्यात कधी आपल्याला भेटेल, अशी अपेक्षा मी केली नव्हती. त्यानंतर तसे कोणी भेटले नाही, हेही खरे आहे. मला एकीकडे नवल वाटले, तर दुसरीकडे आनंद वाटला. "एवढ्या प्रदीर्घ प्रबंधात कोठेही एकदेखील विसंगती नाही, सारी मांडणी तर्कशुद्ध आहे." असे ते मला म्हणाले आणि माझ्या आनंदात मोठी भर पडली. तत्त्वज्ञानविषयक विचाराच्या प्रकरणाला मी वेदांत असे नाव दिले होते. त्याऐवजी अध्यात्म असे शीर्षक योग्य होईल, असे त्यांनी सुचवले. ती सूचना मला फार मोलाची वाटली. कर्म आणि नीती यांच्या परस्परसंबंधाच्या वामनपंडिताच्या मांडणीबद्दल मी जे विवेचन केले होते, त्याविषयी त्यांनी काही स्वतःचे स्पष्टीकरण केले, तेही माझ्या विचारांना नवी दिशा देणारे ठरले. उपनिषदे, भगवद्‌गीता, शंकराचार्य, येथपासून तो ज्ञानदेवांपर्यंत आचार्यांच्या वाचनाची कक्षा होती. राष्ट्रीय प्राध्यापक म्हणून ज्यांचा सन्मान केला गेला ते पुण्यातील आचार्य वि. प्र. लिमये आणि ज्यांनी आपले पंच्याऐंशी वर्षाचे सारे जीवन अविवाहित राहून केवळ संतवाङ्मय, शंकराचार्य आणि विशेषतः ज्ञानेश्वरी यांच्या परिशीलनात घालवले ते श्री. वि. मो. केळकर, अशी माणसे आचार्यांच्या तरुणपणीच्या मित्रमंडळात होती. या दोघांचा जवळून परिचय होण्याचा योगही पुढे माझ्या आयुष्यात आला. कोल्हापूरच्या त्या भेटीत आचार्यांशी माझा खरा वैयक्तिक परिचय झाला आणि तो पुढे वाढत गेला. त्यानंतर केव्हाही सांगलीला आले, तर आचार्य माझ्याकडे आल्याशिवाय राहिले नाहीत. हा प्रबंध प्रकाशित झाला पाहिजे असे त्यांनी चारचौघांच्या समोर बोलून दाखविले आणि त्यामुळेच सहाशे पृष्ठांमधे आणलेला तो ग्रंथ त्यानंतर दोन वर्षात कॉन्टिनेन्टल प्रकाशनाच्या श्री. अनंतराव कुलकर्णी यांनी प्रसिद्ध केला. याचे मूळ श्रेय आचार्यांकडे जाते, हे सांगावयास हवे असे नाही.

### सुखसंवाद आणि काव्यशास्त्रविनोद

१९६३ साली मी पुण्याला फर्गसन महाविद्यालयात आलो. १९६८ च्या सुमारास आचार्य पुण्याला राहण्यासाठी आले. त्यानंतर अखेरचा श्वास घेईपर्यंत ते पुण्यात होते. या काळात त्यांच्याशी माझा संपर्क वाढत गेला आणि त्यांचा अधिक सहवासही मिळत गेला. डॉ. द. न. गोखले हे सुप्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ आणि चरित्रकार फर्गसनच्या आवारात राहत होते. त्यांची माझी मैत्री वयाच्या अठराव्या वर्षापासूनची. गोखल्यांचे थोरले बंधू विनायक हे आचार्यांचे तरुण वयातील अगदी निकटचे असे राजकीय चळवळीतील सहकारी होते. ते क्षयाने आजारी पडून अकाली गेले. त्यांचा धाकटा भाऊ म्हणून गोखल्यांवर आचार्यांचे पुत्रवत प्रेम होते. केसरीत त्या वेळी व्यवस्थापक म्हणून आलेले डॉ. व. ल. वष्ट हे तर माझे सोळाव्या वर्षापासूनचे मित्र. आमचे हे त्रिकूट आचार्यांना प्रिय झाले. आमच्यामधील प्रदीर्घ मैत्रीचे ते भरघोस कौतुक करीत आणि आमच्यापैकी प्रत्येकाशी त्यांचा वेगवेगळ्या प्रकारचा संवाद चाले. आम्हा तिघांचे अभ्यासाचे व आवडीचे विषय वेगळे होते, पण ही अडचण आचार्यांना पडली नाही. अधूनमधून ते गोखल्यांकडे एकदोन दिवस राहून जात. हळुहळू ते माझ्या घरी एकएक दोनदोन दिवस राहू लागले. हे सारे सहजपणे घडत गेले आणि तितक्याच सहजपणे त्यांच्या-माझ्यातील भावबंध उत्कट होत गेले. अखेरच्या दोनतीन वर्षात तर हे नाते एवढे जवळचे होऊन गेले की, महिन्यातून दोनतीन दिवस आमच्या घरी राहण्यासाठी आचार्य मुद्दाम येत असत. काही वेळा शनिवार पेठेतील साधना साप्ताहिकाच्या कार्यालयात ते एखाद्या बैठकीसाठी येत. तेथे रात्री उशीर झाला तर सांगत, "मला करंदीकरांच्या घरी पोचवा," एवढा मोकळेपणा आमच्या संबंधामधे उत्पन्न झाला. माझी राजकीय मते माहीत असलेल्या साधनेच्या वर्तुळातील काही व्यक्तींना या गोष्टीचे फार नवल वाटते, असे आचार्यांनीच एकदा मला म्हटले.

डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या आजीव सदस्यांच्या सभा वर्षातून चारपाच वेळा होत असत. त्या निमित्ताने सांगलीहून प्रा. दाभोलकर आणि प्रा. हातकणंगलेकर, तर मुंबईहून प्रा. रेगे येत असत. या सर्वांचे वास्तव्य अनेक वेळा माझ्याकडे असे. रेगे आणि दाभोलकर यांचा सहवास आचार्यांना विशेष प्रिय आहे, हे माहीत असल्यामुळे अशा सभांच्यावेळी मी आचार्यांना मुद्दाम बोलावून घेत असे. आचार्य आले आहेत म्हणून कधी प्रा. अ. भि. शहा येऊन जात, तर क्वचित प्रा. ग. प्र. प्रधान फेरी टाकत. यदुनाथ थत्ते आणि दि. के. बेडेकर अशा व्यक्तीही त्या काळात आचार्यांना भेटण्यासाठी येऊन गेल्या पण हमखास येत असत ते श्री. प्रभाकर पाध्ये. विविध विषयांवरील वैचारिक चर्चा ही पाध्यांना सर्वात प्रिय असणारी गोष्ट, किंबहुना पाध्ये आणि आचार्य यांच्यातील तो समान भाग होता. दुपारी बारा ते संध्याकाळी सहा एवढा वेळ आमची आजीव सदस्यमंडळाची सभा असे. बाकीचा सारा वेळ रेगे, दाभोलकर आणि कधी असतील तेव्हा हातकणंगलेकर, यांच्याशी आचार्यांचा विश्रब्ध संवाद






चाललेला असे. यातील प्रत्येकाच्या स्वभावाचे काही वैशिष्ट्य होते आणि प्रत्येकाचा स्वतंत्र दृष्टिकोण होता. रेगे तत्त्वज्ञानाचे, दाभोलकर अर्थशास्त्राचे, तर हातकणंगलेकर इंग्रजी साहित्याचे प्राध्यापक होते. आचार्यांना या सर्व विषयात गोडी होती. या सर्वांच्या वृत्तीला समाजसन्मुखतेचा पदर होता, तो जणू सर्वांना एका भूमिकेवर आणणारा समान घटक होता. प्रत्येकाची बोलण्याची आणि युक्तिवाद करण्याची शैली वेगळी होती. पण मनाचा प्रांजळपणा आणि वैचारिक सामर्थ्य या बाबतीत हे सारे तुल्यबळ होते.

कधीकधी गप्पा रंगत आणि दोनदोन तीनतीन तास केव्हा निघून जात ते कळतही नसे. या सर्वाला केवळ साक्षीभूत होऊन राहिल्यावर माझ्यासारख्याला श्रवणसुखाचा आनंद मिळे आणि तो एक अनमोल ठेवा होऊन जाई. विषय गंभीर असत, पण चर्चा कधी बोजड होत नसे. काव्य आणि शास्त्र यांच्या जोडीला विनोदाची कारंजीही अधूनमधून उसळत असत. विलोभनीय वाटावा असा या सर्वांच्या एकत्रित वास्तव्याचा सोहळा होता. पाध्यांना तर याचे फार आकर्षण वाटे. एके दिवशी संध्याकाळी आलेले पाध्ये आणि कमलाताई रात्री नऊ वाजता निरुपायाने निघाल्यासारखी आपल्या घरी परत निघाली. रेगे, दाभोलकर, हातकणंगलेकर त्यावेळी माझ्याकडे होते, आचार्य तर होतेच. पाध्यांना निरोप देण्यासाठी मी अंगणाबाहेरच्या फाटकापाशी गेलो, तर आपल्या गाडीत बसताना ते मला म्हणाले, "हे सारेजण आले आहेत, छान गप्पा रंगल्या आहेत, मला तुमचा फार हेवा वाटतो." यावर मी त्यांना म्हटले, "थांबा, जेवण करून सावकाश जा." पण ती दोघे सुज्ञ होती. आमच्या घरात आधीच भरपूर माणसे आहेत, हे त्यांना दिसत होते.

ज्याच्या ठिकाणी बुद्धीचे आणि अभ्यासाचे काही तेज असेल, अशा व्यक्तीविषयी आचार्यांना नेहमी कुतूहल असे. कोणाच्याही गुणाबद्दल त्यांना मनापासून कौतुक असे आणि हे कौतुक अखेर त्या व्यक्तीविषयी त्यांच्या मनात प्रेम उत्पन्न करीत असे. हे प्रेमही सुप्त राहत नसे, त्याचा प्रकट आविष्कार होत असे. कीर्तिवंत अशी किती माणसे इतरांच्या गुणांची मनःपूर्वक दखल घेताना आढळतात, याविषयीचा अनुभव डोळ्यांसमोर आणला, तर आचार्यांच्या गुणग्राहकतेचे वर्म समजेल. फर्गसनमधील गणिताचे प्राध्यापक राजाभाऊ इनामदार हे एकदा माझ्याकडे येऊन गेले. आपल्या नेहमीच्या स्वभावानुसार कोण आले होते ही चौकशी आचार्यांनी केली. राजाभाऊंची माहिती समजल्यावर आचार्यांना एवढे कौतुक वाटले की, मुद्दाम वेळ ठरवून घेऊन ते फर्गसनच्या आवारात असलेल्या त्यांच्या घरी गेले आणि दोन तास मोकळेपणाने गप्पा करून आले. राजाभाऊ शास्त्रीय संगीताचे उत्तम जाणकार. एकदा ते आले असताना संगीताबद्दल मी त्यांना माहिती विचारत होतो. असेच एकदा हातकणंगलेकर आले. मध्ययुगीन युरोपातील रेनेसान्स कालखंडातील अभिजात चित्रकला आणि बॅराक आर्ट या नावाने ओळखली जाणारी चित्रकला या दोहोंच्या स्वरूपातील फरक मी त्यांना विचारला. आचार्य शेजारच्या खोलीत बसून ऐकत होते. हातकणंगलेकर गेल्यावर ते मला म्हणाले, "संगीत आणि चित्रकला अशा नाना विषयांवर तुम्हा मित्रांच्या या गप्पा चालतात, तुम्ही त्यातला आनंद घेता, आमच्या आयुष्यात हे सारं राहून गेलं."

देशभक्तीच्या ध्येयापोटी आपण काही व्रतांचा स्वीकार केला आणि जीवनातील निरामय अशा आनंदाचे काही भाग आपल्याला बंद होऊन गेले, याविषयी असलेल्या आंतरिक जाणिवेची अशी एखादी खूण अवचितपणे आचार्यांच्या बोलण्यात मिळून जात असे. मला पु. ल. देशपांडे यांच्या 'तुझे आहे तुजपाशी' या नाटकातील आचार्य या पात्राच्या व्यक्तिरेखेची आठवण होई. त्यातील त्या आपल्याच कोशात गुंतून पडलेल्या आचार्यांपेक्षा आपल्या घरी येणारे हे आचार्य किती निराळे आहेत, असे माझ्या मनात येई. असे जे काही आपल्या जीवनात राहून गेले, त्याबद्दल कोणताही विषादाचा भाव आचार्यांच्या मनात नसे. एका उदात्त ध्येयासाठी आपण दिलेली ही किंमत आहे आणि अशी किंमत मोजली तरच जीवनाला अर्थपूर्णता येते, हे ते पूर्ण समजून होते. आता ते पर्व मागे पडले आहे, हेही ते जाणून होते. आणि ते आपली एकूण जीवनपद्धती ते बदलू शकत नसले, तरी मागच्या काळातील ओझी आजही विनाकारण खांद्यावर घेऊन फिरावे असेही ते करीत नसत. दाभोलकर आणि मी यांच्या मनात एकदा आले की, आचार्य आपण होऊन चित्रपट पाहावयास गेले असणे शक्य नाही. त्यांना घेऊन चित्रपट पाहावयास जावे असा आम्ही बेत केला. आचार्यांची प्रतिक्रिया काय होईल याबद्दल थोडी शंका अर्थातच होती. पण आचार्यांनी आनंदाने संमती दिली आणि ते चित्रपट पाहण्यासाठी आले, एवढेच नव्हे, तर तो पाहून आल्यावर जेवणाच्या वेळी त्यांनी त्या चित्रपटातील कथानक आणि अभिनय यांविषयी चर्चाही केली.

**वागण्याबोलण्यातील सूक्ष्मता**

दोनदोन तीनतीन दिवसांचा असा एकमेकांच्या








अनुक्रमणिका

सहवासाचा आणि संवादाचा आनंद आपण मुक्तपणे घेऊ शकतो, ते या घरातील गृहिणी आपणा सर्वांची चहापासून जेवणापर्यंतची सारी देखभाल करीत आहे म्हणून, याची पुरीपुरी जाण आचार्यांना असे. त्याची पावती त्यांच्या बोलण्यातून मिळाल्याशिवाय कधीही राहत नसे. एखाद्या विषयावरील चर्चा रंगात आलेली असतानाच कधीकधी आम्ही जेवणाच्या मेजावर येऊन बसत असू. अशा वेळी सामान्यपणे घडते ते असे की, आपण आपल्या गप्पांमधे रमलेलो असतो आणि इतर कोणत्या गोष्टीकडे आपले लक्ष राहत नाही. पण आचार्य त्यातले नव्हते, ते सावध असत. आपल्या समोरच्या ताटांमधून ताजे, गरम आणि रुचकर पदार्थ वाढलेले आहेत, प्रत्येक वेळेला रुचिपालट म्हणून काहीतरी नवे आपल्यासमोर ठेवले गेले आहे, हे त्यांच्या दृष्टीने निसटत नसे. ते सर्वांना म्हणत, "आता जेवणाकडे लक्ष द्या. घरातल्या गृहिणीनं सकाळपासून श्रम करून जेवण तयार केलं आहे, हे विसरू नका." हा कधीतरी चुकून निघणारा उद्‌गार नसे. आपल्या छोट्यामोठ्या सुखसोयींसाठी कोण केव्हा कोणती गोष्ट करीत आहे, याची नोंद त्यांचे मन न चुकता घेत असे. रात्री त्यांचे अंथरूण घालून ठेवलेले असे. प्रत्येक वेळी इतके करण्याची काही गरज नाही, असे ते साहजिक म्हणत पण त्यांची एवढी व्यवस्था करणे हे अतिथ्याला अनुसरून केले जाई.

याची परतफेड आचार्य कशी करीत ? सकाळी सहाच्या सुमारास त्यांच्या खोलीत डोकावले, तर मच्छरदाणी नीट पलंगाच्यावर लावलेली असे. चादर आणि पलंगपोस यांच्या घड्या केलेल्या असत. अंथरुणावरील चादरीला कोठेही एक सुरकुती दिसत नसे. सकाळी आलेले वर्तमानपत्र हातात घेतले की, प्रथम आचार्य त्याची व्यवस्थित घडी करीत आणि नंतर त्याचे वाचन सुरू होई. वाचून झाल्यावर वर्तमानपत्र मेजावर ठेवले, तर ते कधीही कसेतरी टाकलेले नसे. पुस्तके, मासिके किंवा इतर कागदपत्र, अशा सर्व वस्तू मेजावर ठेवताना त्या त्यांच्याकडून सर्व वेळी अतिशय व्यवस्थित ठेवल्या जात. आपण संन्याशाशी नाते सांगणारे व्रतस्थ जीवन स्वीकारले आहे, याचा अर्थ आपण कसेही गबाळेपणाने राहिले तरी चालेल, असे त्यांनी कधीही मानले नाही. सौंदर्यदृष्टी आणि सुसंस्कृतपणा हे विशेष त्यांच्या सर्व वेळच्या वागण्यातून प्रकट होत असत. आपला छोटासा मुक्काम संपवून ते परत निघाले की, घरातील सर्वांशी दोन शब्द बोलल्याशिवाय त्यांचे पाऊल बाहेर पडत नसे. ते गेले तरी त्यांच्या वागण्याबोलण्यातील प्रसन्नतेचा दरवळ घरात बराच काळ दरवळत राही.

निर्मळ अशा आपुलकीचा ओसंडून वाहणारा झरा त्यांच्या वागण्यातून सतत सर्वांची हृदये जणू भिजवून टाकत असे आणि तरी या साऱ्याला त्यांच्या सहजसिद्ध अशी निरपेक्ष अलिप्ततेची किनार जोडलेली असे. हा त्यांच्या स्वभावाचा एक फार मोठा विशेष होता. एखाद्या कुटुंबात किंवा मित्रपरिवारात ते जितक्या समरसतेने साऱ्या गोष्टींत सहभागी होऊन त्यातला आनंद घेत असत, तेवढ्याच सहजपणे ते जाताना सर्वांचा निरोप घेत आणि तसा तो घेताना तितकेच समाधानी असत. माणसाला सतत कोणची तरी सोबत आवश्यक असते. आपणा सर्वांना येणारा हा अनुभव आहे. आचार्यांना अशी हक्काची कोणतीही सोबत नव्हती आणि कितीही माणसांना ते भेटले किंवा कोणाकडे चारदोन दिवस राहिले, तरी अखेर ते एकाकीच होते. पण अशा एकाकीपणातही ते प्रसन्न असत. गांधीभवनाच्या खोलीत ते हाताने स्वयंपाक करून राहत असत. अगदी आवश्यक तेवढीच भांडी, थोडे कपडे आणि अंथरूणपांघरूण असा त्यांचा संसार होता. किमान आवश्यकतेहून अधिक काहीही ते जवळ ठेवीत नसत, कोणी दिले तरी घेत नसत, अशी त्यांची अपरिग्रही वृत्ती होती. ज्या ज्या वेळी त्या खोलीत मी त्यांना भेटावयास गेलो, त्या त्या वेळी एखाद्याने आपल्या भरलेल्या कुटुंबात करावे एवढ्या प्रसन्नपणाने होणारे त्यांचे स्वागत अनुभवावयास मिळाले. एकटे राहत असल्याची कोणतीही छाया त्यांच्या मुद्रेवर दिसत नसे. अशी प्रसन्नता ही एक दुर्मिळ गोष्ट आहे.

एकदा त्यांच्यावरोबर बोलत बोलत मी फर्गसनपासून लकडी पुलापर्यंत गेलो. तेथे रिक्षा करून तेथून पाच-सहा किलोमीटर दूर असलेल्या आपल्या खोलीकडे गेले. माझ्याकडचे दोन दिवसांचे वास्तव्य संपवून ते परत चालले होते. त्यांची रिक्षा निघाली. हात हालवून त्यांनी माझा निरोप घेतला. आता यानंतर पुढचे आठ पंधरा दिवस तरी ते खोलीत अगदी एकटे असणार, या कल्पनेने त्या क्षणी माझे मन एकदम फार अस्वस्थ झाले. सत्तरी जवळ आलेली, प्रकृतीही तशी बरी नसते, अशा अवस्थेत त्यांना एकटे राहावे लागते, ही जाणीव माझ्या मनात वेदना उत्पन्न करून गेली. संध्याकाळची गर्दीची वेळ होती. लकडी पुलाजवळचे तीन दिशांचे मोठे रस्ते माणसांनी फुलून गेले होते. जो तो आपापल्या व्यवधानात आणि घरी पोचण्याच्या धांदलीत होता. त्यात काही गैरही नव्हते. हे असेच असते आणि असेच असावे लागते. पण माझ्या मनात आले, ही शेकडो माणसे आता या रस्त्यावर आहेत. ज्या स्वातंत्र्याचा उपभोग आपण वीस बावीस वर्षे घेत आहोत, ते

प्राप्त होण्यासाठी ज्याने आपले सारे ऐन तारुण्य खर्ची घातले होते आणि स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या साऱ्या लाभांपासून जो शत योजने दूर राहिला होता, असा एक संन्यस्त वृत्तीचा देशभक्त आता येथे आला होता, त्याने आपणा सर्वांसाठी केवढी तपस्या केली आहे याची साधी माहिती या वाहत्या जनसमुदायामधे कोणालाही नाही, ही गोष्ट मन किती विषण्ण करणारी आहे ! पण लगेच मनात आले : ही तर सारी सामान्य माणसे आहेत. त्यांना खरोखरीच काही माहीत नाही आणि त्यामुळे त्यांचा काही दोष नाही. पण जे आज राजकीय पक्षात आहेत आणि सत्तेच्या आसनांवर सुखाने नांदत आहेत, त्यांना तरी आचार्यांच्या ऋणाची कितीशी आठवण आहे ? वर्षे उलटत जातात आणि सारे काही समाजाच्या अंगाने विस्मरणात जात असते. 'सर्वं यस्य वशादगात्स्मृतिपथम्' म्हणजे सगळे सगळे ज्याच्यामुळे अखेर केवळ स्मृतींच्या रूपाने उरते अशा कालाला भर्तृहरीने एका श्लोकात वंदन केले आहे. त्याने दिलेला तेथील संदर्भ काही शतके आधी ऐन वैभवात दिमाखाने नांदलेल्या राजसत्तांचा आहे. त्या कालाच्या महिम्याची प्रचीती आपण जणू वर्तमानकालातच आपल्या डोळ्यांसमोर घडून गेलेल्या घटनांच्या संदर्भात घेत आहोत, अशा काही आगळ्या जाणिवेची सोबत घेऊन मी तेथून परत आलो.

### वात्सल्य आणि ऋणानुबंध

ज्या घराशी आपले एकदा लागेबांधे जुळले, तेथे घडणाऱ्या साऱ्या छोट्यामोठ्या कौटुंबिक घटनांशी आचार्यांचे अतिशय निकटचे नाते जडत असे आणि या नात्यातून उत्पन्न होणाऱ्या वडीलधारेपणाच्या जबाबदाऱ्या ते आपल्या शिरावर सहजपणे घेत असत. माझ्या थोरल्या मुलीचा विवाह जवळजवळ तीन वर्षांपूर्वी झाला. आदल्या दिवशी संध्याकाळी झालेल्या सीमान्तपूजनाच्या कार्यक्रमापासून तो दुसऱ्या दिवशी संध्याकाळी तीन साडेतीन तास चालू असलेला स्वागतसमारंभ आणि अल्पोपहार संपेपर्यंत सर्व वेळ आचार्य त्या समारंभात घरच्या माणसाप्रमाणे उपस्थित होते. माझे अनेक मित्र आले होते, पुण्यातील नाना क्षेत्रातील अनेक माणसे येऊन गेली. घरातल्या वडीलधाऱ्या माणसाने करावी, तशा आस्थेने ज्यांचा परिचय होता त्या सर्वांची विचारपूस ते करीत होते. सारा समारंभ आटोपून मुलगी सासरच्या घरी गेल्यावर रात्री साडेदहानंतर आचार्यांना मी गांधीभवनाजवळच्या त्यांच्या खोलीत पोचवले. ते मोठ्या आनंदात होते आणि समारंभातील साऱ्या व्यवस्थेचे कौतुक करीत होते. या माझ्या मुलीचा दोन खोल्यांत मांडलेला नवा संसार पाहण्यासाठी आचार्य नंतर तिच्या घरी गेले. त्यांना जिना चढण्याची परवानगी नव्हती, तरी चार चार पायऱ्यांनंतर थांबत दोन जिने चढून गेले. क्षयाच्या व्याधीमुळे आलेल्या खोकल्याने आचार्यांची सोबत दिवसरात्र आयुष्याच्या अखेरीपर्यंत केली. यात संसर्गाचा काही भाग असतो आणि तो इतरांना उपसर्गकारक ठरू शकतो, याचे अवधान ते सतत ठेवीत असत. माझ्या पहिल्या नातवाच्या बारशाच्या समारंभात संध्याकाळी पाचपासून रात्री नऊपर्यंत ते आल्यागेल्यांशी हास्यविनोद करीत बसले होते. त्याआधी ते माझ्या मुलीच्या खोलीत गेले. दाराशी उभे राहिले. दारापासून पुढे गेले नाहीत. वडीलकीचे नाते मानून जे काही कौतुक करावयाचे ते त्यांनी तेथून केले, नातवाला काय द्यावयाचे तेही दिले. मुलाची आई उपा. तिला म्हणाले, "मी इथनंच बोलतो. आमच्यासारख्या रोगी माणसानं तान्ह्या मुलाच्या फार जवळ जाऊ नये."

हे उद्गार ऐकून मी मनोमन अतिशय चकित झालो. स्वतःच्या रोगी अवस्थेबद्दल विषादाचा थोडासाही अंश त्यांच्या स्वरात नव्हता. एक अपरिहार्य वस्तुस्थिती म्हणून आपल्या त्या भागधेयाचा त्यांनी स्वीकार केला होता. पण त्याच वेळी या जगात नव्याने पाऊल टाकलेल्या एका बालजीवाबद्दल आपले वात्सल्य योग्य प्रकारे व्यक्त करण्यात त्यांना कोणतीच अडचण वाटत नव्हती. स्थितप्रज्ञता ती याहून वेगळी काय असते ? अशा समारंभात वावरताना असणारी औपचारिकता तर त्यांच्या ठायी लेशभरही नव्हती. हे आनंदाच्या एका विशेष प्रसंगातील त्यांचे वागणे झाले. याचेच इतर काही आविष्कारही असत. आचार्यांचा रवींद्रांच्या कवितेचा फार चांगला व्यासंग होता. त्या काव्यावर त्याचे प्रेम होते. आम्हा सर्वांना त्यात रुची आहे, हे दिसल्यावर आमच्या विनंतीचा मान ठेवून एके दिवशी रात्रीचे जेवण आटोपल्यावर त्यांनी आम्हाला रवींद्रांच्या काही कविता त्यांचे रसग्रहण करीत वाचून दाखविल्या. श्रोते किती ? आम्ही दोघे आणि आमच्या दोन मुली, फक्त चार. पण आचार्यांच्या लेखी संख्येला फार महत्त्व नव्हते. महत्त्व होते खऱ्याखुऱ्या रसिकतेला आणि जिज्ञासावृत्तीला. या आपुलकीचे आणखी एक वेगळे दर्शनही एकदा घडून गेले. १९७१ च्या डिसेंबरमध्ये माझ्या कानावर एक मोठी शस्त्रक्रिया करावी लागली. त्यासाठी आम्ही दोघे मिरजेला गेलेलो आणि मुली पुण्यात. अशा प्रसंगी नाही म्हटले तरी थोडी चिंता, काहीशी धाकधूक असतेच. शस्त्रक्रियेच्या आदल्या दिवशी दुपारी दोनच्या सुमारास आचार्य गांधीभवनाच्या आवारातील आपल्या







खोलीतून फर्गसनच्या आवारातील आमच्या घरी आले. आपण होऊन आले, आपण येणार आहोत असे काहीही ते आधी बोलले नव्हते. मुलींच्याशी गप्पा मारत बसले. शस्त्रक्रिया व्यवस्थित पार पडून माझी भूल उतरली, असा दूरभाष मिरजेहून रात्री आठ वाजता आला आणि मग आचार्य परत गेले. का करावे हे सारे त्यांनी आमच्यासाठी ?

तसे पाहिले तर आचार्यांचा जन्मभरातील काँग्रेसच्या चळवळीतील सहभाग आणि मी ज्या हिंदुत्ववादाची सोवत घेऊन आलो होतो तो प्रवास, या दोहोंचे काहीही नाते नव्हते. असलेच तर ते विरोधाचे होते. हिंदुत्वाची विचारधारा आणि राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे कार्य यांवर आचार्यांनी कितीतरी वेळा प्रकट सभांमधून प्रखर टीका केली होती. पण माझा त्यांचा परिचय झाला, त्या काळात राजकीय मतभेदापोटी निर्माण होणाऱ्या माणसामाणसांतील दुराव्यातून आचार्य पूर्णपणे बाहेर पडले होते. त्यांच्याशी जवळून संपर्क येऊ लागल्यानंतरच्या पहिल्या एकदोन वर्षांत मी संघाबद्दल आपणहोऊन कधी एक अक्षरही उच्चारले नाही. आचार्य आमचे घरी आले असताना जे जे कोणी येऊन जात, त्यापैकी कोणाचेही मत संघाला अनुकूल नव्हते. सदासर्वकाळ चालणाऱ्या संभाषणांमध्ये संघाबद्दल टीकेचा उद्गार कानावर पडण्याचा प्रसंग येत असे, पण त्याचा कोणताही प्रतिवाद मी करीत नसे. पुढे पुढे मनाचे बंद असलेले कप्पे उघडले जाऊ लागले, तसतसे आचार्यांशी माझे संघाबद्दल बोलणे होऊ लागले. सरदार वल्लभभाई पटेल ज्याचे अध्यक्ष होते, त्या १९३८ साली सांगलीला भरलेल्या दक्षिणी संस्थान लोकपरिषदेच्या अधिवेशनाच्या वेळी काँग्रेसचे त्या भागातील पुढारी श्री. तात्यासाहेब शिखरे यांच्या हाताखाली मी काम केले होते, त्या निमित्ताने मी महिना दीड महिना खेड्यापाड्यातून सर्वत्र फिरलो होतो, आणि ही गोष्ट मी संघाचा स्वयंसेवक झाल्यानंतरच्या काळात केवळ अशा प्रकारच्या कामाचा अनुभव घेण्यासाठी केली होती, हे ऐकल्यावर आचार्यांना नवल आणि कौतुक वाटले. त्यानंतर त्यांच्याशी डॉक्टर हेडगेवार आणि त्यानंतरचे सरसंघसंचालक पूजनीय गुरुजी यांच्याबद्दल बोलणे होऊ लागले. आचार्यांनी मला अनेक प्रश्न वेळोवेळी संभाषणाच्या ओघात विचारले. संघाची विचारधारा आणि कार्यपद्धती यांबद्दल अनेक गोष्टी त्यांना नव्याने कळल्या, असे त्यांनी मोकळेपणाने बोलून दाखविले. कोणत्याही कामाला अंगभूत अशा मर्यादा असतात. संघाच्या कामातील मर्यादा मान्य करण्यात मला कोणतीही अडचण वाटत नसे. याचा आचार्यांवर विशेष परिणाम झाला. असे अनेक संवाद अधूनमधून होत राहिल्यावर एकदा गुरुजींच्या त्या वेळी चालू असलेल्या कार्यक्रमांचा काही विषय निघाला आणि त्याबद्दलची माहिती मी सांगितली. त्यावर आचार्य उत्स्फूर्तपणे आणि मोठ्या आदराने उद्गारले, "ते तर काय, एक परिव्राजक आहेत." परिव्राजक म्हणजे नित्य संचार करीत राहणारा संन्यासी. सरसंघसंचालक संघाचे काम करतात म्हणजे सतत देशभर फिरत राहून तालुकापातळीपर्यंतच्या कार्यकर्त्यांशी संपर्क ठेवतात आणि स्वयंसेवकावर निःस्वार्थ देशभक्तीचा व निर्मळ चारित्र्याचा संस्कार करीत राहतात, हे आचार्यांना एव्हाना माहीत झाले होते. त्याची त्यांनी आपल्या वैशिष्ट्यपूर्ण भाषेत दिलेली ही पावती होती. या संदर्भात त्यांच्याकडून आणखी कोणत्या प्रशस्तीपत्राची अपेक्षा करणे शक्य होते ? अशा निरनिराळ्या प्रकारच्या वैचारिक देवाणघेवाणीतून आमच्यातील जवळीक नकळत वाढत गेली आणि ती एवढी मनमोकळी झाली की, तीमध्ये राजकीय मतभेद वगैरे साऱ्या गोष्टी जणू वितळून गेल्या.

अखेर उरला तो निर्मळ अशा जिव्हाळ्याचा भाव. त्यांच्या सहज उद्गारातून त्याची प्रचीती येऊन जात असे. एकदा असेच दोनतीन दिवस राहून ते परत जाण्यासाठी निघाले. नेहमीप्रमाणे मी त्यांना निरोप देण्यासाठी आमच्या निवासस्थानाच्या जवळच असलेल्या महाविद्यालयाच्या मुख्य प्रवेशद्वारापाशी गेलो. आम्ही रिक्षा पाहत होतो. बोलता बोलता आचार्य मला म्हणाले, "तुमच्याबद्दल एवढी ओढ मला का वाटते याचा उलगडा होत नाही, हा पूर्वजन्मीचा काही ऋणानुबंध असला पाहिजे." हे उद्गार ऐकल्यावर आता आचार्यांकडून आपल्याला मिळण्यासारखे काहीही उरले नाही, असा भाव माझ्या मनात उत्पन्न झाला. "आचार्य बोलताना तुमचा उल्लेख करतात." असे श्री. श्रीपाद जोशी आणि प्राचार्य शरच्चंद्र चिरमुले यांच्यासारखे अगदी वेगळ्या प्रकृतीचे लेखक माझ्याशी बोलताना एकदोन वेळा म्हणाले होते. ते केवळ औपचारिक बोलणे नव्हते, तर त्यामागे आचार्यांचे खरेखुरे वात्सल्य उभे होते, असे त्या क्षणी जाणवले. 'भावस्थिराणी जननान्तरसौहृदानि।' या कालिदासाने शाकुंतलमध्ये दुष्यंताच्या मुखात घातलेल्या उद्गारांचेही साहजिकच स्मरण झाले. यथार्थदिपिकेवरील माझा प्रबंध त्यांना आवडला होता. तेथे परिचयाचा प्रारंभ झाला. उपर्युक्त उद्गार त्यांनी काढला, तेव्हा गायकवाडवाड्यातील केसरीच्या ग्रंथशालेत 'भगवद्-गीतेचे तीन टीकाकार' ही श्रीज्ञानदेव, वामनपंडित आणि लोकमान्य टिळक यांच्या गीताटीकांचा तौलनिक परामर्श





घेणारी माझी पाच व्याख्याने होऊन गेली होती. त्या सर्व व्याख्यानांना आचार्य उपस्थित होते. त्यांची ती उपस्थिती ही डॉ. ग. श्री. खैर, प्रा. दि. के. बेडेकर किंवा श्रीमती मैत्रेयी विनोद अशा नामवंत श्रोत्यांच्या दृष्टीने एक मान्यतेची खूण होती. ही व्याख्याने प्रसिद्ध झाली पाहिजेत, असे आचार्यांनी म्हटले होते. त्यांचे लेखन चालू आहे हे त्यांना माहीत होते. यथाकाल ती प्रसिद्ध होतील, पण त्यावेळी आचार्य असणार नाहीत असे एक दु:ख मनात आहे. ज्ञानाच्या क्षेत्राविषयीचे जागते प्रेम आणि माणसाविषयी असणारा उत्कट जिव्हाळा या दोहोंचे हे असे विलोभनीय मिश्रण आचार्यांच्या व्यक्तिमत्त्वात झाले होते.

### स्थितप्रज्ञाची प्रसन्नता

असे हे वेगळ्या वृत्तीचे आणि आगळ्या धारणेचे आचार्य. मूळ प्रकृतीने ज्ञान आणि विचार यांचे प्रेमी, पण कर्तव्यभावनेपोटी भूमिकेने देशभक्त आणि त्याला संन्यस्त वृत्तीची जोड. देशसेवेचे ते दिवस मागे पडले आणि काळ बदलला आहे हे ध्यानात आल्यावर ते शांतपणाने त्यातून बाजूला झाले. त्या वेळचे पक्षापक्षातील मतभेद, कोणाकोणा-विषयीचे रागलोभ, किंवहुना विशिष्ट विचारप्रणालीविषयीचा आग्रह वा अभिनिवेश, हे सारे त्यांनी मागे टाकले. चीनचे आक्रमण झाले आणि आचार्य शंकरराव देवांनी प्रकटपणे काही भूमिका घेतली. तो पवित्रा कालबाह्य आहे आणि खटाटोप अनाठायी आहे, असे आचार्य स्पष्टपणाने म्हणत असत. अखेर साऱ्यातून केव्हातरी आपण बाजूला व्हावे लागते, हे ते पूर्ण ओळखून होते. मृत्यू जितका अटळ आहे, तितकेच मानवी जीवनातील साऱ्या उदात्त प्रयत्नांचेही असे काही फलित न टळणारे आहे, असे ते म्हणत. आपल्या अवघ्या जीवनाला उंची आणणारी ध्येयवादाची उपासना समाप्त झाली, तर त्याचाही त्यांनी खेद मानला नाही. नाना विषयांवरचे आपले विचार त्यांनी शब्दबद्ध करावेत, असे ज्यांच्यावर आचार्यांचे प्रेम होते अशा व्यक्तींनी त्यांना कितीतरी वेळा आग्रहाने म्हटले होते, त्यासाठी लागेल ते साहाय्य देण्याची सिद्धता दाखवली होती. पण त्यातही आचार्य गुंतले नाहीत, याचेही त्यांच्या मनाची ही विशिष्ट भूमिका हेच कारण असावे. उगवलेला सूर्य मावळणार आहे हे आपण जितक्या सहजपणे स्वीकारतो, तितक्या अलिप्तपणे ते 'आपलं हे शरीर केव्हा पडायचं असेल तेव्हा पडेल' असे उद्‌गार स्वत:च्या मृत्यूच्या संदर्भात काढत.

त्यांच्या विशिष्ट जीवननिष्ठेमुळे प्रत्यक्षात ते संन्यस्त आणि एकाकी होते, पण तरीही प्रापंचिक माणसांचा सहवास त्यांनी कधी वर्ज्य मानला नाही. जेथे कोठे काही अल्पस्वल्प चांगुलपण आढळले, तेथे ते डोळसपणे गेले आणि त्यातील आनंद घेत राहिले. आपल्या मनातील प्रसन्नतेचा झरा त्यांनी कधी गढूळ होऊ दिला नाही. जीवनातील ध्येयवाद, त्यासाठी केलेला प्रयत्न, करावा लागलेला त्याग, त्यात आलेले अनुभव, ज्ञानाचा सतत घेतलेला शोध, आणि जीवनातील अनुभवांचे चिंतन, या सर्वांच्या द्वारा त्यांच्या आयुष्यात जणू एक अखंड तपश्चर्या होत राहिली. त्यांच्या ठायी आढळणारे सर्वांविषयीचे प्रेम आणि वृत्तीतील परिपक्वता हे त्या तपस्येतून निर्माण झालेले वैभव होते. अशा या विरागी आणि निर्लिप्त धारणेला अभिजात रसिकतेची जोड होती. त्यांच्या पूर्वायुष्यातील हिरीरी आणि आवेश ही तीव्र होती हे खरे, पण ते सारे पचवल्यावर उत्तरायुष्यातील त्यांचे व्यक्तिमत्त्व हे साऱ्या तात्कालिकतेच्या अतीत पोचलेले होते. ते घरी आले म्हणजे निरनिराळ्या व्यक्ती गोळा होऊन जो परस्परसंवाद चालत असे, त्यावर आचार्यांच्या या स्थितप्रज्ञाला शोभेशा व्यक्तिमत्वाची सौम्य प्रभा पसरलेली असे आणि त्यायोगे भोवताली असणाऱ्या निरनिराळ्या प्रकृतींच्या माणसांच्या मनोवृत्तीतील भिन्नत्वाच्या रेषा जणू पुसल्या जात, आणि मग होणाऱ्या संवादाला एक सुसंवादाचे रूप प्राप्त होई. यानंतरही अशीच माणसे जमतील, संवादही होतील, पण त्यांच्या केंद्रस्थानी आता यानंतर आचार्य असणार नाहीत. ते नसल्यामुळे त्या संवादात जे उणे पडेल ते दुसरा कोणी भरून काढू शकणार नाही. स्थितप्रज्ञतेला रसिकतेची जोड असलेला आणि सौन्दर्यवृत्तीला उदात्ततेचा स्पर्श असणारा असा एक आनंदाचा झरा भोवतालच्या घटनांतील बऱ्यावाईटाचा अनुभव घ्यावा लागणाऱ्या आमच्यासारख्यांच्या जीवनात आचार्यांच्या रूपाने होता आणि शीतलतेचा एक दिलासा मनाला देत होता. आज तो लुप्त झाला हे जाणवल्याशिवाय राहत नाही.

तसे पाहू गेले, तर निराशा आणि अपेक्षाभंग यांना कारण होणाऱ्या गोष्टी आचार्यांच्या वाट्याला काही थोड्या आल्या नाहीत. स्वातंत्र्यानंतरच्या कालाबद्दल ज्या अपेक्षा मनाशी धरल्या होत्या, त्याबाबत खरेखुरे समाधान त्यांना लाभले नाही. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर काही वर्षे उलटल्यानंतर त्या स्वातंत्र्यासाठी ज्यांनी घरादारावर तुळशीपत्र ठेवून आयुष्यभर अपार कष्ट सोसले, अशा देशसेवकांची पिढी मागे पडत चालली. वयोवृद्ध झालेल्या आजोबांनी आपल्या तरुणपणी नाना हालअपेष्टा सोसत घर सुस्थितीत आणलेले असावे, पण

घरातील कर्त्या पिढीला त्याचे स्मरण असू नये, अशी स्थिती झाली. समाजजीवनाच्या वाहत्या प्रवाहाबरोबर आपण गती राखू शकत नाही, नव्या जगातील नव्या मूल्यांशी आपल्या मनाचा सांधा जुळत नाही, आपण आपल्या तरुण वयात ध्येयासक्तीच्या पोटी केलेली यातायात नुसती जाणून घेण्यासही नव्या पिढीस फुरसद नाही, हा अनुभव अस्ताचलाकडे झुकलेल्या पिढीच्या मनाला तीव्र वेदना देणारा असतो. पण आचार्यांनी ही वेदना पुरेपूर पचवली होती. 'व्यासांचा आक्रोश' ही आज कदाचित कोणी ऐकून घेणार नाही, हे त्यांना दिसत होते. पण मानवी नियतीचा प्रवाह हा असाच असतो, प्रत्येक नवी पिढी ही अशीच पुढे दृष्टी ठेवून चाललेली असते, आणि हे सारे स्वाभाविक आहे, हे त्यांना पुरते उमजले होते आणि त्यामुळे यांपैकी कोणत्याच आघाताने त्यांच्या आंतरिक शांतीचा किंवा प्रसन्नतेचा भंग होत नसे. स्थितप्रज्ञ पुरुषाला प्राप्त होणाऱ्या प्रसादामुळे त्याच्या सर्व दुःखांचा परिहार होतो व त्याचे चित्त प्रसन्न होते, असे वर्णन भगवद्गीतेमध्ये केलेले आहे. स्थितप्रज्ञाच्या वाट्याला येणारा हा प्रसाद आचार्यांना पुरेपूर लाभला होता. आपल्या मनोधारणेशी न जुळणाऱ्या ज्या अनेक गोष्टी भोवताली घडतात, त्यांच्याकडे विशेष लक्ष न देता समाजाच्या प्रगतीला पोषक अशा ज्या काही चांगल्या गोष्टी घडताना दिसत, त्यांमध्ये आचार्य आपल्या मनाचे समाधान नेहमी शोधत असत.

**समधात मनोधारणेचा आदर्श**

हे समाधान घेत असतानाही आपल्या पिढीने दाखवलेल्या कर्तृत्वाबद्दल वाटणाऱ्या वृथा अभिमानाची भेसळ आचार्य त्यामध्ये होऊ देत नसत. त्यांची भूमिका निर्भेळ गुणग्राहकाची असे. इंदिराजींच्या नेतृत्त्वाखाली राष्ट्रसभा पुन्हा चैतन्यपूर्ण झाली, हे पाहून त्यांना किती बरे वाटले. मग त्या प्रक्रियेत चार जुनी माणसे बाजूला पडली, याची खंत त्यांनी मानली नाही. पूर्व पाकिस्तानमधील शेख मुजिबूर रहमान यांचे नवे नेतृत्त्व, त्यानंतर बांगलादेशाचा झालेला उदय, आणि त्यातील भारताच्या पराक्रमाचा वाटा, ही तर त्यांना आपल्या इतिहासातील एक अपूर्व घटना वाटली होती. पुणे विद्यापीठातील प्रकरण धसास लावण्यासाठी गेल्या वर्षी प्राचार्य दाभोलकरांनी उपोषणास प्रारंभ केला, तेव्हा अद्यापही एखाद्या अन्यायाला वाचा फोडण्यासाठी महात्माजींच्या मार्गाचा क्वचित कोठे अवलंब केला जात आहे, हे पाहून त्यांच्या मनाला मोठेच समाधान वाटले होते. वैचारिक जागृती करण्याचे प्रयत्न आजही जाणीवपूर्वक केले जात आहेत व त्यात तरुण पिढी आस्थेने भाग घेत आहे, ही गोष्ट तर त्यांना फारच कौतुकाची वाटत असे. वर्तमानकालात घडणाऱ्या अशा अनेक गोष्टींनी उल्हसित होणे हे आचार्यांच्या जीवनदृष्टीचे एक फार मोठे वैशिष्ट्य होते. भूतकालात आपल्याला महत्त्वाच्या वाटलेल्या मूल्यांच्या वेड्या वर्तमानकालाच्या पायात विनाकारण घातल्या जाऊ नयेत, यावद्दल ते दक्ष असत. त्याचबरोबर आजच्या नवीन दृष्टीने आपल्या पिढीतील घटना निर्लेप वृत्तीने तपासून पाहण्यास त्यांच्या मनाची सदैव तयारी असे. हे करण्यासाठी आपल्या पिढीविषयी मनात नकळत असणारा अहंकार समूळ पुसून टाकावा लागतो. आचार्यांना हे साधले होते. ज्यांच्या आयुष्याची मध्यान्ह उलटून गेली आहे आणि तेथे संध्याकाळच्या सावल्यांची छाया पडू लागली आहे, त्यांच्यासाठी आचार्यांच्या मनोधारणेचा हा आदर्श सर्वथैव अनुकरणीय आहे; जसा त्यांचा स्वातंत्र्यपूर्वकाळातील प्रखर ध्येयवाद तेव्हाच्या पिढीला होता तसा.

आपल्या तरुण वयात स्वतःच्या मतांच्या बाबतीत आचार्य अतिशय आग्रही होते आणि विरुद्ध मताविषयीची त्यांची प्रतिक्रिया अतिशय तीव्र असे, किंवहुना ते कोपिष्ट होते, असे त्यांचे वर्णन काहीवेळा केले गेले आहे. पण तरुणपणी आचार्यांना काही गोष्टींचा राग येत होता हे जरी खरे असले तरी त्यामुळे उत्तरवयात त्यांनी तो राग जिंकला होता आणि मनाची एक विलक्षण स्वीकारशील प्रसन्नता प्राप्त करून घेतली होती, या वस्तुस्थितीस काही बाध येत नाही. त्यांची पूर्वीची प्रक्षुब्ध प्रतिक्रिया ही जितकी खरी, तितकीच नंतरच्या काळातील त्यांची शांत वृत्तीही खरी. किंवहुना पूर्ववयातील त्या प्रक्षुब्धतेच्या पृष्ठभूमीवर उत्तरवयातील त्यांची प्रसन्नता अधिक उठून दिसते. स्वतःच्या प्रवृत्तीशी त्यांना असा झगडा करावा लागला नसता आणि उत्तरायुष्यात आढळणारे त्यांच्या स्वभावातील सारे उदात्त घटक त्यांच्या ठिकाणी जीवनाच्या प्रभातकाळीच प्रकट झाले असते, तर ते केवळ आचार्य भागवत राहिले नसते. शतकाशतकातून जन्माला येणाऱ्या महापुरुषांच्या कोटीत ते जाऊन बसले असते.

मित्रमंडळीबरोबर गप्पा मारण्याची, भेटेल त्याच्याशी सुखसंवाद करण्याची आचार्यांना अतोनात हौस होती, किंवहुना वाचनाच्या खालोखाल त्यांना त्याचे व्यसन होते. अशा संभाषणामध्ये आयुष्यात त्यांना आलेले नाना प्रकारचे नाना अनुभव ते मोकळेपणाने सांगत असत आणि त्यामुळे ऐकणाऱ्यांच्या ज्ञानात मोठीच भर पडत असे. त्यांच्या ठिकाणी

असलेल्या शारीरिक दुर्बलतेची कोणतीही छाया त्यांच्या बोलण्यात उमटत नसे. त्यांची वाणी स्वच्छ आणि नितळ, विचार स्पष्ट आणि तर्कशुद्ध, तर प्रतिपादन ठाशीव आणि मूलगामी असे. बोलताना ते प्रतिपाद्य विषयाशी केवळ तद्रूप होऊन जात. आचार्यांचे दर्शन अपरिचित माणसाला प्रथमदर्शनी उग्र वाटावे असे होते. पांढरीशुभ्र अशी त्यांची राठ वाटणारी दाढी किंचित वाढलेली असली, तर या उग्रतेची छाया मनावर दडपण आणणारी वाटे. त्यांची दृष्टीही भेदक होती. पण हे सारे केवळ त्यांचे बाह्य रूप होते. थोडासा परिचय होऊन आरंभीचा औपचारिकपणाचा पडदा गळून पडला आणि संभाषणाला प्रारंभ झाला की, हे सारे बाह्य रूप पार पालटून जात असे आणि त्यांच्या मनाचा रंगमंच जणू प्रकाशाने उजळून गेलेला दिसे. हळुहळू त्यांच्या अंतरंगात लपून राहिलेल्या कोमलतेचा प्रत्यय येऊ लागे आणि मग त्यांचे बोलणे ऐकणारा त्यांच्यावर जणू लोभावून जाई. ते बोलू लागले की, त्यांचे भावपूर्ण डोळे उमललेल्या कमळाप्रमाणे विकसित होत आणि त्यांच्या जराजर्जर शरीरावरही जणू नवतारुण्याची कांती पसरे. त्यांचे व्याख्यान ऐकणे हा तर एक जिवंत अनुभव असे. अगदी अलीकडे फर्गसन महाविद्यालयातील विद्यार्थ्यांसमोर झालेली स्वातंत्र्यानंतरचा भारत, महात्मा गांधी, आणि रवीन्द्रनाथांची कविता, या विषयांवरील त्यांची व्याख्याने ज्यांनी ऐकलेली आहेत, त्यांना त्यांच्या ओजस्वी वक्तृत्वातील सामर्थ्याची प्रचीती येऊन गेली आहे.

अशा अनेक दुर्मिळ गुणांचा संगम आचार्यांच्या ठिकाणी झालेला होता. ते ध्येयवादी होते, त्यागी देशभक्त होते, प्रभावी वक्ते व कुशल अध्यापक होते, उत्तम लेखक व रसिक सौंदर्यभोक्ते होते, आणि अखेर सखोल व्यासंगी व थोर तत्त्वचिंतक होते. कोणत्याही स्वरूपातील दंभ, ढोंग किंवा खोटेपणा यांचा त्यांना केवळ तिटकारा होता. कोणाच्याही दोषांचा पाढा विनाकारण वाचू नये, हे ते जाणत होते. पण सौजन्याच्या नावाखाली सर्वांनाच केवळ चांगले म्हणत राहावे, किंवा दोषांचा उच्चार न करण्याच्या आवरणाखाली ते दोष मुळात अस्तित्वातच नाहीत असा आविर्भाव आपल्या बोलण्यामधे उत्पन्न करावा, ही आचार्यांची पद्धत नव्हती. तसे करणे हा सत्याचा अपलाप आहे असे त्यांना वाटत असे. क्षुद्र, कोते, हीनपणाचे असे काहीही त्यांना मानवत नसे. उमलत्या वयात असताना समर्थ रामदासांच्या वाङ्मयाचा त्यांच्यावर फार मोठा प्रभाव होता. 'उत्कट भव्य तेचि घ्यावे मिळमिळीत अवघेची टाकावे।' हे समर्थांचे वचन त्यांच्या वृत्तीत मुरलेले होते. व्यक्तिजीवनाची संकुचित कुंपणे त्यांनी केव्हाच ओलांडली होती. सुखदुःख किंवा आशानिराशा अशा लौकिक जीवनातील द्वंद्वांच्या पलीकडे ते पोचलेले होते. जितक्या समाधानी वृत्तीने ते लोकवस्तीपासून दूर असलेल्या गांधीभवनाच्या आवारातील आपल्या एकांत कुटीत रमत असत, तितक्याच निर्लेप मनाने ते पुण्याच्या गजबजलेल्या वस्तीतील एखाद्या परिचिताच्या घरात वावरत. शरीराविषयीची अनासक्ती ही तर त्यांच्या रक्तात केवळ भिनून गेली होती. 'हे शरीर तर नाशवंतच आहे,' असे ते म्हणत असत आणि हा उद्‌गार ते इतक्या सहजपणे काढत की, जणू घरातल्या एखाद्या टाकाऊ व जुन्यापुराण्या अशा वस्तूबद्दल ते बोलत आहेत, आणि इतक्या विरक्त वृत्तीने वावरत असूनही ते आपल्या भोवतालच्या माणसांना आनंद देऊ शकत.

त्यांच्या जीवनक्रमाशी विसंगत वाटावी, अशीही एखादी गोष्ट निकटवर्तीयांना आनंद वाटत आहे एवढ्यासाठी आचार्य करण्यास तयार असत. निर्मळ चारित्र्य आणि मनाचा सुसंस्कृतपणा यांविषयीच्या काही किमान अपेक्षा पुऱ्या झाल्यावर ते कोणत्याही विचारसरणीच्या माणसाशी समरस होत. म्हणून तर त्यांचा सहवास नव्या पिढीतील तरुणांनाही हवाहवासा वाटे. कशाचाच आग्रह त्यांनी ठेवलेला नव्हता. "तुम्हाला आनंद आहे ना, मग तसं करूया," असे ते म्हणत. प्रौढात प्रौढ आणि मुलांत मूल होऊन हा जो आनंद भोवतालच्या माणसांना आचार्य देऊ शकत असत, त्यासाठीच ते आणखी जगावयास हवे होते असे पुन्हापुन्हा वाटून जाते. त्यांच्या नेहमीच्या सवयीप्रमाणे हा इहलोक सोडून जाताना त्यांनी निरोप घेतला असता, तर त्यांना हट्टाने म्हणता आले असते, "आताच काय गडबड आहे ? आणखी थोडं थांबा." आणि कोणी सांगावे ? त्यांनीही आपल्या सवयीप्रमाणे हसत हसत म्हटले असते, "ठीक आहे, तुम्हाला आनंद आहे ना, मग तसंच करूया."



याः<br>तेषाम्<br>स्वैराः<br>कथाः<br>तानि<br>एव<br>शास्त्राणि।

## विभाग दुसरा

# आचार्यांची विचारधारा

### उपविभाग एक

## आचार्यांचे वाङ्मयचिंतन

### उपविभाग दोन

## आचार्यांचे जीवनचिंतन

अनुक्रमणिका

# आचार्यांच्या संकलित वाङ्मयाविषयी

अच्युत केशव भागवत

आचार्यांच्या 'संकलित वाङ्मयात' त्यांच्या लेखांचा आणि व्याख्यानांचा दोन्हींचाही समावेश आहे. आचार्यांची जनमानसावर ठसलेली प्रतिमा गांधीवादी विचारवंत म्हणून असली तरी त्यांनी आपल्या विचारांना कृतीचे व कृतीला विचारांचे अधिष्ठान देण्याचा सतत प्रयत्न केलेला दिसतो. आपली कृती निर्दोष व्हावी, विचार केवळ विचारासाठी नसावा, त्यांत वेदाभ्यासजडता नसावी ही त्यांची सतत धडपड दिसते. भारतीय जीवनातील विविध समस्यांची उकल करणे, महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक विचारांच्या वारशाचा मागोवा घेऊन टिळक-गांधींनी त्यात आपल्या तत्त्वविचारांनी व कृतींनी जी भर घातली तिची मीमांसा करणे व ह्या मीमांसेतून निर्दोष कृतिप्रवणतेचे तात्त्विक प्रतिपादन करणे हा त्यांचा प्रयत्न आहे. आपला हा विचार केवळ विद्वज्जनांसाठी नसून जनसामान्यांनाही सहज आकलन व्हावा असा त्यांचा हेतू असल्याने त्यात एक तऱ्हेची सुगमता व सुस्पष्टता दिसून येते. आपले विचार आपल्या वाचकांपर्यंत किंवा श्रोत्यांपर्यंत संक्रांत करण्यासाठी आपले शब्दमाध्यम शक्य तितके निर्दोष, अर्थवाही व परिणामकारक व्हावे ह्याबद्दल त्यांनी सतत प्रयत्न केलेले दिसतात. त्यांच्या वाङ्मयाच्या ह्या स्वरूपामुळे त्यावर फार विस्ताराने भाष्य करण्याची आवश्यकता नाही. त्यांची प्रमुख विचारसूत्रे समजून घ्यावी एवढाच हेतू येथे ठेवण्यात आला आहे.

गांधीविचारांचे व आचारांचे एक प्रभावी प्रवक्ते म्हणून आचार्य मुख्यतः ओळखले जात असले तरी त्यांचे चिंतन केवळ गांधीतत्त्वविचारांपुरतेच मर्यादित होते असे दिसत नाही. त्यांची तत्त्वज्ञानविषयक जिज्ञासा उत्कट व व्यापक होती, वाचन व व्यासंग दांडगा होता. साहित्यप्रेमाला, ज्ञानग्रहणाला मर्यादा नव्हती. बालपणी घरच्या वातावरणातून संस्कृत, मराठीतील पारंपरिक धर्मग्रंथांचे वाचन, पठण, परिशीलन झालेले होते. संस्कृतचे सखोल अध्ययन व उच्च स्तरावरील अध्यापनही त्यांनी केले होते. पाश्चात्त्य तत्त्वज्ञानातील विचारही त्यांनी पुढे आत्मसात केले. त्यामुळे गांधीविचारांमागील पारंपरिक वारसा व त्याचा आधुनिक काळाशी अनुबंध ते अधिकारी वाणीने विशद करू शकतात.

ह्या विचारांव्यतिरिक्त ते महाराष्ट्राच्या धार्मिक, वैचारिक, सामाजिक व साहित्यिक वैशिष्ट्यांचा गुणदोषांसहित ऊहापोह करतात. देशकाल परिस्थितीप्रमाणे काही नवी मूल्ये महाराष्ट्राने आत्मसात केली पाहिजेत असे त्यांना वाटते. राममोहन रॉय, रानडे, विवेकानंद, टिळक यांच्या परंपरेतून आलेला व गांधीजींनी आपल्या वैशिष्ट्यपूर्ण सत्याग्रहतंत्राने ज्यात भर घातली असा अध्यात्मिक मानवतावाद त्यांनी व्यक्तिशः स्वीकारला व तो महाराष्ट्राने व भारताने तर स्वीकारावाच पण गांधीजींच्या सत्याग्रहनिष्ठेचा स्वीकार साऱ्या जगानेही करावा असा त्यांचा आग्रह आहे. ह्या वैश्विक अध्यात्मवादात टागोरांनी आपल्या काव्य प्रतिभेने आविष्कृत केलेल्या मूल्यांची ते भर घालतात. तसेच केशवसुत, जिब्रान, सानेगुरुजी व इतर अनेक साहित्यिक व विचारवंत ह्यांच्या साहित्याचे व मूल्यकल्पनांचे परिशीलन करतात. त्यांच्या लिखाणाचा हा भाग त्यांच्या वाङ्मयाच्या दुसऱ्या खंडामध्ये येईल. गांधीजींच्या नवशिक्षणाचे ते एक प्रभावी भाष्यकार होते, वर्धाशिक्षणाची मुळे महाराष्ट्रात रुजविण्याचा त्यांनी कसोशीने प्रयत्न केला. सानेगुरुजींच्या प्रेरणेने सुरू झालेली आंतरभारती-सारखी चळवळ भारतीय एकात्मतेला पूरक आहे ह्या विश्वासाने त्यांनी तिचा आपल्या नेहमीच्या हिरिरीने प्रचार व प्रसार केला. ह्या आंदोलनामागील त्यांची तात्त्विक भूमिका दुसऱ्या खंडात येईल.

आचार्यांची गांधीवादी विचारवंत व कार्यकर्ते म्हणून जी भूमिका होती ती प्रथम लक्षात घेतली पाहिजे. श्री. आण्णासाहेब सहस्रबुद्धे यांनी आपल्या 'माझी घडण' ह्या आत्मकथेत ती विशद केली आहे. त्यांच्या मते गांधीवाद्यांचे तीन गट आहेत. त्यातला पहिला गट कम्युनिस्ट तत्त्वज्ञानाला भक्कम विरोधी असून खादी कामातही कम्युनिझम् व सोशालिझम् यांचे भय






बाळगणारा, एक वेळ सरंजामशाही व भांडवलशाही सह्य वाटते असा. दुसरा गट अध्यात्मवाद्यांचा. चित्तशुद्धी, अहंकार नष्ट करणे, वैराग्यसाधने ह्यावर विशेष भर देणारा. त्यांची व्रत-वैकल्ये फार. सर्वोदय हे त्यांचे परमार्थ साधन. सोवळेओवळे, शुद्धता यावद्दल यांचा विशेष कटाक्ष. ह्यात विनोबांसारखी श्रेष्ठ संतमंडळी आहेत. सर्व तात्त्विक प्रश्न व अध्यात्मिक साधना हे त्यांना जास्त महत्त्वाचे वाटते. गांधीवाद्यांच्या तिसऱ्या गटात आण्णासाहेब स्वतःचा, कुमारप्पा, आचार्य जावडेकर व आचार्य भागवत इत्यादी मंडळींचा समावेश करतात. "आम्ही सारी मंडळी स्थूलमानात समाजवादी आहो, आम्हाला साम्यवाद पटत नसला तरी आमची मुख्य प्रेरणा समानतेची व न्यायाची आहे, करुणा किंवा धर्माची नाही. साम्यवाद अपुरा वाटतो पण शत्रू नाही; आततायी सदोष मित्रासारखा वाटतो पण त्याची आमची प्रेरणा एकच आहे. सर्व सामान्य जनतेची क्रूर व भीषण पिळवणूक व सर्वसंहारक दारिद्र्य यांविरुद्ध आमचा लढा आहे. समाजवादाला भारतीय परिस्थितीनुसार व्यवहारात वेगळे अनुभवनिष्ठ रूप देण्याचा प्रयत्न आम्ही केला व त्यास गांधीवाद असे आम्ही मानले."

आचार्यांनी दिलेल्या मूल्यविचारांचा काहीशा तपशिलाने विचार करण्याआधी त्यांच्या मूलभूत प्रेरणांचा विचार अगत्याचा ठरेल. सुदैवाने आचार्यांनी स्वतः सौ. मृणालिनी देसाई यांना लिहिलेल्या पत्रात आपल्या प्रेरणांचे विवरण केले आहे. ते म्हणतात, आपण जरी कर्कश्शबुद्धिवादी, रुक्ष, वेदाभ्यासजड भावनाहीन वाटलो तरी आपली बैठक भावनांवरच आधारलेली आहे; ज्यांनी आपल्या आंतरजीवनात प्रवेश केला त्यांना ह्याचे प्रत्यंतर येते. आपल्या जीवनात तत्त्वप्रेम व मानवप्रेम ह्या दोन्ही प्रवृत्ती सत्ता गाजवितात. त्यांचा एकमेकाशी कलह होऊन मानसिक ताण निर्माण होतात. त्यांचा संपूर्ण समन्वय करून आपल्या जीवनाच्या अंगप्रत्यंगात त्याचा आविष्कार करणे हे आपले जीवनध्येय आहे असे आपण मानतो. ही साधना सतत चालू असते. केवळ तत्त्वप्रेमामुळे येणारी दुर्बलता या दोन्ही टोकांचा आपण त्याग केला असून तत्त्वप्रेमासाठी वैराग्य आणि मानवप्रेमासाठी भक्ती ह्या वैराग्ययुक्त भक्तीचा-अनासक्तीचा आपण स्वीकार केल्याचे ते सांगतात. आपली मनाची ठेवण अशा तऱ्हेची असल्याने त्याची भीती बाळगण्याचे कारण नाही, कारण त्यात भावनेच्या ओलाव्याला खूप स्थान असल्याची ते ग्वाही देतात. मृणालिनी देसाईंनी आपल्या जीवनात प्रवेश केला तो कालखंड (साधारण १९४०-४२ चा) आपल्या मानसिक परिवर्तनाचा अथवा परिपक्वतेचा होता. ध्येयवादी जीवनाचे आपण उपासक असूनही तेव्हापासून आपली इतरांकडे पाहण्याची दृष्टी अधिकाधिक कोमल व उदार होत चाललेली. प्रथमपासून वैराग्यप्रधान जीवनक्रम होत गेल्याने सांसारिक भावनांचा स्पर्श कित्येक वर्षे नीटसा होत नव्हता, शरीरातील पशूंशी क्वचित झगडा करावा लागे व अद्यापही करावा लागतो. पण तो सोडल्यास आपल्याला ध्येयवादी जीवनात कधी मानसिक द्वंद्व करावे लागले नाही. ध्येयवादाची हाक आल्यावर कोणतेही सुख सोडण्याला चित्ताची चटकन् तयारी होते. आता संसारातील भावनांचे शुभत्व, मंगलमयत्व आपण समजू लागलो आहे... आचार्यांचे हे आत्मविश्लेषण अत्यंत महत्त्वाचे असून त्यांच्या विचारामागील प्रेरणा समजण्याच्या दृष्टीने मोलाचे आहे.

त्यांची आप्तस्वकीयांना व मित्रांना लिहिलेली अगदी व्यक्तिगत पत्रे ह्या कोमल भावनेची साक्ष देतात. त्यातील श्री. र. ग. जोशी यांच्या आकस्मिक निधनाची वार्ता देणारे व ज्येष्ठ भगिनींना कृतज्ञतापूर्वक लिहिलेली ही दोन्ही पत्रे त्यातील कोमलतेने, हळुवारपणाने वेगळी, ललित व हृद्य वाटतात.

संकलित वाङ्मयातील प्रधान विचारसूत्रांचा उल्लेख करण्याआधी आचार्यांच्या एकूण लिखाणात काही प्रमुख विचार अथवा मूल्यसुत्रे पालुपदासारखी पुनः पुन्हा येतात, त्यांचा थोडक्यात उच्चार करणे सोयीचे ठरेल. ह्या कल्पना, ज्याला सामान्यपणे 'अध्यात्मिक' म्हणून मानले जाते त्या क्षेत्रातील आहेत. आचार्यांचा 'गांधीवादी' वेश आणि लेखातून व भाषणातून सतत वापरण्यात येणारी अध्यात्मिक परिभाषा, यांनी त्यांच्यावर पारंपरिक, हिंदुत्वाचा शिक्का मारण्याचा मोह होतो, किंवा निदान ते गांधीवादी कर्मकांड तरी कसोशीने पाळीत असतील अशी कल्पना साहजिकच होते. परंतु अध्यात्म, मोक्ष, चातुर्वर्ण्य, संन्यासधर्म, समता किंवा विज्ञान आणि वैज्ञानिक दृष्टी ह्या संकल्पनांकडे पाहण्याची त्यांची पद्धत तपासली तर ती कशी वेगळी व मौलिक आहे ह्याचे प्रत्यंतर येते. आचार्यांची मते मुख्यतः गांधीविचारांच्या परिशीलनाने बनली असली तरी त्यात व्यक्तिपूजा किंवा अंधानुकरण दिसत नाही. "मी काही राजकारणी नव्हे, राजकारण ही माझी प्रकृती नव्हे. माझी दृष्टी जीवनविषयक

प्रश्न समजावून घेणाऱ्या विद्यार्थ्यांची व शिक्षकाची आहे" असे त्यांनी म्हटले आहे. "मानवाने कोठलाही बाह्य पुस्तकी अथवा व्यक्तीविषयक प्रामाण्यवाद स्वीकारू नये; बुद्धिप्रामाण्य अथवा आत्मप्रामाण्यच मानावे" असे आपले मत असल्याचे ते सांगतात. ह्या त्यांच्या वृत्तीत त्यांचे महात्मा गांधींशी साम्य दिसून येते.

"शुद्धबुद्धीशी किंवा आत्मप्रामाण्याशी ज्याचा विग्रह होईल असे शास्त्रवचनांचे प्रामाण्य मी नाकारीन, ज्या आधारामागे बुद्धीचे पाठबळ असेल त्यामुळे दुर्बलांना बळ चढेल ते मी स्वीकारेन; पण तसे नसेल तर मात्र त्यामुळे व्यक्तीची अधोगतीच होईल" असे गांधींनी म्हटले आहे. साक्षप्रामाण्याची (Authority) अंधभक्ती म्हणजे मानसिक दौर्बल्य आहे. असेही गांधीजी पुनः पुन्हा बजावतात (हरिजन ८-१३-१९२०).

हिंदू परंपरेप्रमाणे प्रमुख अध्यात्मिक कल्पना म्हणजे पुढील चतुःसूत्री : (१) कर्मसिद्धांत (ह्यातच पुनर्जन्म सिद्धांत अंतर्भूत आहे. (२) धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चतुर्विध पुरुषार्थ (३) वर्णाश्रमधर्म (४) निष्कामकर्मयोग. इतर प्राणीसृष्टीशी तुलना करता मानवप्राण्याचे जातिविशिष्ठ अनन्यसाधारण लक्षण कोणते ? सी. ई. एम. जोडनी गांधीजींवर लिहिलेल्या निबंधात उत्तर दिले आहे. "अहंता किंवा स्वत्वाचा विस्तार. बुद्धिवादी मनुष्य, आपल्या चिंतन विषयाच्या संदर्भात जसा आपल्या बुद्धीचा विस्तार करतो त्याप्रमाणे तो स्वतःच्या बुद्धीबरोबरच विकार, मोह, आशा, इच्छा, आकांक्षा यांचाही विस्तार करतो. ह्या विस्ताराच्या प्रक्रियेत त्याची अहंता गळून पडते, स्वार्थाबद्दल अनासक्ती निर्माण होते पण तीबरोबरच काही सत्यांबद्दल, तत्त्वांबद्दल आत्यंतिक आसक्तीही निर्माण होते. ही असते नैतिक प्रेरणा, हे नैतिक बल म्हणजे मानवाचे वैशिष्ट्यपूर्ण अनन्यसाधारण लक्षण."

हे नैतिक बळ धर्माचे प्रमुख लक्षण आहे असेही म. गांधी मानतात. ब्रॅडलॉ सारखा नास्तिकसुद्धा नीतितत्त्वे मानतो तेव्हा तोही धार्मिकच मानला पाहिजे. प्रसिद्ध कार्यकर्ते गोरा (जी. रामचंद्रराव) यांच्या नास्तिकवादाला आपण चूक म्हणू शकत नाही असे गांधींनी म्हटले कारण त्यामुळे गोरांना आपल्या कार्याची प्रेरणा मिळत होती. आचार्यांनीसुद्धा अशाच तऱ्हेची कल्पना पुनःपुन्हा मांडलेली आहे असे दिसते. आत्मज्ञानी साक्षात्कारी पुरुषाची योग्यता त्याच्या नीतीविषयक संकल्पनावरून व आचारावरून ठरते असेही ते बजावतात. उदाहरणार्थ आत्मसाक्षात्कारी पुरुष करील ती नीती हे खरे नाही कारण तो सामाजिक बाबतीत पूर्वसंस्काराला महत्त्व देतो. म्हणून आत्म-साक्षात्काराबरोबर सामाजिक नीतीसुद्धा पत्करायला हवी असे आचार्यांनी म्हटले आहे.

मानवजातीचे अनन्यसाधारणत्व लक्षात घेऊन मानवी जीवनाचे काही 'साफल्य' आहे असे मानणे हिंदुधर्म परंपरेप्रमाणे अपरिहार्य ठरते. हे साफल्य म्हणजे मोक्षप्राप्ती व त्यासाठी जन्ममरणाची परंपरा तोडणे म्हणजेच कुशलतेने लौकिक व पारमार्थिक कर्म करणे. 'मोक्ष' हे हिंदू परंपरेप्रमाणे 'अंतिम' व 'परम' साफल्य आहे व त्याचे धर्म हे एकमेव साधन आहे. अर्थ व काम धर्माने नियंत्रित होतात व धर्माला साधनीभूत ठरतात. व्यक्तिगत जीवन हे सामाजिकतेत टिकते व ही सामाजिकता चातुर्वर्ण्याच्या समाजव्यवस्थेत निर्माण होते, स्थिरावते. 'चातुर्वर्ण्य मीच निर्माण केले !' असे गीतेचा ईश्वर म्हणतो. ह्या चातुर्वर्ण्याचे पालन व्हावे अशी कर्तव्यबुद्धी प्रत्येक व्यक्तीत निर्माण व्हायला हवी कारण ती समाजव्यवस्थेकरता व नैतिक उन्नतीकरता आवश्यक आहे. किंबहुना तीच सर्वोच्च नीती आहे. ही कर्तव्यबुद्धी गुणसंपदेने निर्माण होते. त्यासाठी ईश्वरकृपा, सत्संग, पूजाअर्चा, व्रतवैकल्ये, प्रार्थना-उपासना करावी लागतात. देवऋण, पितृऋण इत्यादी ऋणे फेडावी लागतात, आचारधर्म पाळावे लागतात, असे हिंदू परंपरा मानते.

अध्यात्मसाधनेच्या ह्या मार्गांपैकी निष्कामकर्मयोग गीतेने सांगितला ही गीतेची थोर देणगी आहे असे आचार्य कृतज्ञतापूर्वक मान्य करतात. अर्थकामाच्या जड प्रवृत्तींचा माणसांवर अंमल चालतो पण त्या नियंत्रित केल्या पाहिजेत. मात्र शरीराचे देणे शरीराला दिले पाहिजे परंतु प्रेमासारख्या इतर सूक्ष्म भावनांकडे लक्ष दिले पाहिजे. ह्या प्रेमवृत्तीला कुटुंब, समाज या संस्था पोषक असतील तर त्यांचे नियंत्रण माणूस स्वीकारतो व शेवटी या प्रेमजीवनाचा परिपाक विश्वजीवनाशी एकरूपता साधण्याकडे होतो. ह्या वैश्विक प्रेमदर्शनाने मानवी आत्म्याला अखंड शांती मिळते. हा समाजधर्म रामदासांनी 'नेटकाप्रपंच' ह्या संकल्पनेत सांगितला. मात्र या समाजधर्माला चातुर्वर्ण्याचा अडथळा आला हे रामदासांच्या अध्यात्माचे वैगुण्यही आचार्य पुनःपुन्हा वर्णन करतात. रामदासांनी अध्यात्मक्षेत्रातील गुरू हा केवळ ब्राह्मणच असावा, इतरांस तो

अनुक्रमणिका






अधिकार नाही असे म्हटले, त्यामुळे इतर संतांच्या मानाने त्यांच्या अध्यात्मातही उणेपणा आला. शिवराज्याचे रामदासांनी स्वागत केले परंतु तरीही राज्याभिषेकाच्यावेळी रामदासांना शिवाजीचे क्षत्रियत्व मान्य करण्यास सवडच झाली नाही ह्यावर आचार्यांचे भाष्य असे "अध्यात्मज्ञानाने समाजाचे प्रश्न सुटतातच असे नाही." ह्या उद्‌गाराने त्यांनी पारंपरिक अध्यात्माचा धिक्कारच केलेला दिसतो. अध्यात्मवादी बनणे म्हणजे प्रेमळपणा, अहिंसावृत्ती, परोपकारशीलतां अंगी बाणवणे, अशी अध्यात्माची अत्यंत इहवादी व्याख्या आचार्य करतात. त्यांच्या मते अध्यात्मसाधनेला कोठल्याही कर्मकांडाची क्लिष्टता नको असते. ती सहजसुलभ अशी असते कारण विश्वाशी एकरूप होण्यात अधिष्ठान व्यक्तीचे असते.

म्हणून आचार्यांची 'जीवनसाफल्यांची' कल्पना ही पारंपरिक कल्पनेपेक्षा वेगळी इहवादी अशीच आहे. कोणत्याही गूढ रहस्याच्या, अथवा कला किंवा आत्म्याच्या स्वातंत्र्याच्या मागे जाऊन मोक्ष साध्य होणार नाही असे रोमा रोला यांच्या अवतरणावरून ते दर्शवतात. जीवनाचे साफल्य जीवनातच शोधले पाहिजे. जीवनाचे मांगल्य व त्यावरील श्रद्धा वाढत गेली पाहिजे असा त्यांचा आग्रह आहे. शेवटच्या परिच्छेदावरून निबंधाची तात्कालिक प्रेरणा दिसते. त्याकाळी 'कलेकरता कला', नवनीतीवाद, कॉम्युनिझम या कल्पना नुकत्याच आलेल्या होत्या व त्या सर्वांवरच आचार्यांनी आपल्या जीवनवादी भूमिकेवरून उपहासात्मक टीका करून शिवरामपंत परांजप्यांच्या लयबद्ध, क्वचित प्रासयुक्त शैलीची आठवण करून दिली आहे.

चातुर्वर्ण्यव्यवस्थेचा येथील उल्लेख मात्र गौरवपर दिसतो. आश्रमव्यवस्था, धर्म, मोक्ष इत्यादी कल्पनांबरोबर ती वापरली जात असता ह्या सर्व कल्पनांनी जीवनाला समृद्ध केले ह्यात शंका नाही असे त्यांना वाटते. मात्र पुढच्या काळात तीत वैगुण्य आले म्हणून त्यांनी चातुर्वर्ण्याच्या निषेधात्मक भूमिका संतांच्या अध्यात्मिक व सामाजिक कार्याच्या मूल्यमापनाचा एक निकष म्हणून वापरली. रामदासांच्या चातुर्वर्ण्याचा त्यांनी निषेध केला आहे. तसेच संतवाङ्‌मयातील अध्यात्म हे चातुर्वर्ण्याच्या विषमतेवर आधारले होते म्हणून त्यात वैगुण्य होते, ज्ञानेश्वरांचे 'एथ भक्ती सरे जाति अप्रमाण' हे उद्‌गार जातवादाविरुद्ध नसून 'एथ' म्हणजे ह्या वाळवंटात एवढाच अर्थ घेता येईल असे त्यांना वाटते. चातुर्वर्ण्य व तज्जन्य जातिभेद झुगारून दिल्याबद्दल चक्रधर आणि त्यांचा महानुभाव संप्रदाय त्यांना श्रेष्ठ वाटतो. संन्यास घेण्याचा अधिकार चक्रधराने सर्व जातींना दिला आणि रजस्वलेचा विटाळ न मानून एक क्रांतिकारक पाऊल टाकले. महानुभाव दर्शन हे अवैदिक दर्शन असल्याने आपले मत आचार्य आग्रहाने मांडतात व संन्यास धर्म हा वैदिकधर्मातील विषमतेच्या निषेधातून आला असेही प्रतिपादन करतात म्हणून संन्यास हे अध्यात्मवादाने सामाजिक गुलामगिरीविरुद्ध केलेले बंड आहे, अध्यात्मवादी हा मनाने समाजवादी असतो पण त्याला जीवनातील विषमता दूर करता येत नाही म्हणून तो समाजसंस्थेचा त्याग करतो. विश्वातून निवृत्त झालेली जीवनशक्ती आपल्याच विलासामध्ये मग्न असताना प्राप्त होणारे आत्मसुख हीच एकमेव सद्वस्तू हा संन्यासातील शेवटचा साक्षात्कार होय. मात्र ह्यामुळे व्यवहारातील अमानुषतेशी झुंज देण्याचे काम मागे पडते म्हणून संन्यासमार्गी अध्यात्माऐवजी कर्मयोगी अध्यात्म पुढे येते, पण त्याच्यापुढे तीव्र द्वेष, हिंसा यांवर आधारलेली राज्यसंस्था, सशस्त्र युद्ध ह्या गोष्टी स्वीकाराव्या की नाही असे यक्ष प्रश्न उभे राहतात. केवळ संन्यासमार्गी अध्यात्म अपुरे, पलायनवादी ठरते, कर्मयोगी अध्यात्माची कास धरली जाते. हे दोन्ही मार्ग तटस्थ दृष्टीने पाहिले तर समाधान देऊ शकत नाहीत. कर्मयोगी अध्यात्मात हिंसाचाराला मान्यता दिलेली असल्याने हिंसाचाराला पाठबळ मिळत राहते. तेवढ्या प्रमाणात अनहंकार व अनासक्ती यांची वाढ खुंटते आणि नैतिक व्यवहारात हिंसेलाच अहिंसा म्हणण्याची विकृती निर्माण होते. हा दोष 'गीतारहस्यात' दिसतो.

कर्मयोग हा अध्यात्मिकच असला पाहिजे असे नाही. जडवादी अथवा भौतिकवादी असे अनेक क्रांतिकारी पंथ आहेत. मात्र भौतिक सुखाने मानवी जीवन संपूर्ण सुखी होऊ शकत नाही. म्हणून शारीरिक पुष्टीबरोबर आत्मिक शांती मिळावी असा ध्येयवाद्यांचा प्रयत्न असतो. म्हणून अध्यात्म हे पारलौकिक सुख नाही, ती ऐहिक जीवनातील आत्मिक शांती असून ती बुद्धिवादी माणसालाही मिळते. विकासक्षमतेबरोबर ध्येयदृष्टीची, साधनांची शुचिता वाढवली पाहिजे. लो. टिळकांनी गीतारहस्यात ही गोष्ट मान्य केलेली नाही. पापपुण्यादींच्या बंधनापलीकडे गेलेल्या स्थितप्रज्ञाने दुष्टाशी कोठल्याही प्रकारच्या साधनांनी लढावे, शठं प्रतिशाठ्य ही






नीती अवलंबावी असे त्यांनी प्रतिपादन केले. आचार्यांच्या मते हा सज्जन माणसाने मांडलेला भोंगळपणा आहे. हे मानसिक मांद्याचे लक्षण आहे व त्यामुळे गीतारहस्यापुढे जाण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे. ज्यावेळी सर्व समाजाला पुरेल इतकी भौतिक संपत्ती निर्माण करण्याची क्षमता नसते तेव्हा थोर पुरुष स्वतः संन्यासाचा स्वीकार करतात. त्यामुळे विषमतेची धार थोडी बोथट होते पण प्रश्न सुटत नाही. तो सुटण्यासाठी समाजाला लागणाऱ्या भौतिक संपत्तीचे उत्पादन करण्याच्या सुधारलेल्या मार्गाचे काम चालू ठेवले पाहिजे व त्यासाठी कर्मयोगी अध्यात्माची कास धरली पाहिजे, परंतु ह्या कर्मयोगी अध्यात्माची विकृती होऊ शकते. मुसोलिनीचा फासिझम आणि हिटलरचा नात्सीझम हे अध्यात्मिक कर्मयोगाचे विकृत नमुने आहेत. म. गांधींनी दाखवून दिलेल्या सत्याग्रह मार्गाचा अवलंब केल्याने अध्यात्मिक कर्मयोग शुद्ध राखला जाणे शक्य आहे. असाधुचा साधुत्वाने व तसे न जमल्यास असाधुत्वाने प्रतिकार या गीतारहस्याच्या सिद्धांतापुढे गांधी गेले आहेत. मोक्ष आणि लोकसंग्रह यात अविनाभाव आहे, क्रोधाला अक्रोधाने जिंकण्याचे सत्याग्रहशास्त्र गांधीजींनी दाखवून जगाला नवा मार्ग दाखवला आहे असे आचार्यांनी आग्रहाने प्रतिपादन केले आहे.

हा विचार मांडण्याआधी 'मोक्ष' कल्पना म्हणजे 'मेल्यानंतरची अवस्था' ही समजूत चुकीची असून मोक्ष म्हणजे 'जीवन्मुक्ती' असे मानले तर गोंधळ होणार नाही असे आचार्यांचे प्रतिपादन आहे. प्रत्येक व्यक्ती समाजातच विकसित होता होता सर्व बंधनांतून मुक्त होते, मुक्तावस्थेला पोचते अशासारखी कल्पना बुद्धिवाद्यांनाही आकर्षित करते. बर्ट्रांड रसेलच्या (Free Man's Worship) 'मुक्तात्म्याची उपासना' ह्या निबंधात ही कल्पना मांडली आहे. जीवन्मुक्ती ही गूढ बाब नसून ती अनुभवगम्य आहे. जीवन्मुक्ताला विश्वाची एकता, भेदात्मक विश्वाचा विलय, आणि पाप, दुःख, अपूर्णता हुरहूर इत्यादी भावनांचा अस्त ह्या गोष्टी जाणवलेल्या असतात. तो सत्याशी संपूर्णपणे समरस होऊ शकतो.

आचार्यांनी ही इहवादी अध्यात्मकल्पना महाराष्ट्राच्या भूत-वर्तमान व भविष्यकाळाला लावून संस्कृतीचा अहंकार हा महाराष्ट्राचा शाप हे मत मांडले आहे. चातुर्वर्ण्य संकल्पनेतील विषमतेने संतांचे अध्यात्म डागाळले असण्याची व्यथा व्यक्त केली आणि महाराष्ट्राने नवी सत्याग्रहनीती, समतेवर आधारलेली समाजव्यवस्था व निर्वैर अशी सर्वांवर प्रेम करणारी राजनीती अवलंबावी असे आग्रहाने प्रतिपादन केले आहे. "ब्राह्मण, मराठे, महार यांचे एकीकरण कसे करावे हा महाराष्ट्राचा प्रश्न आहे. हे एकीकरण सेवेने, सत्यानेच होईल. भारतासाठी महाराष्ट्र झटेल तर त्याचे वैभव वाढेल" असाही त्यांचा विश्वास आहे.

अध्यात्म कल्पनेच्या संदर्भात बोलताना खऱ्या अध्यात्माचे प्रतीक म्हणून आचार्य स्त्रीच्या 'जगदंबा' ह्या रूपाचा गौरवपूर्वक उल्लेख करतात. त्यांच्या मते विलासिनी संन्यासिनी किंवा राणी लक्ष्मीबाई ही स्त्रीची विकृत रूपे असून स्त्रीचे खरे रूप मातृत्वातच आहे. मातृत्वाच्या प्रतीकाशी इमान राखून स्त्रीने आपल्या मुलांच्या रक्षणासाठी पुढे होऊन पुरुषाच्या आक्रमक (पराक्रम = पर + आक्रम ) वृत्तीने होणारा जगाचा संभाव्य विनाश आग्रहपूर्वक टाळावा अशी इच्छा ते व्यक्त करतात.

आचार्यांच्या मोक्ष, अध्यात्म व संन्यास कल्पनांची म. गांधींच्या कल्पनांशी तुलना केली तर काही महत्त्वाचे साम्य व भेद दिसून येतात. गांधीजींची अहिंसा ही प्रेमकल्पनेचीच एक उच्चतर अवस्था आहे असे दिसते. त्यांची अध्यात्मसाधना म्हणजे भूतमात्राची निष्काम सेवा होती. ह्या दोन्ही कल्पना आचार्यांच्या अध्यात्म कल्पनेत आढळतात. परंतु व्यक्तिगत परम साध्याच्या दृष्टीने गांधीजी हिंदुधर्मातील परंपरा मोक्षकल्पना मानीत होते असे दिसते. आपल्या प्रवृत्तीच्या मुळाशी मोक्षाची इच्छा आहे ही गोष्ट खरी आहे परंतु तिच्याशी आपल्या व्यतिरिक्त इतरांना काही कर्तव्य नाही, असे गांधीजींनी म्हटले आहे. मी स्वतःला कधीही संन्यासी म्हणवून घेतलेले नाही. संन्यास ही याहून अधिक कठोर तपश्चर्या आहे. आपले जीवन ईश्वरोन्मुख आहे, अष्टौप्रहर कृष्णाच्या सेवेला वाहिलेले आहे, असेही ते म्हणतात.

"मी खऱ्याचा नम्र सेवक असून आत्म्याची ओळख करून घेण्याकरिता याच जन्मात मोक्ष साधण्याकरिता आतुर आहे. आत्म्याची मुक्तता व्हावी याकरिता माझी राष्ट्रसेवा आहे. मोक्ष हे मनुष्य जीवनाचे सार्थक आहे. हिंदू म्हणून मी असे मानतो की मोक्ष म्हणजे जीवन मरणाच्या रहाटगाडग्यातून मुक्ती, ईश्वरसाक्षात्कार. मोक्षासाठी शरीराची बंधनं तुटली पाहिजेत. व्रतासंबंधी आपली अनुकूलता असल्याचेही गांधीजी सांगतात. व्रते घेण्यासंबंधी माझा पक्षपात आहे हे मी कबूल

अनुक्रमणिका

करतो, असे त्यांनी म्हटले आहे."

आचार्यांच्या प्रतिपादनात मात्र जन्ममरणाच्या फेऱ्यातून मुक्ती, ईश्वरनिष्ठा, साक्षात्कार या गोष्टी येत नाहीत. ब्रह्मचर्यासारख्या व्रताचाही उल्लेख क्वचितच येतो. ईश्वर हा माणसाने निर्माण केला असल्याने कालानुरूप ईश्वरकल्पनेत वदल होणे अवश्य आहे असे त्यांचे प्रतिपादन आहे. सारे जग एकत्र असल्यामुळे मानव जातीचे एक कुटुंब निर्माण करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे. त्यासाठी नवा मानवधर्म आवश्यक आहे. ह्या धर्माची प्रेरणा देणारा नवा ईश्वर सर्व मानवांना समतेने पाहणारा, त्यांच्यातील विषमतेचा विनाश करणारा, वैराच्या व हिंसेच्या भावनांपासून अलिप्त राहणारा असला पाहिजे अशी त्यांची ईश्वरविषयक कल्पना आहे.

म. गांधींची संन्यास कल्पनासुद्धा आचार्यांच्या संन्यास कल्पनेपेक्षा भिन्न असून पारंपरिक आहे. आचार्यांचा संन्यासी, व्यवहारातील विषमतेविरुद्ध वंड करणारा आहे तर गांधीजींचा प्रथमतः ईश्वराच्या शोधासाठी संन्यासाचा स्वीकार करणारा आहे. परंतु त्याला सदैव दुसऱ्याची चिंता असल्याने तो ईश्वराप्रमाणे स्वार्थरहित कार्य करतो. म्हणूनच तो स्वराज्याची चिंता करतो. पूर्वीचे संन्यासी राजकारणाची उठाठेव करीत नसत परंतु आज राजकारणाचे सर्वव्यापी स्वरूप लक्षात घेतले तर संन्याशाने राजकारणही केले पाहिजे. चातुर्वर्ण्याच्या चार आश्रमातील संन्यास ह्या चौथ्या आश्रमावद्दल सांगताना पती-पत्नींनी लोकात धार्मिक जीवनाचा प्रसार करावा, आदर्श जीवनावर भर द्यावा असे गांधीजी सांगतात. राजकारणात त्याने भाग घ्यावा असे म्हटल्यावर आचार्यांनी म्हटल्याप्रमाणे संघर्ष व वंडखोरीही त्याला आवश्यक ठरते. पण हे गांधीजींनी स्पष्टपणे न मांडता अध्याहृत ठेवलेले दिसते. "संन्यासी हा समाजाचा हितचिंतक आणि सर्वोत्कृष्ट सेवक असल्यामुळे त्याने राजसत्तेशी जो संवंध आहे त्याकडे लक्ष पुरवले पाहिजे" एवढेच ते म्हणतात.

संन्यासावद्दलची ही चर्चा एका दृष्टीने फार महत्त्वाची आहे. गांधीजींचा आणि त्यांच्या अनुयायांचा जनमानसावर जो दीर्घकालीन प्रभाव दिसून येतो त्याचे एक प्रमुख कारण त्यांचा यतिवेश, व्रतवैकल्ये, उपासासारखे आत्मक्लेशाचे मार्ग. गांधीजींच्या बाह्य स्वरूपात व विचारसरणीत एक प्रतीकात्मता दिसून येते. सत्याग्रह आंदोलनाची सुरुवात अनेकवेळा नाट्यपूर्ण पद्धतीने होई व सामान्य व्यक्तीने समुद्रातून मीठ काढून ते विकणे ह्यासारखे त्यांचे निमित्तकारण हे प्रतीकात्मक असे. खादी, ग्रामोद्योग, चरखा, काठी किंवा शेळी आणि तिचे दूध, उपवास, ब्रह्मचर्य व्रतपालन ह्या साऱ्याच गोष्टींचा प्रतीकात्मक प्रभाव जनमानसावर दीर्घकालापर्यंत पडलेला दिसतो. गांधीजींच्या सर्व व्यंगचित्रकारांना आणि चरित्रकारांना ह्या गोष्टीचे मोठे आकर्षण दिसून येते. भारतीय जीवनात आधुनिक काळातही संन्यस्त जीवनाचे फार मोठे आकर्षण आहे हे शिक्षणक्षेत्रातील आजीव सेवक कल्पनेचा १९ व्या शतकातील उदय किंवा आदर्श समाजसेवकांची सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीची गोखल्यांची कल्पना, तसेच लो. टिळकांनी पुरस्कार केलेली 'ग्रॅज्युएट रामदासी' ची आवश्यकता व आचार्य जावडेकरांचा राजकारणातील 'अहिंसक यतींवर' भर ह्यावरून दिसते.

आचार्यांच्या व गांधीजींच्या कल्पनांत सर्वांत महत्त्वाचा फरक दिसतो तो त्यांच्या विज्ञानविषयक भूमिकेत. आचार्य आधुनिक विज्ञानाने दिलेल्या दृष्टीचे व त्याने आणलेल्या नव्या जगाचे, समृद्धीचे मनापासून स्वागत करतात. त्यांच्या मते विज्ञानामुळे सृष्टीची गूढे उकलली, सृष्टीवर तावा मिळाला आणि माणसाला सृष्टीचा गुलाम होण्याची आवश्यकता राहिली नाही. ह्यामुळे बुद्धीला महत्त्वाचे स्थान मिळाले, सुख हे त्याज्य नाही अशी विचारसरणी होत आहे. अध्यात्माचा अधिक्षेप, जडवादाचा पुरस्कार, भौतिक सुखाची समान वाटणी करण्याची हाकाटी हा नव्या संस्कृतीचा संदेश आहे असे सांगण्यात येत आहे. नव्याजुन्याच्या विरोधातून समतेवर आधारलेली नवी संस्कृती निर्माण व्हावयाची आहे असा आचार्यांचा विश्वास आहे. केवळ वौद्धिकसुखांच्या सेवनाने मनुष्य संतुष्ट होत नाही. तो ज्ञान, सेवा, प्रेम यांच्याद्वारा कृतार्थ होतो. ही मूल्ये जडवाद व अध्यात्म ह्या दोहोंनाही मान्य आहेत. म्हणून प्रत्येक घटकाला त्यांच्या अधिकाराप्रमाणे नीती ठरविण्याचे स्वातंत्र्य मिळाले पाहिजे. सर्व क्षेत्रांतील विषमता नष्ट झाली पाहिजे. स्त्री, शूद्र, अंत्यज इत्यादी, दलित वर्गातील स्वातंत्र्याच्या भावनेला वाव देऊन योग्य वळण लावले पाहिजे. समाजातील हिंसेचा प्रतिकार सर्वव्यापक समतेने व अहिंसेच्या श्रेष्ठ मंत्राने केला पाहिजे. समाजाला अध्यात्मिक अनुभवांकडे नेण्याचा हाच मार्ग आहे व हे उद्याच्या संस्कृतीत शक्य आहे.

विज्ञानाच्या सामर्थ्याने हिंस्र वृत्ती वळावली, राष्ट्रवादाने आसुरी रूप धारण केले. शस्त्रवळाने धुंद झालेल्या

सत्ताधाऱ्यांचा जनसामान्यांनी निषेध केला पाहिजे, नव्या महाराष्ट्राच्या जीवननिष्ठेचे हे ब्रीद झाले पाहिजे. विज्ञानाच्या बळाने दुर्बल मानवाने निसर्गावर विजय मिळवले, बाह्य भौतिक विश्वाशी चाललेला संघर्ष बहुतेक संपला, त्यामुळे समतेवर अधिष्ठित समाज शक्यतेच्या कोटीत आला; परंतु नुसते विज्ञान ही आंधळी शक्ती असल्याने तिला दिशा दाखवणे अध्यात्माला शक्य आहे. भौतिक विज्ञान व मानवप्रीती यांनी मानवापुढील प्रश्न सुटल्यासारखा आहे. हाच गांधीजींच्या सत्याग्रहाचा अर्थ आहे, असे आचार्यांना वाटते.

'अध्यात्म व विज्ञान' ह्या विषयावरील आचार्यांचे प्रतिपादन (१९५२) महत्त्वाचे आहे. अध्यात्मवाद हे जीवनाचे एक अत्यंत उच्च दर्शन आहे. मनुष्य हा त्याचा द्रष्टा आहे. प्रत्येक जीवनात हा अर्थ बाणला जाऊन जीवनाची परिपूर्णता व्हावी असे अध्यात्मवादाचे म्हणणे आहे. म्हणून प्रत्येक व्यक्तीने विश्वाशी एकरूप व्हायला हवे. मानवी मनाच्या प्रवृत्ती व निवृत्ती ह्या दोन जाणिवा असून प्रवृत्ती ही बहिर्मुख जाणीव आहे. तिच्यातून विज्ञान निर्माण होते तर निवृत्ती ही आंतरिक असून ती आत्मज्ञानापर्यंत नेते. जीवनसत्याचा शोध घेणारी ही दोन दर्शने असल्याने त्यांच्यात विरोध नाही. भारतातील नवजागरणाच्या अध्वर्यूंनी - राजाराममोहन रॉय, रामकृष्ण, विवेकानंद, टिळक इत्यादींनी - आत्मज्ञान व विज्ञान यांचा हा समन्वय स्वीकारला. ह्या दोन्हींच्या शोधपद्धती वेगळ्या असल्या तरी अंतिम निष्कर्षाच्या दृष्टीने त्या परस्परांना पूरकच आहेत. प्राचीन काळापासून प्रवृत्ती व निवृत्ती यांच्या साधनेत समन्वय साधण्याचा प्रयत्न झालेला आहे. ईशावास्योपनिषदाने तो वेदकाली ठसठशीतपणे मान्य केला आहे. भौतिक आणि आत्मिक ह्या एकाच जीवनसत्याच्या दोन बाजू असल्याने त्यात परस्परविरोध संभवत नाही. गांधीजींच्या भाषेत यालाच सत्य आणि अहिंसा हे दोन शब्द वापरले आहेत. त्यांच्यामध्ये प्रज्ञा व करुणा यांचे मनोहर मिश्रण आहे व विज्ञान व अध्यात्म ह्यांच्या पद्धती मात्र वेगळ्या आहेत. विज्ञान विश्लेषणात्मक तर अध्यात्म संश्लेशणात्मक आहे. पण ह्या दोन्हीतून घडणारे जीवनदर्शन एकात्मच आहे.

नव्या पिढीतील जवाहरलाल नेहरूंकडे देशाची सूत्रे सोपवून व विनोबांच्या अध्यात्माला मान्यता देऊन गांधीजींनी विज्ञान व अध्यात्म यांच्या समन्वयाला मान्यता दिली व अशा तऱ्हेने आपल्या ह्या दोन उत्तराधिकाऱ्यांवर विज्ञान व आत्मज्ञान यांच्या संवर्धनाची जबाबदारी टाकली. ह्यामुळे भारताच्या दारिद्र्याचे, विषमतेचे प्रश्न सुटतील एवढेच नव्हे तर जागतिक शांतताही शक्य होईल अशा विश्वासही ते प्रकट करतात. मात्र केवळ अध्यात्मवादी मार्गाने हा प्रश्न सुटणार नसून आत्मसाक्षात्कारावरोवर सामाजिक समतेची तळमळ हे जीवनाचे मूल्य म्हणून स्वीकारले पाहिजे असा त्यांचा आग्रह आहे. नव्या महाराष्ट्राच्या जीवननिष्ठेत संघराज्याला समाजवादी लोकशाहीचा आकार देण्यासाठी महाराष्ट्राने आपला वाटा उचलला पाहिजे. महाराष्ट्रीय संस्कृतीच्या नव्या युगात जातिसंस्थेचे उच्चाटन झाले पाहिजे, बुद्धिप्रामाण्याने त्याज्य ठरविलेला कोणताही विचार व संस्था फेकून देण्याचे सामर्थ्य मिळवले पाहिजे, विज्ञानाच्या विविध क्षेत्रांत आपली बुद्धी अप्रतिहतपणे संचरविली पाहिजे असा आचार्यांचा आग्रह आहे.

मात्र जवाहरलाल नेहरूंना आपले राजकीय वारस निवडण्यात गांधीजींनी विज्ञानाचा मोकळेपणाने स्वीकार केला; विनोबांकडे आत्मज्ञान व नेहरूंकडे विज्ञान अशी विभागणी त्यांनी केली हे आचार्यांचे मत अतिशयोक्त वाटते. गांधीजींच्या विपुल लिखाणात विज्ञानासंबंधी फारच थोडे उल्लेख आढळतात, त्यांचा उल्लेख पुढे येईल.

गांधीजींच्या राजकारण आणि आत्मवाद ह्यांतील नेहरू व विनोबा ह्या उत्तराधिकाऱ्यांचा उल्लेख पुन्हा "भारतातील नवजागरण व म. गांधी" ह्या १९६९ मध्ये लिहिलेल्या लेखात आचार्य करतात तो आधी पाहिला पाहिजे. तेथे मात्र ते अधिक वास्तववादी वाटतात कारण ह्या दोघाही उत्तराधिकाऱ्यांना अपेक्षित यश आलेले नाही, असे त्यांनी म्हटले आहे. नेहरूंच्या अपयशाबद्दल आचार्य म्हणतात की, नेहरूंना अंतर्गत आर्थिक नियोजनात विरोधी हितसंबंधांचा समन्वय साधण्यात अपेक्षित यश आले नाही. याची काही कारणे जागतिक सत्तास्पर्धेत आढळतात. अंतर्गत प्रश्न सोडवण्यात आपण अधिकाधिक अपयशी ठरत आहो. हे जर राजकारणी पुढाऱ्यांना जमत नसले तर विचारवंतांनी, पुढे येऊन जनतेकडे जाऊन तिचे बौद्धिक मार्गदर्शन करावे असा आचार्यांचा आग्रह दिसतो. अणुविज्ञानाने मानवजातीच्या सर्व सांस्कृतिक विचारांत क्रांती झाली असून विज्ञानाच्या सामर्थ्याने दारिद्र्य, दैन्य यांचे चिन्हसुद्धा राहण्याचे कारण नाही असे आचार्य म्हणत. लेखाच्या शेवटी ह्या विवेचनाबद्दल शंका म्हणजे एकतर नेहरू



अनुक्रमणिका

व विनोबा यांच्या अपयशांची ही मीमांसा अपुरी वाटते. दोघांचीही प्रवृत्तीदोषामुळे समाज विघातक शक्तींशी, संघर्ष करण्याची तयारी नव्हती असेही कारण संभवते. त्याशिवाय मूलभूत मुद्दा असा की, विज्ञानाने (म्हणजे पर्यायाने तंत्रज्ञानाने व यंत्राने) निर्माण केलेल्या समृद्धीचा आचार्यांनी केला तसा गांधीजींनी मोकळ्या मनाने स्वीकार केला होता. काय? "वैज्ञानिक पद्धतीने शिकवल्या गेलेल्या उद्योगातून व्यक्तीची सारी गुणवैशिष्ट्ये विकसित होणे ही खरी शिक्षणाची कसोटी आहे." असे म्हणून गांधीजींनी वैज्ञानिक दृष्टीचे समर्थन केले आहे. (हरिजन, ११-६-३८); परंतु, १९०८ साली लिहिलेल्या 'हिंद स्वराज्य' ह्या पुस्तकात त्यांनी आधुनिक तंत्रज्ञान व त्यावर आधारलेल्या रेल्वेसारख्या यांत्रिक सुधारणांचा निषेधच केला आहे. ह्या पुस्तकातील विवेचनात आपण एखाद्या शब्दाचाच बदल करू असे त्यांनी १९३४ साली म्हटले. म्यूर सेंट्रल कॉलेजमध्ये अर्थशास्त्राच्या परिषदेत १९१६ साली बोलताना भौतिक शास्त्रज्ञ रसेल वॉलेस यांचे मत उद्धृत करून गांधीजी म्हणतात की, भौतिक शास्त्रांच्या प्रगतीने सामाजिक अनीतीचे कित्येक अभूतपूर्व व भयंकर प्रकार मानवसमाजात शिरले, गिरण्यांची व कारखान्यांची उभारणी जणू काही माणसांच्या प्रेतांवर करण्यात आली आहे व संपत्तीच्या वाढीइतकीच झपाट्याने नैतिक अवनती दिसून येत आहे. ईश्वराची व लक्ष्मीची (संपत्तीची) आराधना तुम्हाला एकाच वेळी करता येणार नाही.

संशोधकांच्या व शास्त्रज्ञांच्या मेळाव्यापुढे बोलताना १९२७ मध्ये, गांधीजींनी त्यांना उपदेश केला की, "तुमचे संशोधन करताना दरिद्री नारायणाची सदैव आठवण ठेवा. तुम्हाला मोठमोठी विनतारी यंत्रे शोधून काढता येतील, त्यासाठी बाह्य संशोधनाची आवश्यकता नाही. पण आंतरिक संशोधन मात्र हवे, ह्या संशोधनामुळे तुमची हृदये कोट्यवधी जनतेच्या हृदयाशी जोडता येतील. म्हणून तुमच्या सर्व शोधांतून जर तुम्हाला गरिबांचे हित साधता आले नाही तर तुमच्या उद्योगशाळा म्हणजे सैतानाच्या शाळा ठरतील..."

रचनात्मक कार्यापैकी खादी व वस्त्र स्वावलंबनाची भूमिका ह्यांविषयी आचार्यांनी जी मीमांसा केलेली आहे तिचा ह्या संदर्भात विचार करणे योग्य होईल. हे दोन्ही लेख साधारणपणे प्रचारात्मक पद्धतीचे असून खादी व ग्रामोद्योगांना स्वराज्यसाधनेपूर्वी दिलेले अतोनात महत्त्व त्यात दिसून येते. ह्या गोष्टीला ऐतिहासिक पार्श्वभूमी आहे. आफ्रिकेतून भारतात परत आल्यावर गांधीजींना आढळले की, येथील पारंपरिक ग्रामोद्योगांचे, कापड व्यवसायाचे पद्धतशीरपणे खच्चीकरण इंग्रज राज्यकर्त्यांनी केलेले होते. भारतातील कारखानदारी व अन्य उद्योगधंदे बाल्यावस्थेत होते. त्यामुळे बहुसंख्य ग्रामीण जनतेला वर्षातील ७-८ महिन्यांपेक्षा अधिक काम नसायचे. ह्या सक्तीच्या बेकारीवर उपाय म्हणून गांधीजींनी हस्तव्यवसाय, खादी व ग्रामोद्योग यांचा रचनात्मक कार्यक्रम ग्रामीण जनतेला दिला व काही प्रमाणात रोजगार व अर्थोत्पादनाची शक्यता निर्माण केली. इंग्रज साम्राज्यशाहीच्या विरोधाचे एक प्रतीक म्हणून चरखा, सूत-कताई इत्यादींना महत्त्व चढले परंतु आपले ब्रीद म्हणून काँग्रेसने खादीचा स्वीकार केला नाही. खादीच्या प्रतीकात्मतेचा गौरव नेहरूंनी 'स्वराज्याचा आर्यवेष' (लिव्हरी ऑफ फ्रीडम) म्हणून केला. स्वातंत्र्योत्तर नियोजन काळात खादी व ग्रामोद्योगाला स्थान देण्यात आले परंतु त्याचे सरकारीकरण झाल्याने त्यातील आत्माच हरवून गेल्यासारखे झाले.

स्वराज्यात खादी-ग्रामोद्योग व यंत्रासंबंधी गांधीजींनी काही नवा विचार मांडला असता. तशा तऱ्हेचे त्यांचे चिंतन चालू होते असे काही उल्लेख आढळतात. श्री. ना.ग.गोरे यांनी 'गांधीजींच्या मनाचा एक पैलू' ह्या लेखात गांधीजींच्या आगाखान पॅलेसमधील वास्तवात, डॉ. सुशिला नायर यांनी लिहिलेल्या दैनंदिनीतील अशा स्वरूपाचे काही उतारे उद्धृत केले आहेत. "गरिबीच्या प्रश्नांचे उत्तर फक्त चरखा आणि ग्रामोद्योगांच्या बळावर आपण देऊ शकणार नाही... जमिनीचा प्रश्नही आपण विचारात घेतला पाहिजे." असे गांधीजी प्यारेलालना म्हणाले. किमान गरजा निश्चित करून त्यावर लहान यंत्रे निर्माण करण्याच्या आवश्यकतेसंबंधी प्यारेलालनी गांधींना विचारले. तेव्हा गांधीजींनी किमान गरजांबद्दल सांगितले : सगळ्यांना पोटभर धान्य, अर्धा शेर दूध व फळे, शाकभाजी, तूप, तेल, साखर मिळावी. कपडा शिवाय चांगले घर ह्या किमान गरजा असाव्यात. सर्वांना फुरसत मिळावी म्हणजे त्यांना अभ्यास करून स्वतःच्या बुद्धीचा विकास साधता येईल. मात्र अमेरिकेप्रमाणे प्रत्येकाला मोटर हे आपले ध्येय नसल्याचा त्यांनी उल्लेख केला. ह्या संभाषणातील शेवटचा मुद्दा विश्वस्तकल्पनेसंबंधी आहे. श्रीमंतांनी स्वखुशीने जर आपल्या संपत्तीपैकी गरजेपेक्षा अधिक भाग वाटला नाही तर त्यांना








आंतरविग्रहाला तोंड द्यावे लागते असे गांधीजींनी सांगितले. लेखात शेवटी सांगितले आहे की स्वातंत्र्यप्राप्तीनंतर काँग्रेस पक्षाचे विसर्जन करून तो लोकसेवकांचा पक्ष व्हावा असे गांधीजींनी म्हटले होते. ह्या लोकसेवकांनी व आश्रमातून तयार झालेल्या आपल्या अनुयायांनी लोकसेवेने लोकांचे प्रश्न सोडविण्याचे कार्य करावे अशी गांधीजींची कल्पना होती. मात्र औद्योगिक 'समाजातील मोठी यंत्रे, शहरे, सर्वांची सुखोपभोगांकडे लागलेली दृष्टी ह्यावद्दल गांधीजी साशंकच असत. ज्यांनी पिळवणूक व शोषण होणार नाही अशा यंत्राला आपला विरोध नाही असे ते म्हणत.

मोठे उद्योगधंदे आणि ग्रामोद्योग यांच्या परस्पर संवंधांवद्दल विचार मांडताना अनेक विचारवंतांनी (उदा. गुनार मिर्दाल) ह्या दोन्हींचा नेहमीच विग्रह असण्याचे कारण नाही असे प्रतिपादन केले आहे. ह्या दोन्हींची कार्यक्षेत्रे आखून दिली आणि ग्रामोद्योगांना योग्य ते संरक्षण दिले तर पारंपरिक हस्तकौशल्य व लहान यंत्रे यांच्या सहाय्याने ग्रामीण जनतेला व्यवसाय, रोजगारी देता येईल परंतु त्यासाठी केंद्र व राज्य सरकारांनी वड्या उद्योगधंद्यावर योग्य ते नियंत्रण घालण्याची आवश्यकता आहे व हीच गोष्ट दुर्दैवाने आजवर साध्य झालेली नाही. कारण इतकी वलशाली यंत्रणा भारतात अद्याप निर्माण झालेली नाही.

आचार्यांनी गांधीजींच्या विचारांच्या आधारे रचनात्मक कार्याचा व ग्रामीण उद्योगधंद्याचा पुरस्कार करून प्राथमिक गरजांच्या वावतीत प्रत्येक व्यक्ती स्वतंत्र झाली पाहिजे, व आधुनिक कारखानदारीच्या शोषणापासून मुक्ती मिळवली पाहिजे, केंद्रीकरण उत्पादन वाढवित असले तरी त्यामुळे व्यक्तिस्वातंत्र्याचा वळी जातो अशा तऱ्हेचे विवेचन केले आहे. परंतु केवळ ग्रामोद्योगांनी भारताच्या दारिद्र्याचा सर्वंकष प्रश्न सुटेल की नाही याचा विचार आचार्यांनी किंवा गांधीजींनी केलेला दिसत नाही. ज्ञान, सौंदर्य, शुचिता ह्या गोष्टी ग्रामोद्योगांनी साधण्यासारख्या आहेत असा दोघांचाही विश्वास आहे. रचनात्मक कार्यातील नवशिक्षणावर दिलेला भर ही म. गांधींनी शिक्षणविचाराला दिलेली मोठी देणगी आहे व तिचा यथार्थ गौरव आचार्यांनी समर्थपणे केला आहे. नवशिक्षणात जीवनातील महत्त्वाच्या प्राथमिक अंगांचे ज्ञान व सर्व अंगांची परस्परांशी सुसंगतता यांचा आग्रह गांधीजींनी धरला हा आधुनिक शिक्षणाच्या अतितज्ज्ञतेच्या विकृतीवर उतारा आहे असे आचार्यांना वाटते. एकत्व व पृथकत्व ह्या दोन्हींचे शिक्षण म्हणजे नवशिक्षण असे गांधीजींचे मत त्यांनी मांडले आहे. ह्या शिक्षणात रवींद्रनाथांच्या निसर्गाशी एकरूपतेचा विचार आहे. त्याच्यायोगे विद्यार्थ्यांची सर्जनशीलता वाढीला लागेल. गांधीजींच्या सामाजिक जीवनास व शारीरिक श्रमास प्राधान्य देण्याच्या आग्रहाने शोषणविरहित समाजनिर्मिती शक्य होईल. मानवाने स्वतःचे दर्शन करून घेतले पाहिजे व त्यासाठी बुद्धिमत्ता व करुणा यांचे मिश्रण झाले पाहिजे, ह्या कृष्णमूर्तींच्या त्रिसूत्रीवर आचार्यांनी भर दिला आहे. जीवनाचे संशोधन, जीवनाशी सहकार्य व जीवनाची समृद्धी यांच्या अद्वैताने पूर्वी असलेला जीवनाचा शिक्षणाशी असलेला पण आता सुटलेला वंध पुन्हा जोडण्याचा त्यात प्रयत्न आहे. ह्या योजनेचा तपशीलवार आराखडा ज्या झाकीर हुसेन समितीने (१९३७) साली केला त्यात भौतिक परिसर व सामाजिक परिसर यांच्या अभ्यासावर व हस्तोद्योगांवर भर दिला आहे व त्यासाठी आवश्यक ते विज्ञानांतर्गत विषयही अभ्यासक्रमात अंतर्भूत केले आहेत. आजची शिक्षणपद्धती शहरी व ग्रामीण ह्या दोन्ही परिसरातील विद्यार्थ्यांना एकाच तऱ्हेचा शिक्षणक्रम शिकण्याची सक्ती करते, भिन्न-भिन्न विभागांतील भाषिक वदलांचा, सांस्कृतिक मूल्यकल्पनांच्या भिन्नत्वाचा विचारही करीत नाही. ह्या दोहोंवर उतारा म्हणून मूल्योद्योगपद्धती स्वागतार्ह होती परंतु तिच्यावद्दल सहानुभूती नसलेल्या शिक्षणक्षेत्रातील मंडळींकडून ती यांत्रिक शुष्कतेने रावविली गेल्यामुळे निष्प्राण सांगाडा तेवढा उरला असे म्हणावे लागते. आचार्यांचा 'इंग्रजीचे आजच्या शिक्षणातील स्थान' हा शेवटचा लेख व विशेषतः जीवनाच्या साऱ्या क्षेत्रांत प्रांतीय भाषाच राजमान्य आणि लोकमान्य होऊन राहतील हा विश्वास (१९३९) आज पन्नास पंचावन्न वर्षांनी उपहासात्मक वाटावा अशी दुर्दैवाने परिस्थिती आहे.

ह्या विभागातील मौनी विद्यापीठाचे ध्येयवाक्य 'शान्तोऽयम् आत्मा' आणि 'जीवन विद्येची दीक्षा' हे दोन लेख म्हणजे भारतीय विचारपरंपरेचे आधुनिक संदर्भात विवरण कसे होऊ शकेल यांचे उत्तम नमुने आहेत. 'शान्तोऽयम् आत्मा' हे वैदिक वचन मौनी विद्यापीठाचा मुद्रालेख म्हणून आचार्यांनी निवडले. आज आपल्याला अंतरंग आणि वाह्य परिसर यांचा ढळलेला समन्वय पुन्हा साधण्यासाठी अद्वैतवाद व शांती यांची आवश्यकता आहे. ह्या कल्पना ह्या वचनात



अनुक्रमणिका

सामावल्या आहेत म्हणून, व्यक्तिजीवनाचा संबंध विश्वजीवनाशी जोडण्याच्या आवश्यकतेवर आचार्यांनी भर दिला आहे. शांतितत्त्वाची ही उपासना पाश्चात्त्य देशांनीही मान्य केली आहे अशी आचार्यांची धारणा आहे. नाना विग्रहांनी आणि आंतरविरोधांनी त्रस्त झालेल्या आजच्या जगाला शांतिवादाचे पाठ कितपत रुचतील असा प्रश्न निघण्याचा संभव आहे. हा प्रश्न आचार्यांनी उपस्थित केलेला नाही परंतु "शांती म्हणजे कर्मातून किंवा जगातून सुटणे असा अर्थ नसून स्वातंत्र्याने, ज्ञानपूर्वक अनासक्त राहून कर्म करणे असा आहे, मुक्ती म्हणते मृत्योः मृत्युः मरणाचे मरण- असा अर्थ आहे. जीवनाचे मरण असा नाही," असे विनोबांनी म्हटले आहे. हाच जीवनाचा आशय आचार्यांना अभिप्रेत असावा.

'जीवनाची त्रिपदा गायत्री' ह्या लेखात विद्यार्थ्यांचे अध्ययन पूर्ण झाल्यावर त्याला घरी पाठवताना गुरू शिष्यांना जो उपदेश करीत असत तो तैत्तिरीय उपनिषदावरून घेतला आहे. त्याचा आधुनिक संदर्भ पुढील प्रमाणे आहे: जीवनाचा भंगून गेलेला छंद पुन्हा जोडणे, जीवनाचे संशोधन, जीवनाशी सहकार्य व जीवनाची समृद्धी ह्यांचे अद्वैत पुन्हा साधणे, ज्ञान व आवश्यक भोग, कलोपासना, आत्मिक उन्नती साधणे ही शिक्षणाची तत्त्वे ह्या उपदेशात सांगितली आहेत.

अशा तऱ्हेने आचार्यांच्या लिखाणात पुनःपुन्हा आलेली ही विचारसूत्रे एकत्रित केल्यास त्यांच्या वेगवेगळ्या काळातील लिखाणांची व व्याख्यानांची व्यवस्थित संगती लावता येते.

संकलित वाङ्मयाची सुरुवात त्यांच्या बालपणाच्या एकमेव काव्याने झाली आहे. लोकमान्यांच्या नेतृत्वाचे गुण वर्णिताना जनता देवीने त्यांची आजन्म लोकसेवा, तीसाठी त्यांनी पत्करलेला राजरोष, सोसलेली दुःखे व तरीही सुखाने कारागृहात जाण्याची तयारी, जनता हीच परमेश्वर हा ज्याचा विश्वास व त्यासाठी रात्रंदिवस झटून सेवा करण्याची तयारी यांचा उल्लेख केला आहे. त्यांचे मेरुसारखे धैर्य, रामासारखे शौर्य आणि बृहस्पतीसारखी बुद्धी, राजमान्यतेपासून विन्मुखता आणि स्वार्थाचा लवलेश नसणे ह्या गुणसमुच्चयांचाही त्यांनी उल्लेख केला आहे. त्याआधी गणपतीतील मेळ्यांच्या पद्धतीने प्रागतिक पुढाऱ्यांचा इंग्रज धार्जिणेपणा त्यांचा डामडौल, सुधारकी चाळे यांचे वक्रोक्ती, व्याजोक्ती, विडंबन इत्यादी अस्त्रे वापरून उपहास केला आहे. सुदैवाने ही उपहासपद्धती आचार्यांनी पुढे कधी वापरली नाही.

गांधीजींच्या नेतृत्त्वाचा स्वीकार केल्यावर त्यांच्या-संबंधीचे लेख हा आचार्यांचा लिखाणाचा व वक्तृत्वाचा प्रमुख विषय झाला व तो चौथ्या भागात समाविष्ट आहे. गांधीजींच्या गुणसमुच्चयाचे वर्णन करताना पूर्वी आलेल्या बऱ्याच कल्पनांचा पुनरुच्चार झाला आहे. गांधीजींनी केलेला गीतेच्या अनासक्तीचा व अहिंसेचा आग्रह, तसेच आज भौतिक सुबत्तेने मानवी व्यवहारात प्रथमच समता व अहिंसा प्रत्यक्षात येण्याची शक्यता आचार्यांनी पूर्वीच वर्णन केली आहे. गांधीजींची निर्वैर वृत्ती व प्रतिस्पर्ध्याला प्रेमाने जिंकण्याची जिद्द आपल्याला लोकमान्यांच्या गुणापेक्षा अधिक प्रमाणात पटली असे त्यांनी सूचित केले. ह्या दृष्टीने त्यांना गांधीजींच्या जीवनशुद्धीचा प्रयोग महत्त्वाचा वाटतो आणि विश्वजीवनाच्या महान यात्रेत गांधीजी युगपुरुषाप्रमाणे भासतात. ह्या यात्रेत भाग घेऊन त्यांनी जनसामान्यांना जीवनसाफल्याचा मार्ग दाखवला. त्यांचे जीवन विश्वजीवनाशी एकरूप झाले होते म्हणून त्यांच्या सुखात (आणि दुःखातही) विश्वाचे सुख सामावले आहे असे आचार्यांचे प्रतिपादन आहे. त्यांच्या जीवनशुद्धीच्या प्रयोगामुळे त्यांना आजच्या जगातील भौतिकतेवर आधारलेल्या शाक्तधर्माचा मुकाबला करण्याची नैतिक निष्ठा शोधून काढता आली. त्यांच्या जीवनशुद्धीच्या प्रयोगाची सुरुवात द. आफ्रिकेतील सत्याग्रहाने झाली व पुढे भारतातील सत्याग्रह दर्शनाने सर्व आर्थिक, सामाजिक, राजकीय, धार्मिक विचारांना समान स्थान देऊन आपापल्या वृत्तीप्रमाणे कार्य करण्याची सोय केली.

'कर्मयोगातून सत्याग्रहा'कडे या लेखात आचार्यांनी एक नवा विचार मांडला आहे. टिळकांच्या गीतारहस्यात क्षत्रियांच्या कर्मयोगाचा विचार केलेला आहे. परंतु संपूर्णपणे अहिंसेवर आधारलेल्या ब्राह्मण धर्मातील कर्मयोगाचा विचार केलेला नाही. तसेच क्षत्रिय व ब्राह्मण यांनाच संन्यासाचा अधिकार गीतेने दिला आहे याचाही उल्लेख गीतारहस्यात नाही ही त्याची उणीव आहे म्हणून गांधींचे सत्याग्रहशास्त्र हे टिळकांच्या कर्मयोगाचेच एक अधिक सुसंस्कृत रूप आहे असे आचार्यांना वाटते.

ह्या बहुतेक लेखात गांधीजींच्या गुणसमुच्चयाची स्तुती आढळते. त्यामानाने 'भारतातील जनजागरण व म. गांधी' हा गांधींच्या जन्मशताब्दीच्या वेळी (१९६९) लिहिलेला लेख अधिक चिकित्सक वाटतो. इंग्रजांच्या आगमनानेच भारतातील सर्वच क्षेत्रात पाश्चात्त्य विद्येच्या संस्काराने जीवनाकडे

पाहण्याची नवी दृष्टी आली, जीवनाच्या सर्वच अंगांचा नव्याने विचार करण्याचो, आत्मनिरीक्षणाची आवश्यकता वाटू लागली. भारतातील अध्यात्मिक जीवनात विविध धारांचे मीलन झाल्याची जाणीव झाली. गांधीजींचा ह्याबाबतीत वाटा म्हणजे अध्यात्मिक ध्येये व्यवहारात आणण्याजोगी नसली तर ती असत्य ठरतील हे म्हणणे व ती सामाजिक जीवनात मूर्त स्वरूपात कशी उभी करता येतील ह्याचा शोध घेणे. गांधीजींनी सनदशीर चळवळ व दहशतवाद यांची कोंडी फोडून जनतेला एक विशाल, विधायक कार्यक्रम दिला, वहिष्कार योगाला अहिंसेची दीक्षा दिली, रशियातून आलेली साम्यवादी विचारधारा राष्ट्रीय चळवळीत सामावून घेण्याचा यशस्वी प्रयत्न केला. येथे नेहरूंचे त्यांना साह्य झाले. राष्ट्रवादी व समाजवादी शक्ती एकमेकांच्या पूरक करण्याचे कार्य सफल झाले. 'गरीबाच्या उद्धारासाठी स्वराज्य' ही घोषणा सर्वांपर्यंत गेली. परंतु दुसऱ्या महायुद्धानंतर राष्ट्रीय ऐक्याचा पाया त्यांना अभंग ठेवता आला नाही. हा तत्त्वतः गांधीजींचा पराभव म्हणावा लागेल. पण द्विखंड हिंदुस्थानात मैत्री व्हावी म्हणून ते झटत असताना त्यांची हत्त्या झाली.

जवाहरलाल नेहरू आणि विनोबा ह्या गांधीजींच्या राजकारण व अध्यात्म या क्षेत्रांतील उत्तराधिकाऱ्यांना आलेल्या अपयशाचा उल्लेख पूर्वी आलेलाच आहे. आचार्यांच्या विश्लेषणातील काहीसा कच्चेपणा तेथे जसा दिसतो तसाच तो इस्लामसंबंधीच्या त्यांच्या लेखातही दिसतो. इस्लाम सर्व-धर्म-समता मानतो, त्यात उदारमताचा अंश आहे. मुस्लिमांनी वेदांनाही मानले पाहिजे, मौलाना आझादांचा कित्ता पाकिस्तानी मुसलमानांनी गिरवला पाहिजे इत्यादी विचार मुसलमानांची व इस्लामची आक्रमक राष्ट्रवादाची पार्श्वभूमी, ऐतिहासिक पार्श्वभूमी लक्षात न घेता मांडले आहेत. स्वतः गांधीजींनी "इस्लामची देणगी म्हणजे सर्व मानवांचे बंधुत्त्व आहे. पुढे ही कल्पना इस्लाम धर्मीयांपुरती मर्यादित राहिली. त्यामुळे मुसलमान आपल्या धर्माच्या शिकवणुकीला जागले नाहीत" असे वास्तववादी विधान केले आहे. मुस्लिमांतील अगदी सुधारकांनीसुद्धा इस्लाम हा परिपूर्ण व अखेरीचा धर्म आहे हा सिद्धांत उराशी कवटाळला. धर्मश्रद्धा आजच्या मानवी मूल्यांशी विसंगत असतील तर त्या धर्ममूल्यांचा अव्हेर करायचा ही मजल सर्व धर्मसुधारकांना गाठावी लागते. म. गांधींनी ती गाठली परंतु इस्लामी सुधारकांनी ती गाठली नाही. प्रेषित मक्केला गेल्यावर काफिरांची घरे जाळण्याचे आदेश देत आले. त्यांच्यावर जिझिया कर लादण्यात आला, अशी हमीद दलवाईंची मीमांसा आहे. एम्. सिद्दिकी यांनी एका अरब विद्वानांचे पुढील मत मांडले आहे. "आधुनिक काळात इस्लामच्या मोजक्या मूलभूत तत्त्वांमध्ये काहीही क्रांती किंवा उत्क्रांती झालेली नाही. धर्मशास्त्र किंवा अध्यात्मशास्त्र यांचा विकास झालेला नाही. इस्लामचे मूलभूत सिद्धांत व मुद्दे यांच्याविषयी या शतकात बौद्धिक पातळीवर अजून चर्चा झालेली नाही." इस्लामची ही ऐतिहासिक परंपरा लक्षात न घेतल्यामुळे जी अनर्थ परंपरा कोसळली तिचा पुनरुच्चार करण्याचे कारण नाही.

आचार्य भागवतांच्या संकलित वाङ्‌मयातील प्रमुख कल्पनांचे हे दिग्दर्शन येथेच थांबवणे बरे. विज्ञान ही एक बौद्धिक निष्ठा व शिस्त आहे, वैज्ञानिक दृष्टी समाजरचनेला लागू करून, समता व व्यक्तिस्वातंत्र्य यांचा तोल सांभाळणे शक्य आहे, व्यापक नीतिमूल्यांवर भर देऊन समाजप्रबोधन करण्यासाठी जुनी अध्यात्मवादी पारंपरिक भाषा वापरणे व तीत नवा अर्थ भरणे हे प्रयत्न काही काळपर्यंत यशस्वी वाटले तरी परंपरावादी अनुयायांकडून, आणि जनसामान्यांच्याकडून पुन्हा जुन्या अर्थाने आणि आशयानेच ह्या संकल्पना वापरल्या जातात, म्हणून नव्या आशयाची नवी मांडणी करणेच अगत्याचे ठरते, ह्या प्रकारचे विवेचन करता येणे शक्य आहे. परंतु तो वेगळा व स्वतंत्र विषय होऊ शकेल. प्रस्तावना लिहिताना जी मर्यादा घालून घेतली तिच्या कक्षेत हे बसण्यासारखे नाही.

मात्र आचार्यांच्या प्रतिपादनात ते मुद्दे काहीसे अस्पष्टपणे आले आहेत किंवा जे पूर्णपणे वगळले गेले त्याचा थोडक्यात उल्लेख शेवटी आवश्यक वाटतो. गांधीजींची साधना आयुष्यभर चालू होती. सत्याचे प्रयोग अविरत सुरू होते व प्रत्येक प्रयोगाचे फलित तपासून आचरणात आणण्याचा त्यांचा प्रयत्न होता. विज्ञानाने व यंत्रसंस्कृतीने, निर्माण केलेली संस्कृती व तीवर आधारलेली आर्थिक समता मान्य नसतानासुद्धा गांधीजींनी नेहरूंना विरोध का केला नाही? एकतर त्यांची तशी वृत्ती नव्हती हे एक आणि दुसरे त्यांचा स्वतःच्या तत्त्वविचारांबद्दल जबरदस्त आत्मविश्वास होता हे त्याचे दुसरे उत्तर असू शकेल. आपल्या अहिंसक, स्वायत्त ग्रामराज्यांनी आणि ग्रामोद्योगांनी, वस्त्रस्वावलंबनाने आणि श्रमप्रतिष्ठेने आपण भोगवादी जीवनमार्गाऐवजी संयमावर,

अनासक्तीवर, कमीतकमी गरजांवर आधारलेला नवसमाज निर्माण करू शकू अशी त्यांची दुर्दम्य निष्ठा होती. त्यामुळे नेहरूंच्या नेतृत्त्वाखाली शासकीय पातळीवरील विज्ञान व तंत्रज्ञान यांच्यावर अधिष्ठित प्रयोग चालू राहिले तरी त्यांना प्रतिरोधी अशी एक पर्यायी संस्कृती स्वसामर्थ्याने आपण निर्माण करू शकू अशी गांधीजींची जिद्द होती. त्यांचे अध्यात्मही केवळ परंपरावादी नसून लवचिक होते. त्यामुळे आधुनिक काळाशी सुसंगत अशा अनेक कल्पना त्यांना घालता आल्या. स्वच्छता, सुव्यवस्थितपणा, शिस्त, दीर्घोद्योग, वेळेचे काटेकोर भान, इंग्रजी माध्यमावर प्रभुत्व इत्यादी मूल्ये त्यांनी नव्याने आणली. अस्पृश्यता, जातीसंस्था यासंबंधी शास्त्रप्रामाण्य मानले नाही. वर्तमानपत्रे, रेल्वे, पोस्ट इत्यादी आधुनिक दळणवळणाच्या साधनांचा आणि समूह माध्यमांचा स्वमत-प्रचारासाठी भरपूर उपयोग करून घेतला. आपल्या अध्यात्मकल्पनेतील साक्षात्कार व मोक्ष या अंतिम साध्याचे भान सतत राखल्याने प्रत्यक्ष राजकारण करताना केवळ जड, रूढ व्यवहारापेक्षा वेगळे परिमाण त्यांच्यापुढे सतत असे. परिणामतः व्यवहारी जगातील सामान्य यशापयश व आशानिराशा यांच्याही ते पलीकडे गेलेले असत. स्वतःच्या इंद्रियांवर ताबा मिळविण्यासाठी स्वतःच्या इंद्रियनिग्रहाची परीक्षा घेण्याच्या हेतूने ब्रह्मचर्याचे काही अवघड व लोकविलक्षण प्रयोगही त्यांनी लोकांना काय वाटेल याची पर्वा न करता केले ते ह्या दृष्टीनेच. ज्याने निग्रहाने स्वतःचे मन जिंकले त्याला भौतिक सृष्टीवर तावा मिळवता येतो ह्या योगमार्गातील कल्पनेशी हे सुसंगत होते. आपल्या राजकारणात आपल्याला यश मिळत नाही याचे कारण आपण असा इंद्रियनिग्रह करण्यात कमी पडलो अशी गांधीजींची धारणा होती. गांधीजींनी आधुनिक संस्कृतीला दिलेले आव्हान सर्वकष व साकल्यात्मक होते. त्यामुळे त्यांच्या सार्वजनिक, लौकिक कार्याबरोबर त्यांची आत्मिक साधना बारकाईने तपासून बघणे प्रस्तुत ठरते.

तसेच त्यांनी शिरोधार्य मानलेल्या सत्याच्या कसोटीवर त्यांच्या जीवनातील विविध प्रसंग, घटना व धोरणे यांचे बारकाईने पृथःकरण करणे, त्यांच्या सत्याग्रह प्रयोगांतील विविध अवस्थांचे सूक्ष्म विश्लेषण करणे हेही अवश्य ठरते. गांधीजींनी प्राणभूत मानलेल्या अहिंसा तत्त्वाची चिकित्सासुद्धा अधिक मूलगामी पद्धतीने व्हायला हवी. त्यांच्या आयुष्यात तरी ह्या तत्त्वाची सर्वतोपरी परीक्षा झालेली नाही व त्याला अपेक्षित यशही लाभलेले नाही. फाळणीच्यावेळी झालेल्या भीषण हत्याकांडाने हे स्पष्ट झाले. अहिंसेची आंतरराष्ट्रीय क्षेत्रात-सुद्धा अद्याप कसोटी लागलेली नाही. दोन युद्धमान राष्ट्रांपैकी एकाने अहिंसक प्रतिकाराचा मार्ग स्वीकारणे व शस्त्रबलाचा अहिंसेने मुकावला करणे हा ह्या कसोटीचा मार्ग आहे; पण तो अद्याप कोणीही अंमलात आणलेला नाही.

दुसऱ्या महायुद्धाच्या काळात गांधीजींनी ही कल्पना मांडली होती. गांधीजींना अभिप्रेत असलेली शांततेच्या काळातली सत्याग्रहनीती ही व्यापक प्रमाणात कोणी स्वीकारलेली दिसत नाही. विनोबांचे भूदान-ग्रामदानांचे सुरुवातीचे यश हा एकच ह्या तऱ्हेचा व्यापक प्रयोग आहे. जयप्रकाशजींचा समग्र क्रांतीचा प्रयोग हाही तसा एक प्रयोग म्हणावा लागेल. पण दोन्हीनाही मर्यादित यशच मिळाले. गांधीजींनी जिच्या आवश्यकतेचा पुरस्कार केला व जिचा आचार्यांनी पुनःपुन्हा उच्चार केला, त्या अणुयुगाला अनुरूप अशा नव्या सामाजिक व राजनीतीची कल्पनाही अजून प्रत्यक्षात आलेली नाही. शास्त्रज्ञांकडून, तत्त्वज्ञांकडून मधून मधून तिचा उच्चार मात्र होत असतो. यंत्रसंस्कृतीने निर्माण केलेली राक्षसी शहरे, त्यातील गलिच्छ वस्त्या, प्रदूषण, सत्ता व संपत्ती यांना चढलेले अतोनात महत्त्व, गरीब-श्रीमंत यांच्यात दिवसानुदिवस रुंदावणारी अजस्र दरी व त्यातून मानवी जीवनाला व मूल्यांना येणारे बीभत्स रूप, भ्रष्टाचाराने स्थापलेले सर्वव्यापी, सर्वकष अधिराज्य, एकूण कायदा व सुव्यवस्था यांवद्दलची अत्यंत क्षीण जाणीव या जगड्व्याळ प्रश्नांवर वैज्ञानिक व यंत्रसंस्कृतीला अद्याप तरी पुरेशी उपाययोजना स्फुरलेली नाही. संहारक अस्त्रे निर्माण करण्याच्या व त्या युद्धवादी राष्ट्रांना विकण्याच्या स्पर्धाही वाढत आहेत. अशावेळी गांधीजींनी 'जी एक नवी दृष्टी दिली आहे त्या दृष्टीच्या प्रकाशात आपणाला स्वतंत्र शोधन करून नव्या नीती निर्माण करण्याची स्फूर्ती गांधीजींच्या चरित्रात भरपूर आहे.' हे आचार्यांचे विवेचन प्रस्तुत ठरते. आचार्यांनी आयुष्यभर आपल्या लिखाणात व व्याख्यानात ह्या जीवनचरित्राचे साक्षी म्हणून, एक निष्ठावंत व स्वतंत्र प्रज्ञेचे अनुयायी म्हणून गांधीजींचे तत्त्वविचार व कार्य यांवर जो प्रकाश टाकला तो ह्या दृष्टीने मोलाचा ठरतो.



उपविभाग एक : *आचार्यांचे वाङ्मयचिंतन*

# आंतरभारती

**आंतरभारती**

भारताच्या स्वातंत्र्य घोषणेनंतर थोड्याच काळाने साने गुरुजींनी महाराष्ट्रात 'आंतरभारती'च्या आपल्या नव्या कल्पनेचा प्रचार आपल्या व्याख्यानांतून आणि लेखनातून उत्कटतेने सुरू केला. प्रारंभी काही दिवस त्यांनी 'प्रांतभारती' असा शब्द योजला होता. पण अधिक विचारांती 'आंतरभारती' हाच शब्द त्यांनी निश्चित केला. आचार्य जावडेकर यांच्या अध्यक्षतेखाली सन १९४९च्या उन्हाळ्यात पुणे येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या अधिवेशनात गुरुजींनी स्वतःच 'आंतरभारती'च्या कार्यासंबंधीचा ठराव मांडला होता. त्याला महामहोपाध्याय दत्तोपंत पोतदार यांनी पाठिंबा दिला. तो ठराव सर्वानुमते मंजूर झाला होता. पुढे काही कालाने साने गुरुजींच्या देहावसानानंतर त्यांच्या स्नेह्यांनी व चाहत्यांनी 'आंतरभारती'चे कार्य मूर्त स्वरूपात आणण्यासाठी निधी गोळा केला व 'आंतरभारती' या संस्थेची रीतसर स्थापनाही केली. गेली सुमारे ३ वर्षे 'आंतरभारती'चे काम चालत आले आहे.

**'विश्वभारती' व 'आंतरभारती'**

स्वातंत्र्य प्राप्तीनंतर भारतात निरनिराळ्या फुटीरपणाच्या प्रवृत्तीं वाढतील असा धोका निर्माण झालेला दिसल्यामुळे भारतीय एकतेची वाढ करण्यासाठी एखाद्या सांस्कृतिक चळवळीची जरूरी आहे असे साने गुरुजींना वाटू लागले होते. म्हणून त्यांनी गुरुदेव रवींद्रनाथ ठाकुर यांच्या विश्वभारतीचा सांस्कृतिक समन्वयाचा थोर आदर्श आपल्या डोळ्यापुढे ठेवून भारतात बंधुभावाचे वातावरण निर्माण करण्यासाठी आंतरभारतीची कल्पना केली.

रवींद्रनाथांचा आदर्श जगातील सर्व मानवांचे सांस्कृतिक संघटन बंधुभावनेच्या पायावर करण्याचा आहे. पाश्चात्त्य देशांनी अलीकडच्या इतिहासामध्ये ज्या आक्रमक राष्ट्रवादाची उपासना चालविली आहे, तिच्याविरुद्ध रवींद्रनाथांनी आपली वाणी सतत चालविली आणि सत्ता, संपत्ती यांच्या स्पर्धेने मानव संस्कृतीचा विनाश झाल्याशिवाय राहणार नाही असा जगाला इशारा दिला. रवींद्रनाथांच्या विश्वबंधुत्वाच्या नव्या ध्येयाचा पुरस्कार करणारे पुष्कळ विचारवंत आणि कलाकार निरनिराळ्या राष्ट्रांतून पुढे आले आणि त्यातून 'विश्वभारती' या नव्या सांस्कृतिक विद्यापीठाची भारतात निर्मिती झाली. 'यत्र विश्वं भवति एकनीडम्।' हा विश्वभारतीचा मुद्रालेख आहे. मानव मात्र सर्वत्र एक आहे. त्याचे हृदय सर्व ठिकाणी आणि सर्व काळी एकतेचेच स्पंदन करीत आले आहे अशी रवींद्रनाथांची श्रद्धा आणि अनुभूती असल्यामुळे राष्ट्र, धर्म, संस्कृती इत्यादी भेदांनी मानव कुलाच्या एकतेचा भंग होता कामा नये, असा एकतेचा नवा आदर्श रवींद्रनाथांनी विश्वभारतीच्या द्वारे भारतापुढे आणि जगातील सर्व राष्ट्रांपुढे ठेवला आहे. भेदातून अभेद पाहण्याची, विविधतेतून एकता अनुभवण्याची भारतीय संस्कृतीची प्राचीन काळापासून चालत आलेली समन्वय दृष्टी आजच्या जगाला विशेष तारक होण्यासारखी आहे, असा रवींद्रनाथांचा सिद्धांत होता. जीवनाचे सत्य स्वरूप तत्त्वतः एक असले तरी त्याचा बाह्य आविष्कार नानाविध स्वरूपांतच होत असतो, म्हणून विविधतेमध्ये विद्वेष निर्माण होण्याची गरज नाही. उलट विविधतेतील सौंदर्य अनुभवण्याची शक्ती माणसांनी वाढवली पाहिजे. स्पर्धेऐवजी सहकाराला, द्वेषाऐवजी प्रेमाला जीवनात श्रेष्ठ स्थान दिले पाहिजे. राजकीय, आर्थिक आणि सामाजिक जीवनातही हीच दृष्टी स्वीकारल्याशिवाय मानवी जीवन संस्कृतीसंपन्न होणार नाही, अशी रवींद्रनाथांची शिकवण आहे, थोडक्यात असे म्हणता येईल की भारताचे परराष्ट्रीय धोरण ज्या तात्त्विक सिद्धांतांवर उभारले जावे असे आपणास वाटते ते सिद्धांत रवींद्रनाथांच्या विश्वभारतीने आधीच भारताला देऊन ठेवलेले आहेत. स्वतंत्र भारताला रवींद्रनाथांकडून मिळालेला हा मोठा सांस्कृतिक वारसा आहे, असे म्हणता येईल.

'आंतरभारती'ची जीवनविषयक तात्त्विक दृष्टी रवींद्रनाथांच्या विश्वभारतीहून यत्किंचितही निराळी नाही.

अनुक्रमणिका

जागतिक पातळीवर भिन्न भिन्न राष्ट्रांमध्ये जे सांस्कृतिक सहजीवन निर्माण व्हावे अशी विश्वभारतीची इच्छा आहे, त्याच सांस्कृतिक सहजीवनाची निर्मिती भारतीय गणराज्याच्या घटकराज्यांमध्ये करण्यासाठी झटणे हे साने गुरुजींच्या प्रेरणेने निघालेल्या 'आंतरभारती' संस्थेचे मुख्य कार्य राहील. विश्वभारती हे भारताचे परराष्ट्रीय धोरण (फॉरिन पॉलिसी) मानले, तर 'आंतरभारती' हे भारताचे अंतर्गत धोरण (इंटर्नल पॉलिसी) मानण्यास हरकत नाही.

### 'अविभक्तं विभक्तेषु'

भारतीय राष्ट्रीयत्व हे पाश्चात्त्यांच्या आक्रमक राष्ट्रवादाचे अनुकरण करणार नाही. कोणत्याही राष्ट्रीय प्रश्नाचा विचार करीत असताना भारतीय राष्ट्रपुढाऱ्यांनी विश्वबंधुतेच्या आदर्शावरील आपली दृष्टी ढळणार नाही याची सदैव जागृती बाळगली पाहिजे. त्याचप्रमाणे भारतीयत्वाची जोपासना करीत असतांही भारतीयत्व आणि प्रादेशिकत्व यांच्यामध्ये चांगला मेळ साधण्याचाही प्रयत्न केला पाहिजे. भारतामध्ये भिन्न भिन्न भाषा बोलणारे वेगवेगळे लोकसमूह आहेत. भारताने लोकशाही समाजवादाची अथवा सर्वोदयी समाजाची घोषणा केलेलीच आहे. लोकशाहीच्या विकासासाठी भारतातील प्रमुख लोकभाषांचा विकास झाला पाहिजे. शिक्षणाच्या सर्व प्रदेशांत लोकभाषा प्रतिष्ठेने वावरू लागल्या पाहिजेत. लौकिक आणि व्यावहारिक सर्व व्यवहारांत लोकभाषांचा वापर झाला पाहिजे. तरच लोकमानस समृद्ध होईल आणि लोकशाही चालविण्याची शक्ती लोकांमध्ये निर्माण होईल.

भारतीय गणराज्य हे भिन्न भिन्न प्रादेशिक घटकांनी बनलेले आहे. यामुळे भारतीय समाजाच्या विकासात एकत्व आणि विविधत्व या दोनही अंगांचे मीलन झालेले आढळते. या प्रादेशिक घटकांचे प्रदेशभाषा हे स्पष्ट वेगळेपण दर्शविणारे महत्त्वाचे लक्षण आहे. मराठी, गुजराती, हिंदी, बंगाली, असमिया, उडिया, काश्मिरी, पंजाबी, कन्नड, तेलगु, तमिळ आणि मल्याळम् या भारतीय गणराज्याच्या बारा प्रदेशभाषा प्रसिद्ध आहेत. उर्दू आणि सिंधी या भाषांचे सलग पृथक प्रदेश नसले तरी भारतीय गणराज्यात त्या भाषा बोलणारे समाजही मोठ्या प्रमाणात आहेत. या चौदाही भाषांचा सर्वांगीण विकास भारतीय लोकजीवनाच्या विकासाच्या दृष्टीने आवश्यक आहे.

बहुधा लौकरच भारतात पहिल्या बारा भाषांची प्रदेशराज्ये निर्माण झालेली दिसतील. त्यामुळे सामान्य जनतेचा सर्व व्यवहार प्रदेशभाषेत चालू लागेल. शिक्षणाचे माध्यमही प्रादेशिक भाषा बनेल आणि त्यामुळे या साऱ्या भारतीय भाषांचा झपाट्याने विकास होत जाईल. या प्रादेशिक राज्यांची साहजिकच काही वैशिष्ट्ये आहेत. या वैशिष्ट्यांचा योग्य तो सन्मान केला पाहिजे. मात्र या वैशिष्ट्यांचा प्रमाणाबाहेर अभिमान वाढणार नाही अशी दक्षता सर्वत्र घ्यावी लागेल. कारण प्रादेशिक भेद असले तरी भारतीयत्व सर्वत्र अभिन्नच आहे. म्हणून 'अविभक्तं विभक्तेषु' अशी आंतरभारतीची स्नेहाळ दृष्टी निर्माण केली पाहिजे. संघराज्याची हिन्दी भाषा प्रदेशभाषांना मारक होता कामा नये. अथवा एखाद्या प्रदेशभाषेने आपलेच श्रेष्ठत्व घोषित करण्याचा वेडेपणाही करणे योग्य नाही. भारताच्या या चौदा भाषा सर्वच्या सर्व राष्ट्रभाषाच आहेत अशी व्यापक भावना भारतात वाढविली पाहिजे. उत्तर हिंदुस्थानातील हिन्दी ही प्रदेश भाषा असणाऱ्या लोकांनी स्वखुषीने दक्षिणेकडील एखादी द्राविड भाषा शिकण्याचा उत्साह दाखविला पाहिजे. म्हणजे भाषिक आक्रमणाची भीती कोणाला वाटणार नाही.

प्रदेशभाषेच्या अभ्यासाबरोबरच भारतातील भिन्न भिन्न भाषांचा परिचय करून घेण्याची खटपटही प्रत्येक प्रदेशात चालू झाली पाहिजे. सध्या इंग्रजी भाषेचा पगडा सुशिक्षितांच्या मनावर इतका मोठा आहे, की आपल्या सुशिक्षितांना इंग्लंड व अमेरिकेतील साहित्यिकांची माहिती ज्या मानाने असते त्या मानाने भारतातील भिन्न भिन्न भाषांतील साहित्यिकांची वा साहित्याची माहिती असत नाही. आमच्या सुशिक्षितांचे हे अज्ञान प्रादेशिक भाषांच्या उपेक्षेला कारणीभूत होत आहे. या प्रकारच्या अज्ञानामुळे संकुचितपणा आणि वृथाभिमान हे दोषसुद्धा घर करून राहिलेले आढळतात. भारतातील सुशिक्षितांना भारतीय भाषांतील साहित्याची आणि कलांची सुव्यवस्थित माहिती करून देण्याचे काम आंतरभारतीने अंगीकारले आहे. या कामी जाणत्यांचे लक्ष वेधले जात आहे. गेल्या पाच वर्षांत भारतात ही प्रवृत्ती वाढू लागलेली दिसते. मासिकांतून आणि साप्ताहिकांतून भारतीय भाषांतील साहित्याचा परिचय करून देणारे लेख दिसू लागले आहेत. व्याख्यानमालांतून देखील अशी व्याख्याने घडवून आणण्याचे धोरण आढळते. केंद्र सरकारने ज्या निरनिराळ्या 'अकादमी'






निर्माण केल्या आहेत त्यामुळे परस्पर परिचयाचे कार्य चांगले सुरू झाले आहे असे म्हणता येईल. प्रादेशिक भाषांची विद्यापीठेही या कामात लक्ष घालू लागली आहेत. त्यामुळे आंतरभारतीची कल्पना आता साने गुरुजींच्या आंतरभारती संस्थेइतकीच मर्यादित राहिलेली नाही, हे एक शुभलक्षणच मानले पाहिजे. साने गुरुजींची कल्पना अगदी योग्य वेळी महाराष्ट्रात निर्माण झाली असे म्हणता येईल.

### भाषा व साहित्य यांची ऐक्यसंवर्धक शक्ती

भारतात नानाप्रकारचे जातिभेद, धर्मभेद आणि पंथभेद आहेतच. त्यातच भाषाभेदाचीही भर आहे असे कित्येकांना वाटते. परंतु भारतीय भाषांच्या इतिहासाकडे लक्ष दिले तर असे आढळून येईल, की भारतातील आधुनिक भाषांनी लोकमानसाला एकतेचे संस्कार देण्याचे महत्त्वाचे काम शतकानुशतके केले आहे. भारतातील सर्व भाषांत मध्ययुगीन संतांनी जे भक्तिसाहित्य निर्माण केले त्यामुळे भारतीय मनाला श्रद्धेची, सहिष्णुतेची आणि उदारतेची शिकवण मिळालेली आहे. रामायण, महाभारत, भागवत इत्यादी ग्रंथांचा आधार घेऊन भारतीय भाषांत पूर्वकाळी विपुल ग्रंथरचना झालेली आहे. या साऱ्या रचनेने भारतीय संस्कृतीची व्यापक एकता सर्वत्र फैलावलेली आढळते. अवैदिक आणि अहिंदू पंथांनी देखील आपापल्या प्रदेशांत प्रादेशिक भाषांचा स्वीकार केल्यामुळे साहित्य हे भेदिलेल्यांना एकत्र आणणारे चांगले आलंबन झालेले आहे. कन्नड साहित्याचे उदाहरण या बाबतीत फार उद्बोधक ठरेल. कर्नाटकात जैन, लिंगायत आणि वैष्णव असे पंथ आहेत. त्यांच्यात पांथिक भेदभावना फार तीव्र आहे असेही म्हणता येईल. पण कन्नड साहित्य हे या सर्वांना एकत्र आणण्याइतके संपन्न आणि समर्थ आहे; कारण कन्नड साहित्याला या सर्वांनी प्रतिष्ठा मिळवून देण्यात आपली शक्ती वेचली आहे. कन्नड भाषेचा आदिमहाकवी पंप हा जैन आहे. तथापि साहित्याच्या अभ्यासकांमध्ये पंपाविषयी परमप्रिती आढळते, मग ते स्वतः लिंगायत असोत वा वैष्णव असोत. बसव आणि इतर लिंगायत साधुसंत यांनी वचन-साहित्य म्हणून एक नवाच साहित्यप्रकार कन्नड भाषेत निर्मिला. त्याचे रसग्रहण करण्याच्या आड कर्नाटकातील पंथभेद येऊ शकत नाहीत. वैष्णव दासांचे भक्तिसाहित्यही कर्नाटकात इतर पंथीय देखील आवडीने वाचतात व ऐकून तल्लीन होतात. त्यामुळे कन्नड भाषेने कर्नाटकावर ऐक्याचे परिणाम घडवून आणिले आहे असे सहज दाखविता येईल. बंगालमध्ये आधुनिक प्रकारचे काव्य निर्माण करण्याचा मान मायकेल मधुसूदन याला दिला जातो. 'मेघनादवध' या बंगाली श्रेष्ठ काव्याचा हा कर्ता धर्माने ख्रिस्ती होता हे प्रसिद्धच आहे. नजरूल इस्लाम या कवीचे वंगालमधील स्थान रवींद्रांच्या खालोखाल मानले जाते. पूर्व बंगालमध्ये राजकीय फाळणीनंतरही तेथील मुसलमानांमध्ये बंगाली भाषेचे प्रेम मुळीच कमी झाले नाही. उलट आपल्या जन्मभाषेचा अभिमान त्यांनी अत्यंत तीव्रतेने प्रकट करून दाखवला आहे. इतर भाषांतही अशा गोष्टी दाखविता येतील. भाषा आणि साहित्य यांच्यामध्ये माणसांच्या मनांना एकत्र आणण्याची शक्ती फार विशेषत्वाने असते हे आपण लक्षात ठेविले पाहिजे. साहित्याचा आस्वाद घेण्याची शक्ती वाढत गेली तर माणसांची मने संकुचित भेदभावनेच्या पलीकडे जाऊ शकतील यात शंका नाही.

म्हणून भारताच्या भिन्न भिन्न प्रदेशांत भारतीय भाषांच्या अभ्यासाच्या प्रवृत्ती निर्माण झाल्या पाहिजेत. नागरी लिपीचा स्वीकार केला असता द्राविड भाषा वगळल्या तर बाकीच्या भारतीय भाषांतील साहित्याचा परिचय सुलभतेने होऊ शकतो असा आंतरभारतीचा अनुभव आहे. भारतीय भाषांचा व साहित्याचा अभ्यास वाढला तर भारतीय एकतेच्या भावनेला अधिक बळकटी येईल. सत्तेचे व स्वार्थाचे लोभ कमी करण्याच्या कामीही साहित्यनिष्ठा भारतात पसरविण्याची सध्याच्या काळी तातडीची गरज आहे.

### तुलनात्मक अभ्यासाची जरुरी

रामायणाची व भारताची कथा संस्कृतात आहे तशीच भारतीय भाषांनी ठेवलेली नाही. तुलसीदासाने निर्मिलेले रामायण एका ढंगाचे असले तर बंगालीतील कृत्तिवासाचे रामायण अगदीच वेगळ्या स्वरूपाचे आहे. कृष्णभक्ती एकच पण तिचा आविष्कार भिन्न भिन्न भाषांत भिन्न भिन्न रीतींनी झालेला आहे. ही भिन्नता त्या त्या प्रदेशातील समाजजीवनाची वैशिष्ट्ये दर्शविणारी आहे. प्रादेशिक भाषांतील रामायणांच्या तुलनात्मक अध्ययनाने आपले भारतीय समाजाचे ज्ञान अधिक सुस्पष्ट होईल. संतांच्या वाङ्मयातही जागोजाग वैशिष्ट्ये आहेत. कोणी मूर्तीपूजा विरोधी आहेत, तर कोणी चातुर्वर्ण्याचे पुरस्कर्ते आहेत. म्हणून संतांच्या साहित्यांचा तुलनात्मक








अभ्यासही अभ्यासकाचा दृष्टिकोन निःसंशय विशाल करणारा ठरेल. पूर्वकाळी दळणवळणाची साधने फारशी नसतानाही आपले पंडित आणि संत फार प्रवास करीत असत. त्यामुळे त्यांना भारताचे विविध प्रकारचे ज्ञान झालेले असे. आज प्रवासाची आणि अध्ययनाची साधने वाढली असूनही परस्परांच्या परिचयाची प्रवृत्ती थोडी कमीच झालेली आढळते. महाराष्ट्राच्या मुक्तेश्वरला कर्नाटकाच्या कुमारव्यासाचा परिचय होता. कुमारव्यासाच्या कन्नड महाभारतांत कित्येक मराठी शब्द आढळून आलेले आहेत. त्या मानाने आजच्या लेखकांमध्ये वा अभ्यासकांमध्ये हे परस्परज्ञान थोडे कमी झालेले आढळून येईल. ही उणीव आता आपण झपाट्याने भरून काढली पाहिजे. त्यासाठी भारतीय भाषांतील साहित्यांचा व साहित्यिकांचा परस्परपरिचय वाढविण्याचे काम आपण हाती घेतले पाहिजे. यामुळे आपले भारतीयत्व अधिक सुदृढ बनेल. आपल्यामध्ये परस्पर सहकाराच्या कल्पना वाढत जातील. एकमेकांबद्दल प्रेम आणि आदर हे गुण वृद्धिंगत होतील आणि आपल्या प्रज्ञेला आणि प्रतिभेला नवेनवे अंकुर फुटतील.

'आंतरभारती'च्या उद्घाटनासाठी दोन वर्षांपूर्वी पुण्यात प्रख्यात कन्नड साहित्यिक श्री. मास्ती वेंकटेश अय्यंगार यांना बोलावण्यात आले होते; त्यावेळी प्रत्यक्ष परिचयाने स्नेहभावना वाढीस लागते ह्याचे चांगले प्रत्यंतर आले. महाराष्ट्रातील मुख्य मुख्य शहरी गेल्या दोनतीन वर्षांत आंतरभारती केंद्रे स्थापन झाली आहेत. तेथे रवींद्रांचे बंगाली साहित्य नागरी लिपीच्याद्वारे अभ्यासिले जात आहे. नमुन्यासाठी रवींद्रांचा 'कर्ण-कुंती-संवाद' नागरी लिपीत मराठी अनुवादासह प्रकाशित करण्यात आला आहे. साहित्याच्या द्वारा भाषेचे अध्ययन करण्याची एक नवी पद्धती या केंद्रांतून मान्यता पावत आहे. आंतरभारती संस्थेने अलीकडे उर्दू साहित्याचा परिचय करून देणारे दोन छोटे ग्रंथही निर्माण केले आहेत. अहमदाबाद येथे श्री. उमाशंकर जोशी यांच्यासारख्या गुजराती साहित्यिकांनी पुढाकार घेऊन आंतरभारती केंद्र स्थापन केले आहे. अशी केंद्रे भारताच्या सर्व प्रदेशराज्यांत स्थापन झाली तर परस्पर परिचयाचे व स्नेहसंवर्धनाचे कार्य वाढीस लागेल यात शंका नाही.



### आंतरभारतीची भाषादृष्टी

बंगाली, गुजराती साहित्यांचे अधिक अध्ययन करण्यासाठी सध्यातरी बंगाली वा गुजराती लिपीचे ज्ञान मिळवावे लागेल. परंतु ज्याला साहित्यज्ञानासाठीच लिपीचा स्वीकार करावयाचा असेल त्याला लिपी डोळ्यांनी ओळखून तिच्यातील साहित्य वाचता आले म्हणजे झाले. त्या त्या भाषांच्या लिप्या लिहिण्याइतके ज्ञान त्याला आलेच पाहिजे असे नाही. अर्थात, त्याला त्या त्या लोकांशी लेखनादि व्यवहार करावयाचा असेल तर त्याने त्या त्या लिप्यांचाही लेखनासाठी वापर करावा. बंगालीसारख्या भाषेत ज्याला पांडित्य मिळवावयाचे असेल, आपल्या भाषेतील साहित्य त्या भाषेत अनुवादित करण्याची ज्याची इच्छा असेल, त्याने त्या त्या भाषेचा अधिक सूक्ष्म व शास्त्रीय अभ्यास जरूर करावा.

### द्राविड भाषांचा अभ्यास

भारतीय भाषांच्या अभ्यासामध्ये द्राविड भाषांचे एक स्वतंत्र स्थान मानावे लागेल. भारतीय ऐक्याच्या दृष्टीने संस्कृतकुलांतील भाषा बोलणाऱ्या लोकांनी द्राविड भाषांचा - कन्नड, तेलगु, तमिळ, मल्याळम् यांचा - परिचय प्रयत्नपूर्वक करून घेतला पाहिजे आणि त्यासाठी देखील नवी सुलभ अध्ययन पद्धती शोधून काढली पाहिजे. द्राविडी भाषांच्या लिप्या भिन्नभिन्न आहेत आणि त्यांचा मूलभूत शब्दसंग्रहही अगदी वेगळा आहे. द्राविड साहित्याशी परिचय करून घेण्यासाठी नागरीतून त्या त्या भाषांचा परिचय करविणारे सुलभ संग्रह निर्माण करावे लागतील. त्यांच्या साहित्यातील वर्णनात्मक विभाग निवडून काढून त्यांचा नागरीतून अनुवादासह प्रचार करावा लागेल. त्या अनुवादाला आवश्यक त्या व्याकरणाच्या टीपा जोडल्या म्हणजे वाचकांचा द्राविड भाषांशी सामान्य परिचय होऊन जाईल. यासाठी देखील रेडिओ व ग्रामोफोन यांचे साह्य घ्यावे लागेल. नागरीतून चांगला भाषा परिचय झाल्यानंतर या भाषांच्या लिप्यांचा परिचय करून देणे योग्य होईल. भाषाज्ञान झाले म्हणजे लिपीज्ञान करून घेणे सुलभ होते. जन्मभाषेच्या बाबतीत देखील मुलाला आधी काही भाषा आलेलीच असते. आणि मगच तो लिपीचा अभ्यास आरंभितो. प्रौढांच्या बाबतीत अन्य भाषांच्या दृष्टीने तर भाषाज्ञान आधी व लिपीज्ञान नंतर हा नियमच मानणे योग्य होईल. कधी काळी भारतातील साऱ्या भाषांची एकच लिपी व्हावी अशी अपेक्षा करता येईल. कदाचित नागरी हीच भारतीय लिपी होऊ शकेल. पण त्यासाठी नागरीहून ज्यांच्या लिप्या भिन्नभिन्न आहेत त्या लोकांनी स्वेच्छेने नागरीचा स्वीकार केला पाहिजे. नागरीच्या अभिमान्यांनी इतरांवर आपल्या लिपीचे प्रभुत्व लादण्याचा प्रयत्न करू नये. असे प्रयत्न विफल झाल्याशिवाय राहणार नाहीत.

जीवनचिंतन, आचार्य भागवत.

# विश्वकवी रवींद्रनाथ ठाकुर

राजा राममोहन राय यांना आधुनिक भारताच्या निर्मात्यांत प्रथम स्थान देण्यात येते. खरोखरीच ते पहिले आधुनिक भारतीय पुरुष होऊन गेले. त्यांच्या मृत्यूला सव्वाशे वर्षे होत आहेत. त्यांनी बंगालमध्ये नव्या विचारांना प्रथम प्रेरणा दिली. जीवनाच्या सर्व क्षेत्रांत समन्वयाची दृष्टी वापरून राजा राममोहन राय यांनी बंगालच्या द्वारे भारताला नवजागृतीचा मंत्र दिला. आधुनिक बंगाली साहित्याच्या दृष्टीने पाहिले तरीदेखील राजा राममोहन राय यांचे कार्य महत्त्वाचे आहे. इतर आधुनिक भारतीय भाषांप्रमाणेच बंगालीचे पूर्वसाहित्य पद्यमयच आहे. बंगाली गद्याचा पाया राजा राममोहन राय यांनी नव्यानेच घालून दिला. बंकिमचंद्रांनी त्या गद्यामध्ये सौंदर्याचा नवा आविष्कार करून दिला आणि रवींद्रनाथांनी बंगाली गद्य कळसास पोचविले. एवढ्या एकाच कारणासाठी रवींद्रनाथांचे नाव बंगाली साहित्यात अमर होण्यासारखे आहे. तथापि, राजा राममोहन राय आणि बंकिमचंद्र या दोघांनी सुरू केलेल्या सर्व प्रवृत्तींचा पूर्ण परिपाक रवींद्रांच्या साहित्यात झाला असल्यामुळे बंगाली साहित्याच्या दृष्टीने रवींद्रांचे स्थान अत्यंत श्रेष्ठ ठरले आहे.

**बंगाल मधील तीन क्रांत्या**

रवींद्रनाथांचा जन्म झाला त्यावेळी बंगालमध्ये तीन क्रांत्या चालू झालेल्या होत्या. राजा राममोहन राय यांनी धार्मिक आणि सामाजिक विचारात सुरू केलेली क्रांती ब्रह्मोसमाजाच्या रूपाने वाढीस लागलेली होती. रवींद्रनाथांचे वडील देवेंद्रनाथ हे त्या क्रांतीचे स्वतःच्या आचरणाने त्या वेळी नेतृत्त्व करीत होते. आपला भारत देश इंग्रजांच्या दास्यातून मुक्त करण्यासाठी दुसरी क्रांती सुरू झालेली होती. योगी अरविंदांचे मातामह राजनारायण बसू यांच्याकडे त्या क्रांतीचे पौरोहित्य होते. तिसरी क्रांती साहित्यक्षेत्रात सुरू झालेली होती. कवी विहारीलाल, बंकिमचंद्र आणि मायकेल मधुसूदन हे या क्रांतीचे यशस्वी पुरस्कर्ते होते. रवींद्रांच्या बालपणी रवींद्रांच्या प्रतिभेवर या तीनही क्रांत्यांचे खोलवर परिणाम झालेले दिसून येतात.

**अध्यात्मिक बैठकीचे स्वरूप**

ठाकुर घराणे हे कलकत्त्यात आणि सर्व बंगालमध्ये अत्यंत पुढारलेले होते. रवींद्रनाथ हे देवेंद्रांचे सर्वांत कनिष्ठ पुत्र. ठाकुर घराण्यात विद्या, कला, देशभक्तीचे उद्योग, स्वदेशीचे प्रयोग, स्त्रीशिक्षण आणि इतर सामाजिक सुधारणा इत्यादी विविध प्रवृत्ती सतत चाललेल्या असत. सुधारक म्हणून सनातन्यांचा या घराण्यावर बहिष्कारच असल्यामुळे ठाकुर घराण्याचे जीवन सर्व प्रकारच्या संकुचित रूढीपासून पूर्णपणे मुक्त असे. कर्मठपणाला तेथे मुळीच वाव नव्हता. देवेंद्रनाथ ठाकुर हे स्वतः कर्ते समाजसुधारक होते आणि हरतऱ्हेच्या शैक्षणिक कार्यात सदैव निमग्न असत. तथापि त्यांच्या जीवनाची बैठक अध्यात्मावर उभी राहिलेली होती. उपनिषदांतील शुद्ध ब्रह्मविद्येची त्यांनी जन्मभर निष्ठेने उपासना चालविली.

'ईशा वास्यं इदं सर्वं यत् किंच जगत्यां जगत् ।
तेन त्यक्तेन भुञ्जीथाः मा गृधः कस्यस्वित् धनम् ।।'

या प्रसिद्ध औपनिषद मंत्राने त्यांना ब्रह्मविद्येचा मार्ग उघडा करून दाखविला होता; आणि बालपणी रवींद्रांना वडिलांकडून याच मंत्राच्या द्वारा उपनिषदांतील ब्रह्मविद्येची दीक्षा मिळाली होती. देवेंद्रांच्या दीर्घ साधनेमुळे त्यांना 'महर्षी' ही पदवी लाभली होती. आणि महर्षींच्या प्रशांत सान्निध्यात रवींद्रनाथांच्या जीवनाचा स्वाभाविक विकास होत गेला. यामुळे रवींद्रनाथांच्या विभूतिमत्त्वाचा पाया उपनिषदांतील ब्रह्मविद्येनेच घडविलेला आहे. जगताचे आदितत्त्व सत्यस्वरूप, ज्ञानस्वरूप असले तरी ते मुख्यतः आनंद स्वरूप आहे आणि दृश्य विश्व हे त्या आनंदाचे आविष्करण आहे, असा रवींद्रांना उपनिषदांपासून झालेला प्रधान साक्षात्कार आहे.

'आनंदरूपम् अमृतम् यद् विभाति।' या प्रसिद्ध उपनिषद वचनाचा 'हे सर्व दृश्य विश्व आनंदतत्त्वाने धारण केलेले रूप आहे' असा रवींद्रनाथांनी अर्थ केलेला आहे.

अनुक्रमणिका

त्यामुळे रवींद्रनाथांचे अध्यात्म परंपरागत अध्यात्माप्रमाणे निष्क्रिय, परलोकपरायण, समाजविमुख झाले नाही. याच्या उलट, त्यांची जीवनदृष्टी केवळ जडवादी, विलासपरायण किंवा व्यक्तिनिष्ठही बनली नाही. रवींद्रनाथांच्या आध्यात्मिक बैठकीचे हे स्वरूप चांगले समजून घेतले म्हणजे त्यांच्या सर्व जीवनाचा व साहित्य कलांचा अर्थ समजण्यास अडचण पडत नाही.

रवींद्रनाथांची प्रतिभा विविधरंगी आणि विश्वतोमुखी आहे. संत, साहित्यिक, कलावंत, तत्त्वज्ञ, शिक्षणसुधारक, विश्वशांतीचे उपासक अशा विविध रूपांनी त्यांचे जीवन समृद्ध झालेले आहे. या सर्व शक्तींचा विकास त्यांच्या दीर्घ आयुष्यात सतत होत राहिलेला दिसतो. वयाच्या पन्नाशीपर्यंत त्यांच्या कार्याचे क्षेत्र बंगाल प्रांतापुरतेच मर्यादित राहिलेले होते. परंतु १९१३ मध्ये त्यांच्या 'गीतांजली'ला 'नोबेल प्राईझ' नावाचे प्रख्यात विश्वपारितोषिक मिळाल्यानंतर साऱ्या जगाचे लक्ष त्यांचेकडे धावून गेले. तेव्हापासून त्यांच्या पार्थिव देहाला मृत्यू येईपर्यंत, म्हणजे सुमारे अडीच-तीन तपांचा काळ, त्यांची कामगिरी जागतिक क्षेत्रात चालू राहिली होती. त्यांचे 'शांतिनिकेतन' ही लहानशी शाळा राहिली नाही. तिला 'विश्वभारती'चे विशाल स्वरूप लाभले. 'यत्र विश्वं भवति एकनीडम् ।' या मुद्रावाक्यात व्यक्त झालेल्या व्यापक संकल्पाला प्राणप्रतिष्ठा मिळाली. जगातील सर्व राष्ट्रांनी, सर्व विद्यापीठांनी व सर्व साहित्यसंस्थांनी रवींद्रनाथांना निमंत्रणे देऊन त्यांचा उत्साहाने सत्कार केला आणि त्यांचा मानवतेच्या ऐक्याचा व प्रेमाचा संदेश त्यांच्या तोंडून ऐकला. बंगालचे कवी आता विश्वाचे कवी झाले आणि शांतिनिकेतनमधले गुरुदेव खरोखरीच जगद्‌गुरू बनले.

### विश्वमानवाचा आदर्श

रवींद्रनाथांच्या बालपणी ज्या तीन क्रांत्या चालू असल्याचे म्हटले त्या तीनही क्रांत्यांत त्यांनी पुढे स्वतः पुष्कळ कामगिरी केलेली आहे. राजा राममोहन राय यांनी सुरू केलेल्या धर्मविचारांतील क्रांतीला रवींद्रनाथांनी आपल्या जीवनात अत्यंत व्यापक स्वरूप दिले. महर्षी देवेंद्रनाथांनी या क्रांतीला उपनिषदांतील ब्रह्मविद्येचा खंबीर आधार मिळवून दिला आणि रवींद्रनाथांनी त्याच ब्रह्मविद्येच्या आधारावर विशाल मानवधर्माची इमारत उठवून दिली. रवींद्रनाथांनी ब्राह्मोसमाजाच्या प्रार्थना-मंदिरातून शेकडो प्रवचने दिली असली आणि ब्राह्मसंगीत म्हणून अनेक उपासनागीते स्वतः रचून गायिली असली तरी ते ब्राह्मो-समाजाच्या सांप्रदायिक परिवेष्टनात कधीच गुंतून पडले नाहीत. याबद्दल कट्टर ब्रह्मसमाजीयांना विषादच करावा लागला आहे. त्यांच्या प्रख्यात 'गोरा' कादंबरीत अशा संकुचित कट्टर सांप्रदायिकांची खूप थट्टा उडवलेली आहे. 'The Religion of Man' या त्यांच्या प्रख्यात ग्रंथात त्यांनी आपल्या 'मानवधर्मा'चे चांगले विशदीकरण केले आहे. रवींद्रांचा विश्वमानवाचा आदर्श आजच्या जगाला आनंदाने स्वीकारता येण्यासारखा आहे.

### राजकीय कामगिरी

भारताच्या राजकीय मुक्ततेच्या कार्यांतही रवींद्रनाथांनी फार मोठी कामगिरी बजावलेली आहे. भारतमुक्ततेची दीक्षा सशस्त्र क्रांतिकारकांच्या संगतीत रवींद्रनाथांना बालपणीच मिळाली होती. तथापि त्या मार्गाचा प्रत्यक्ष आचार त्यांचे हातून कधीच झाला नाही. याचे कारण भ्याडपणा नव्हे. रवींद्रनाथ हे अत्यंत निर्भय वृत्तीचे पुरुष होते. त्यांच्या जीवनात विलासिताही नव्हती. पण स्वातंत्र्याची त्यांची कल्पना पहिल्यापासूनच व्यापक होती. केवळ राजकीय फेरफारांनी भारताचे दास्य दूर होऊ शकणार नाही अशी त्यांची विचाराने खात्री झालेली होती. भारताच्या मुक्तीसाठी भारतीय लोकांचे मन आणि बुद्धी ही पूर्ण निर्भय आणि स्वतंत्र झाली पाहिजेत असा त्यांचा सिद्धान्त होता. हिंदुस्थानात काँग्रेसच्या स्थापनेपासून जे अर्जविनंत्यांचे नेमस्त राजकारण चालले होते त्याचे रवींद्रनाथांना कधीच आकर्षण वाटले नाही. पण बंगभंगाच्या तीव्र आघाताने त्यांच्या स्वाभिमानी वीरवृत्तीला जोराची चालना मिळाली आणि शांतिनिकेतनातील आपल्या नव्या शैक्षणिक प्रयोगांतून बाहेर येऊन सामुदायिक आंदोलनात ते दाखल झाले. बंगभंगानंतरच्या विराट चळवळीत ते अरविंदांच्या बरोबरीने बंगालचे पुढारीपण करीत होते. यावेळी त्यांनी अत्यंत स्फूर्तिदायक गीते रचिली आणि अनेक प्रबंधांतून भारतीय समाजाच्या सर्वांगीण स्वातंत्र्याचा मार्ग शोधला. राजकीय दृष्ट्या अत्यंत तीव्र विचाराचे अनेक लेखही यावेळी त्यांनी लिहिले. 'स्वदेशी समाज' नावाच्या निबंधसंग्रहात त्यांनी भारतीय स्वातंत्र्यासंबंधी प्रकट केलेली मीमांसा आजच्या स्वतंत्र भारताला पुष्कळच उद्‌बोधक ठरण्यासारखी आहे. बंगभंगाच्या






सत्यावरील श्रद्धा कधीच विचलित होणार नाही आणि त्याची बुद्धी अस्वस्थ होऊन पापाच्या आणि विषमतेच्या प्रश्नांची कोरडी शाब्दिक चर्चा करीत बसणार नाही.

**शुद्ध हेतू व शुद्ध क्रिया यांचे तादात्म्य**

साध्य-साधनांचा अभेद हा गांधीजींच्या जीवनदर्शनातील गाभाच आहे. तसे पाहिले तर जगातील सारे विचारक साध्य-साधनांची एकता बुद्धीने प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करीत असतात. टिळकांनी गीतारहस्यात याविषयी लिहिताना, अपूर्ण जगात पूर्ण पुरुषालाही अशुद्ध साधनांचा स्वीकार करावा लागतो, तो विश्वाच्या पूर्णतेला म्हणजेच शुद्धतेला उपयोगी पडण्यासाठीच होय असे प्रतिपादले आहे; आणि साधनांची शुद्धता ठरविताना बाह्य क्रियेपेक्षा आंतर हेतूला खरे महत्त्व आहे असे म्हटले आहे. दुष्ट बुद्धीने जगाचे कधीही कल्याण होणार नाही यात आजपर्यंतच्या सर्व विचारकांचे एकमतच आहे. परंतु शुद्ध हेतू आणि शुद्ध क्रिया यांचे तादात्म्य कसे टिकविता येईल हाच जीवनातील प्रश्न आहे. गांधीजींचा या बाबतीतील खरा आग्रह हे तादात्म्य जीवनाच्या सर्व क्षेत्रात अखंड टिकविण्याचा होता, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. सत्य आणि अहिंसा यांचे साम्राज्य जीवनात सर्वत्र प्रस्थापित व्हावे हे अंतिम साध्य म्हणून, मला वाटते, मार्क्सवादी देखील मान्य करितात; परंतु त्या आदर्श समाजाच्या निर्मितीसाठी हिंसात्मक लढ्याची अपरिहार्यता त्यांना भासत असल्यामुळे त्यांच्या साधनांत अशा हिंसेला आवश्यक असणाऱ्या वाचिक असत्याचा स्वीकार करण्यास त्यांना तात्त्विकदृष्ट्या हरकत वाटत नाही. शारीरिक हिंसा आणि वाचिक असत्य यापेक्षाही मानवाचे कल्याण ही उच्चतर वस्तू आहे या विचारसरणीचा आश्रय करून आपल्या इकडे महाभारतादी ग्रंथात असाधुहिंसा ही अहिंसाच आहे आणि भूतहित हेच सत्य आहे असे नैतिक निर्णय दिलेले आढळतात. परंतु असत्य आणि हिंसा या केवळ जड, शारीरिक क्रिया नाहीत. त्यांचा मानसिक वृत्तींशी देखील अपरिहार्य संबंध जोडलेला असतो. चित्त शुद्ध करण्यासाठी शरीर संयत करावे लागते. आणि म्हणूनच कितीही शुद्ध हेतू बाळगून असत्य आणि हिंसा यांचे आचरण झाले तरी ते मानवाच्या जीवनशुद्धीला कलंकित केल्याशिवाय राहत नाही. हा विचारदेखील गीतारहस्यात टिळकांनी मांडलेला आहे. महाभारतादि प्राचीन धर्मग्रंथातही याचे प्रतिपादन आढळते. त्यामुळे साधनामध्ये जी अशुचिता राहते ती आपद्धर्म म्हणूनच केवळ स्वीकारण्यासारखी आहे असाच आजपर्यंतच्या सर्व नीतिविचारांचा निष्कर्ष समजावा लागेल.

गांधीजींचे या बाबतीतले धोरण अधिक तर्कशुद्ध आणि प्रामाणिकपणाचे आहे असे माझे मत झाले आहे. स्पेन्सरचा अनुवाद करून टिळकांनी गीतारहस्यात असे म्हटले आहे की, अपूर्ण जगात पूर्ण पुरुषालाही पूर्ण नीति प्रकट करता येत नाही. गांधीजींचे याला असे उत्तर आहे की, अपूर्ण जगात कोणीही माणूस पूर्ण होऊच शकत नाही; आणि म्हणून जगाच्या कल्याणासाठी देखील कोणाही साधकाला अशुद्ध साधने वापरण्याचा हक्क नाही. जग पूर्ण करण्याचा खरा उपाय शुद्ध साधनांचा आग्रह धरून जगातील अपूर्णता नाहीशी करीत राहणे हाच होऊ शकेल. पूर्णतेच्या भ्रांत कल्पनेने आणि अलिप्ततेच्या अहंकाराने केलेला अशुद्ध साधनांचा स्वीकार समाजाला अधिकच भ्रष्ट करण्यात परिणत झालेला आहे, हा जुन्या इतिहासाचा धडा नवीन क्रांतिकारकांनी विसरता कामा नये. गांधीजी हे एक थोर सामाजिक क्रांतिकारक होते. समाजातील मानवांना उच्चतर अवस्थेला नेण्यासाठी नानाविध क्रांत्या घडवून आणल्या पाहिजेत हे त्यांना स्पष्ट दिसत होते. पण त्या क्रांत्या म्हणजे केवळ नानाविध सामाजिक संस्थांचा उच्छेद ही कल्पना त्यांना मान्य नव्हती. सामाजिक संस्था माणसानेच निर्माण केलेल्या असतात आणि संस्था मोडावयाच्या झाल्या तरी माणसांच्या मनातील क्रांतीनेच त्या मोडू शकतात असा त्यांचा सिद्धांत होता. मनाची क्रांती म्हणजेच मनाची शुद्धता. माणसाच्या गुलामगिरीचा अंत करण्यासाठी नव्या मनाची निर्मिती आवश्यक आहे. त्या नव्या मनाला आवश्यक असा नवा समाजदेह निर्माण करण्याचे सामर्थ्यही मनाच्या शुद्धतेतच भरून राहिलेले असते. म्हणून मार्क्सवादी लोकांप्रमाणे गांधीजींना एकवर्ग समाजरचना अभिप्रेत असली तरी त्यासाठी द्वेष, हिंसा, असत्य इत्यादि साधनांचा उपयोग ते वर्ज्य मानतात. मार्क्सवादी बाह्य संस्थांच्या विनाशावर अधिक भर देत असल्यामुळे त्यांना क्रांतीची थोडी घाई झालेली दिसते. बाह्य संस्थांमुळे समाजमनाला विशिष्ट आकार प्राप्त होतो यावर त्यांचा अधिक भर दिसतो. गांधीजींचा भर मनःसामर्थ्यावर अधिक आहे. तथापि गांधी हे काही कल्पनावादी नव्हते. बाह्य जगाचे सत्यत्व त्यांनी मानले होते. आणि सामाजिक विकासासाठी नाना प्रकारच्या अनुकूल बाह्य संस्था निर्मिल्या पाहिजेत याची त्यांना जाणीव होती. त्यामुळे त्यांच्या क्रांतीची साधना जीवनाच्या संपूर्ण दृष्टीवर उभारलेली






होती असे मला वाटते.

**व्यवहारातच अध्यात्माचा साक्षात्कार**

गांधीजींचे सत्य जीवनाइतके विशाल आणि व्यापक असल्यामुळे जीवनाच्या सर्व अंगांना व्यापून टाकणारे आहे. Appearance & Reality असे जीवनाचे दोन विभाग करून घेण्याचा अट्टहास करीत राहणे हा गांधीजींचा मार्ग नव्हे.

अध्यात्म आणि व्यवहार ही दोन क्षेत्रे गांधीजी सर्वस्वी पृथक् मानीत नाहीत. व्यवहारातच अध्यात्माचा साक्षात्कार झाला पाहिजे असा त्यांचा आग्रह आहे.

वरील सर्व विवेचन वाचल्यानंतर गांधीजींनी जीवनाच्या साधकाला एक नवी साधना निर्माण करून दिली आहे हे सहज लक्षात येईल. नीती या शब्दाचा अर्थ एखादी कर्मकांडी रीती असा करावयाचा असेल तर गांधीजींनी अशा नीतीचा पुरस्कार केला आहे असे मला वाटत नाही. त्यांनी जीवनाची एक नवीन दृष्टी आपणाला दिलेली आहे. त्या दृष्टीच्या प्रकाशात आपणाला स्वतंत्र संशोधन करून नव्या नीती वेळोवेळी निर्माण कराव्या लागतील. अशा नव्या नीती निर्माण करण्याची स्फूर्ती गांधीजींच्या चरित्रात भरपूर भरून राहिलेली आहे अशी माझी दृढ समजूत आहे.



**सातही रंग प्रकाशाला म्हणाले**

सातही रंग प्रकाशाला म्हणाले,
"तुझा रंग कोणता ते सांग."
प्रकाश म्हणाला,
"मी कशाला सांगू?
तुम्हीच नीट निरखून पहा म्हणजे झाले!"
साऱ्या रंगांनी नीट निरखून पाहिले.
प्रत्येक रंगाला आपल्या संवादी समलहरी
प्रकाशात दिसल्या.
प्रत्येक रंग 'जितं मया' या आनंदतरंगात
उल्हसित झाला.
प्रकाशाची समन्वय-समाधि मात्र
यत्किंचितही भंग पावली नव्हती.

- देवदत्त दाभोलकर
(नवभारत १९५२)



**एक मूठभर अस्थि नसाव्या**

एक मूठभर अस्थि नसाव्या
अंजलिभरही रक्त नसावे
उसळत प्रेमाचे शतसागर
विशाल निर्भय हृदय असावे.

कुठे मुखावर कानी डोळी
सुंदरतेची साक्ष नसावी
परंतु ओठांवर बालांची
स्मिते निरागस सदा हसावी.

वाणीच्या ऋजु माधुर्याने
फिके पडावे मधुचे सागर
व्यक्तित्वाने खुजे दिसावे
हिमालयाचे गौरीशंकर.

मानवतेचे पुसीत अश्रू
पावन ते नित पाय फिरावे
एक असावी काठी हाती
एक वस्त्रही पुरे नसावे.

सांभाळुनि ही निज अवधाने
घडीव जा जी घडेल प्रतिमा
- आणि मुशीतून बापूजींची
मंगल मूर्ति ओती ब्रह्मा.

सुप्रसिद्ध कन्नड साहित्यिक टी. पी. कैलासम् यांच्या 'The Recipe' या कवितेचा मुक्त अनुवाद.

- देवदत्त दाभोलकर
(नवभारत जानेवारी १९५३)

अनुक्रमणिका

# जीवनमूल्ये अधिकच तेजस्वी झाली आहेत

आपल्या देशावर आलेल्या घोर आपत्तीने आपण केवळ दिङ्मूढच झालो नाही तर बेभान झालो आहों; केवळ विषण्णच झालो नाही तर विवेकशून्य झालो आहो आणि आपला आचारही आपण बिघडविला आहे. अर्थातच यांवेळी विचाराची आवश्यकता आहे.

गांधीजींच्या मरणाचा विचार केला तर त्यांचे जीवन व साधना ही जितकी असामान्य, अलौकिक व लोकविलक्षण होती तितकाच त्यांचा अंतही असामान्य, अलौकिक व लोकविलक्षण झाल्यामुळे त्यांच्या जीवनावर कळस चढला आहे. त्यांची जीवनमूल्ये अधिकच तेजस्वी झाली आहेत.

गांधीजींच्या करवी जगत्सेवा करून घेणारी शक्ती इतकी उदार आहे, की तिने त्यांचे मरणसुद्धा वाया जाऊ दिले नाही. यामुळेच ही शोकसभा असली तरी येथे दुःखाला जागा नाही. दुःख ही भावना मानवी हृदयास साजेशी असली तरी गांधीजींचा जीवन-संदेश जाणणाऱ्यांस शोभणारी नाही. गांधीजींनी मरणाचा स्वीकार नमस्कारपूर्वक निष्ठुर मनाने व हसतमुखाने केला हे लक्षात घ्यावयास हवे.

माणसाच्या देहावर आघात होतात, आयुष्यभर मिळालेली संपत्ती नष्ट होते; पण काय नष्ट झाले म्हणजे आपले खरे नुकसान हेतो, याचा विचार माणसाने केला पाहिजे. अर्भकावस्थेत पिता मरतो, तरुणपणी कांता मरते व वृद्धपणी एकुलता एक पुत्र मरतो; पण त्यामुळे मानवी जीवनाचा नाश होत नाही. सर्व प्रकारची भौतिक संपत्ती नष्ट झाली तरी माणूस जगू शकतो; पण आशा नष्ट झाली, श्रद्धा नष्ट झाली, म्हणजे मात्र माणूस जगू शकत नाही. भौतिक देह नष्ट झाला, भौतिक संपत्ती नष्ट झाली तरी खरे नुकसान होत नाही. खरी भीती तेव्हाच असते, की जेव्हा माणसाची सत्यावरची श्रद्धा नष्ट होते. ही श्रद्धा मेली नाही तर आपणही मरत नाही. मारेकऱ्याने गांधीजींचा वध केला खरा, पण गांधीजींना सत्यावरच्या निष्ठेने व श्रद्धेने आपल्या भोवताली जे मंगल निर्माण केले होते ते तो मारू शकला नाही.

अर्थातच गांधीजींच्या वधामुळे दुःखी होणे योग्य होणार नाही. पं. नेहरू म्हणाले, 'गांधीजी गेले, सर्वत्र अंधकार पसरला.' पण लगेच ते म्हणाले, 'नाही, गांधीजींनी पेटविलेली ज्योत कधीही विझणार नाही.' रवींद्र, अरविंद व गांधीजी या हिदुस्थानच्या लोकोत्तर त्रयीपैकी हयात असलेले अरविंदबाबू म्हणाले, 'ज्या शक्तीने हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळवून दिले, ज्या शक्तीने गांधीजींना नेले, ती शक्तीच त्यांचे अपुरे कार्य पुरे करील.' मग गांधीजींच्या मरणाबद्दल शोक कशासाठी करावा?

गांधीजी ज्या जड देहाच्या जाणीवेने आपल्या जीवितकार्यास १२५ अथवा १३३ वर्षांची मर्यादा घालीत होते, तो जड देह नष्ट झाल्याने त्यांना आता अवघा अनंत काळ मोकळा झाला आहे. अल्प आयुर्मानाच्या देशात गांधी इतकी वर्षे जगले, हीच ईश्वरी कृपा होय. गांधीजींना मारणाराही हिंदूच निपजला हीही ईश्वरी कृपाच आहे. ब्रिटिशांपासून व ब्रिटिशांनी रक्षिलेले, मुसलमानांपासून व मुसलमानांनी रक्षिलेले गांधीजी अखेर एका हिंदू माथेफिरूच्या गोळीस बळी पडावे यात एक ईश्वरी संकेत दिसतो. यामुळे गांधीजींचे तत्त्वज्ञान यशस्वी होण्याची अधिक शक्यता निर्माण झाली आहे असा विश्वास निर्माण होतो.

गांधीजींचा वध झाला याचा कलंक कोणा व्यक्तीला अगर जातीला नाही. जीवनाची मूल्ये शांतपणे समजून न घेण्याच्या वृत्तीचा, जीवनास आवश्यक अशी एक विचारसरणी समजून घेण्याच्या शक्तीच्या अभावाचा तो एक परिपाक आहे. परंतु या घटनेने साऱ्या हिंदुस्थानाला एक हादरा बसला आहे. कठोर इतिहास असे हादरे देऊनच समाजजागृतीचे कार्य करीत असतो.

या हादऱ्यामुळे वरवरचे द्वेषभाव निमाले आहेत आणि हृदयांतरीचे सद्भाव वर उफाळू लागले आहेत. तसे पाहिले तर गांधीजींना गोळी घालणाऱ्याने ती गोळी आपली संघटना, आपले तत्त्वज्ञान, त्याचे प्रचारक व त्यामुळे निर्माण होणारे विकृत भाव यांच्यावरच झाडली आहे. आता हृदयपालट होऊ

अनुक्रमणिका

लागला आहे. या प्रसंगी आपण द्वेषभाव वा वैरभाव बाळगणे योग्य नाही. हा हृदयपालट होण्यास अवसर दिला पाहिजे. त्याचे स्वागत केले पाहिजे.

गेल्या काही दिवसांत भावनेस बळी पडून आपण विचारशक्तीवरचा तावा सोडला. भावनावश मनुष्याची चूक समजू शकते; परंतु त्यास चिथावणी देणाऱ्याचा मात्र धिक्कारच केला पाहिजे.

गांधीजींच्या साधनेस आंतरराष्ट्रीय परिस्थिती अनुकूल झाल्याचा फायदा मिळाला हे मान्य करूनही असे म्हणावे लागते, की या परिस्थितीचा फायदा करून घेण्याची शक्ती गांधीजींनीच निर्माण केली. हिंदी जनतेत हार्दिक ऐक्य निर्माण करण्याचे गांधीजींचे जीवितकार्य मात्र अपुरेच राहिले. त्यांच्या या प्रयत्नात गेली पाऊणशे वर्षे विघ्ने आणणाऱ्या ब्रिटिश राजसत्तेने जो हिंदू-मुसलमान वाद निर्माण केला, त्यामुळे देशाची फाळणी झाली. तरीही देशात ऐक्यभाव नांदविण्याचा गांधीजींनी अखेरपर्यंत निकराने यत्न केला.

आमच्यातील संघर्ष त्यांच्या मरणाने संपेल व आमच्यात ऐक्यभाव निर्माण होईल अशी चिन्हे दिसू लागली आहेत.

असे झाले तर गांधीजींचा मारेकरी हिंदुधर्माचा रक्षणकर्ता ठरणार नाही. गांधीजींचे तत्त्वज्ञान प्रभावी होईल. तेच हिंदुधर्माचे तारक व रक्षणकर्ते होतील.

आपण गांधीजींच्या अवसानानंतर जी वृत्ती ठेवू व जी कृती करू त्यावर आपले शहाणपण अजमावले जाणार आहे. आपला शोक आवरा आणि मारणारा मेला परंतु गांधीजी अमर आहेत हे सिद्ध करा.

❖❖❖



The Immortal Mahatma या Indian Readers' Digest ने प्रसिद्ध केलेल्या पुस्तकात रवींद्रनाथांची Who Is To Guide Us Now ही कविता उद्धृत केलेली आढळली. तिचाच अनुवाद येथे केलेला आहे. रवींद्रनाथांनी ही कविता केव्हा लिहिली याचा शोध मला लागला नाही. महात्माजींच्या मृत्यूपूर्वी अनेक वर्षे ती लिहिली गेली असावी ही गोष्ट उघड आहे. परंतु महात्माजींचा जीवनक्रम व त्यांच्या जीवनयात्रेची संभाव्य परिणती हीच रवींद्रनाथांना अभिप्रेत असावी असे मात्र प्रत्येक ओळ वाचताना वाटल्याखेरीज राहत नाही.

- देवदत्त दाभोलकर

(नवभारत १९४९)

## "आता आपणास मार्गदर्शन कोण करील?"

एक शांत स्निग्धशीतल आवाज म्हणाला,
'चला आपण सारे आपल्या जीवनध्येयाकडे जाऊ.'
ओठाओठांवरून या बोलाचे प्रतिध्वनी उमटले अंतराअंतरातून ही ज्योत प्रज्वलित झाली आणि एका महायात्रेचे प्रस्थान मांडण्यात आले.

ध्येयमार्ग कठीण होता. उभा चढ चढावयाचा होता. काटेकुटे व दगड जागोजाग पसरले होते. त्या महान नेत्याचे पाऊल मात्र सदैव पुढेच पडत होते.

समर्थ, दुबळे; तरुण, म्हातारे; मोलाचे महत्तम मान्यवर, माती मळणारे मजूर; सारे लोक त्याचे अनुयायी होते.

हळूहळू कोणी दमूनभागून बाजूला पडले; कोणी हळूच चोरून आपले अंग काढून घेतले; कुणाकुणाची श्रद्धेची शिदोरी अपुरी पडली.

एक आततायी अचानक उडी घेऊन पुढे आला आणि त्याने त्याच्यावर आघात केला.

धरित्रीच्या अंकावर त्याचे शरीर अखेरचा विसावा घेत पडले होते.

नीरव निशा शांतस्तब्ध उभी होती.

आणि जाईचा मंद सुगंध वातावरणात दरवळून राहिला होता.

भयचकित अंतःकरणाने सारे सहयात्री एकमेकांना म्हणाले,
"आता आपणास मार्गदर्शन कोण करील?"
आणि प्राचीने उत्तर केले,
"ज्याचा आपण वध केला तोच अजूनही आपले नेतृत्व करील."

साऱ्यांनी लज्जेने आपल्या माना खाली घातल्या. कोणाच्या मुखातून एक अक्षरही बाहेर उमटेना.

प्राची पुन्हा म्हणाली,
"आपल्या संशयसागरात आपण त्याला बुडविले;
आपल्या क्रोधाग्नीत आपण त्याचा बळी घेतला;
परंतु आपल्या प्रेमाने आपण त्याला पुनरुज्जीवित करू.
कारण मरणाच्या पार गेलेला हा मृत्यूंजय महात्मा आपल्या मरणानेच आपणा सर्वांच्या अंतःकरणात आज चिरंजीव झालेला आहे."

- रवींद्रनाथ ठाकूर

# कर्मयोगातून सत्याग्रहाकडे

आधुनिक काली जुनी समाजरचना मागे पडून नवीन समाजरचना जगभर बनत आहे. ही एक सर्वांगीण सामाजिक क्रांती आहे. या क्रांतीच्या कार्यात अध्यात्माचा काही उपयोग आहे की नाही, हाही एक मोठा वादाचा प्रश्न होऊन राहिला आहे. भारताच्या आधुनिक इतिहासात लोकमान्य टिळक आणि महात्मा गांधी यांनी आपापल्या काळी सामाजिक जीवनाविषयी जे सिद्धांत प्रकट केले आहेत, त्यांचा तुलनात्मक विचार केला असता, वरील प्रश्नावर पुष्कळ प्रकाश पडण्यासारखा आहे. यादृष्टीने मी आपले विचार पुणे, मुंबई, बेळगाव, कोल्हापूर इत्यादी ठिकाणी सुशिक्षित समाजापुढे व्याख्यानरूपाने अलीकडे दोन-तीन वर्षे प्रसंगतः मांडत आलो आहे. त्यातील काही महत्त्वाचे मुद्दे या लेखात देण्याचा विचार आहे.

टिळक आणि गांधी या दोन पुरुषांचे राजकारण, त्यांचे व्यक्तिमत्त्व आणि दोघांच्याही अनुयायांचे जीवनाविषयीचे सिद्धांत फक्त तात्त्विक भूमिकेवरून मला न्याहाळावयाचे आहेत. टिळकांनी आपले जीवनविषयक विचार 'गीतारहस्या'त प्रतिपादले आहेत. 'गीतारहस्य' हा ग्रंथ गीतेचा खरा अर्थ कोणता यासाठी जरी लिहिलेला असला, तरी त्यात टिळकांनी सामाजिक जीवनाचे मूल सिद्धांत आधुनिक भाषेत चर्चिले असल्यामुळे तो एक समाजशास्त्रावरील महत्त्वाचा ग्रंथ झाला आहे. 'The Hindu Philosophy of Life, Ethics and Religion' असे टिळकांनी आपल्या ग्रंथाचे स्वतःच नामकरण केले आहे. आणि १९२० साली गांधींशी 'शठे शाठ्यम्', की 'शठे सत्यम्' याबाबतीत वाद करताना 'Any further explanation about difference will be found in my 'Gita-Rahasya" असा आपल्या ग्रंथाचा हवाला दिलेला आहे. त्यामुळे गीतेच्या अर्थाच्या वादविवादात न पडताही 'गीतारहस्या'चा विचार करता येण्यासारखा आहे. टिळकांच्या जीवनविषयक सिद्धांताचे नाव 'कर्मयोग' असे समजण्यास हरकत नाही. गांधींनी आपल्या जीवनविषयक सिद्धांताला 'सत्याग्रह' असे नाव दिलेले प्रसिद्ध आहे. म्हणून 'कर्मयोग' आणि 'सत्याग्रह' यांचा तुलनात्मक विचार करताना गीतेच्या वादात पडण्याची फारशी आवश्यकता नाही. माझ्या या लेखाची भूमिका या स्वरूपाची राहील.

**मोक्ष आणि लोकसंग्रह**

सामाजिक विचारांच्या इतिहासात टिळकांच्या 'गीता-रहस्या'ला निदान भारतीय जीवनात तरी सदैव महत्त्वाचे स्थान राहील. समाजविमुख बनलेल्या अध्यात्माला टिळकांनी या ग्रंथात कायमचे समाजोन्मुख केले आहे. अध्यात्म ही केवळ व्यक्तिगत व पारलौकिक बाब नसून ती एक सामाजिक आणि ऐहिक बाब आहे, हे त्यांनी निश्चित सिद्ध केले आहे. व्यक्तिजीवनाचे साध्य केवळ पारमार्थिक मोक्ष इतकेच मर्यादित करणे हे चुकीचे आहे, मोक्षाबरोबर लोकसंग्रह साधण्यासाठीही प्रत्येक व्यक्तीने आपल्या आयुष्यात अवश्य झटले पाहिजे, असे टिळकांचे आग्रहपूर्वक प्रतिपादन आहे. मोक्ष आणि लोकसंग्रह ही दोन्ही साध्ये मिळून मानवाचे जीवन परिपूर्ण होते, हा टिळकांचा सिद्धांत आधुनिक काली सर्वमान्य होण्यासारखा आहे.

मोक्ष या शब्दाने टिळक जी अवस्था सूचित करतात, ती इहलोकातीलच जीवन्मुक्त स्थिती आहे. पारलौकिक कल्पनांशी तिचा काहीच संबंध नाही. 'सर्वां भूती एक आत्मा' या अध्यात्मिक सिद्धांताचा इहलोकी साक्षात् अनुभव म्हणजेच मोक्ष. ही अनुभूती प्रत्येक माणसाने प्राप्त करून घेणे हे त्याचे प्रमुख साध्य आहे, असे टिळक समजतात. पण या बरोबरच माणूस ज्या समाजात जन्म घेतो व वाढतो, त्या समाजाच्या धारणेसाठी त्याने आमरण निष्काम बुद्धीने झटत राहिले पाहिजे व आपल्या स्वभावधर्मानुरूप करता येण्यासारखे कर्मही केले पाहिजे, असा टिळकांचा योग्य आग्रह आहे. मोक्ष अथवा समत्वबुद्धी आणि लोकसंग्रह अथवा समाजधारणात्मक कर्म मिळून टिळकांचा कर्मयोग होतो. ही एक जीवननिष्ठा असून, प्रत्येक माणसाने ती आमरण पाळण्यातच त्याचे जीवन कृतार्थ होते असे टिळकांचे मत होते. लोकसंग्रह या शब्दाने टिळकांनी समाजधारणात्मक सर्व कर्मांचा - अर्वाचीन भाषेत बोलावयाचे तर सर्व उत्पादक कर्मांचा - अंगीकार केला आहे. कारण, आत्मज्ञानात गढून गेलेला माणूसही समाजमनावर शुभसंस्कार घडवून आणतो. संन्यासधर्म मुळीच लोकसंग्रह करीत नाही, असे टिळकांचे म्हणणे नाही. 'आत्मज्ञानाने ज्या सिद्धपुरुषाची बुद्धी निःसंग व पवित्र झाली आहे तो दुसरे काही करो वा न

अनुक्रमणिका






करो, मानवी बुद्धीच्या शुद्धतेची कमाल आणि निसर्गतःच विषयास लुब्ध होणाऱ्या दुर्धर मनोवृत्तीस आपल्या ताब्यात आणण्याचे पराकाष्ठेचे मानवी सामर्थ्य तो लोकांच्या प्रत्यक्ष नजरेस आणून देतो. ही कामगिरी लोकसंग्रहदृष्ट्याही काही लहानसहान नव्हे.' (गीतारहस्य - पृष्ठ ४६५). याच दृष्टीने बौद्धधर्मीय यति आणि शंकराचार्यांचे वैदिक संन्यासी अथवा रामदासांसारखे ब्रह्मचारी, यांना टिळकांनी कर्मयोग्यांतच दाखल केले आहे. तथापि, टिळकांचा लोकसंग्रह मुख्यतः सामाजिक संघटनेचा, विशेषतः गृहस्थधर्मात राहून जीवन चालविणाऱ्या असंख्य जनतेच्या जीवनाचा सर्वांगीण विचार करणारा आहे. हा विचार आपल्याकडे चातुर्वर्ण्याच्या सिद्धांतात सामावलेला आढळतो. तथापि, चातुर्वर्ण्य अथवा जातिसंस्था टिळकांनी कर्मयोग विचारात अपरिहार्य मानलेली नाही (गी.र.पृ.४९२). 'समाजव्यवस्था कोणतीही असो, त्यात यथाधिकार प्राप्त झालेले कर्म उत्साहाने करून सर्वभूतहितरूप आत्मश्रेय साधा,' असे टिळकांचा कर्मयोग सांगतो.

आपला कर्मयोग पाश्चात्त्यांच्या प्रमाणे भौतिकसुखवादी अथवा केवळ दुःखनिवारणेच्छु नसून तो अध्यात्मिक पूर्णतेच्या पायावर निष्काम लोककल्याण करणारा श्रेष्ठ जीवनमार्ग आहे, असा टिळकांचा दावा आहे. यामुळे टिळकांच्या लोकसंग्रहाचे साध्यदेखील सामाजिक मोक्ष असेच ठरते. त्यामुळे टिळकांच्या कर्मयोगात लोकसंग्रहाचा व्यक्तिगत मोक्षाशी विरोध संभवत नाही. मोक्षासाठी ज्या सद्‌गुणांची साधना अपेक्षित असते, त्याच सद्‌गुणांच्या विकसनाने लोकसंग्रह साध्य होतो. मोक्षाची आणि लोकसंग्रहाची एकच साधना बनते. व्यक्तिगत सद्‌गुण वेगळे आणि सामाजिक व्यवहारातील सद्‌गुण वेगळे हा भेद टिळकांच्या कर्मयोगात उत्पन्न होऊ शकत नाही. यासाठी टिळकांनी आपल्या कर्मयोगाला 'निष्काम' हे विशेषण जोडलेले आहे. आत्मज्ञान आणि भक्ती, संयम आणि ध्यान इत्यादी उपायांनी चित्ताची निष्कामता सिद्ध करता येते, असे टिळकांचे प्रतिपादन आहे. कर्मयोग्याचा सर्व व्यवहार - व्यक्तिगत आणि सामाजिक - या उदात्त पातळीवरूनच चालू राहिला पाहिजे, असे त्यांचे म्हणणे आहे. निष्काम बुद्धी बाह्य कर्मात प्रकट होत असताना, ती सत्य, प्रेम, समता इत्यादी रूपांनीच प्रकट होणे शक्य आहे, असे टिळक मानतात. तथापि, कर्मयोगी ज्या समाजात वावरत असतो तो समाज जोपर्यंत संपूर्णपणे सत्प्रवृत्त झालेला नसेल, तोपर्यंत निष्काम कर्मयोग्याच्या बाह्य वर्तनात सत्य-अहिंसादी आदर्श व्यवहार आपल्या पूर्ण स्वरूपात व्यक्त होऊ शकत नाहीत, असे टिळकांचे मत आहे.

**टिळक आणि गांधी यांच्यामधील मतभेद**

गांधींच्या सत्याग्रह-सिद्धांतात टिळकांच्या कर्मयोगापेक्षा साधनशुद्धीवर अधिक भर दिलेला आहे. लोकसंग्रहाच्या कोणत्याही कार्यात नैतिक साधनांची शुचिता अत्यंत निष्ठेने टिकविली पाहिजे, त्या बाबतीत शिथिलता येऊ दिल्यास लोककल्याण साधण्याच्या दृष्टीनेही उणेपणा आल्याखेरीज राहणार नाही, असे गांधींचे म्हणणे आहे. म्हणून सामाजिक आचारात शुद्ध बुद्धीइतकेच शुद्ध कर्मही अत्यंत आवश्यक आहे, असे त्यांचे मत आहे. अत्यंत न्याय्य साध्यासाठी झगडत असताही असत्य, हिंसा इत्यादिकांचा अंगीकार केला असता, त्या साध्याच्या सिद्धतेत विकृती शिरल्याशिवाय राहत नाही व त्यामुळे अंती न्यायप्रस्थापनेचे कार्यच खंडित होते अशी गांधींची जीवननिष्ठा दिसून येते.

टिळकांचा कर्मयोग 'शठे शाठ्यम्' या तत्त्वावर, तर गांधींचा सत्याग्रह 'शठं प्रत्यपि सत्यम्' या तत्त्वावर उभारलेला आहे. लौकिक व्यवहारांत, विशेषतः राजकारणात, साधुत्वाने वागून यश मिळण्यासारखे नसते, असे टिळकांनी गांधींना स्वतःच लिहिलेले प्रसिद्ध आहे - "Politics is a game of worldly people, and not of Sadhus and instead of the maxim 'अक्कोधेन जिने कोधम्' as preached by Buddha, I prefer to rely on the maxim of Shri Krishna 'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्.' Both methods are equally honest and righteous, but the one is more suited to this world than the other." याला उत्तर देताना या दोन वचनांत आपणाला मुळीच विरोध आढळत नसल्याचे सांगून गांधींनी पुढील उद्‌गार काढले आहेत. "With deference to the Lokmanya, I venture to say that it betrays mentel laziness to think that the world is not for Sadhus. The epitome of all religions is to promote पुरुषार्थ and पुरुषार्थ is nothing but a desperate attempt to become sadhu i.e. become gentleman in every sense of the term." कर्मयोग आणि सत्याग्रह यांचा तुलनात्मक विचार करीत असता टिळक आणि गांधी यांच्या मतभेदाची थोडी सविस्तर चर्चा केली पाहिजे.

नैतिक वर्तनाचे शुद्धाशुद्धत्व ठरवताना कर्त्याच्या बुद्धीला महत्त्व दिले पाहिजे असे टिळकांचे मत असले तरी, कर्माच्या बाह्य स्वरूपाचाही विचार अवश्य केला पाहिजे, हे त्यांना मान्य होते. आंतरिक समत्वबुद्धि व बाह्य लोककल्याण (केवळ भौतिक सुख नव्हे) या दोनही अंशांचे पूर्ण मीलन ज्यात

होईल तेच नैतिक-दृष्ट्या शुद्ध वर्तन होय. असे टिळकांचे सामान्यतः प्रतिपादन आहे. 'दुष्ट पुरुषाचा प्रतिकार साधुपणाने होणे शक्य असेल, तर प्रथम तो साधुपणानेच करावा.' (गी.र.पृ. ३९४) पण साधुपणाने निवारण होणे शक्य नसेल तर जशास तसे होऊन दुष्टांचे निवारण करावे, एवढेच त्यांचे म्हणणे आहे. त्याबरोबरच अपरिहार्य म्हणून नित्य नीतिधर्मांना काही अपवाद आमच्या शास्त्रकारांनी सांगितले असले तरी त्यासाठी ते प्रायश्चित्ते सांगतात. (गी.र.पृ. ३७६) असा पाश्चात्य आधिभौतिक नीतिशास्त्राहून आपल्या नीतिशास्त्राचा मोठेपणा त्यांनी दाखविला आहे. पण याच्या उलट 'दुष्टांचे योग्य शासन केल्याने साधुपुरुषांच्या आत्मौपम्यबुद्धीस किंवा निर्वैरीपणासहि काही कमीपणा येत नाही.' (गी.र.पृ. ३९१) असेही त्यांनी प्रतिपादले आहे. या सर्व लिखाणात थोडा परस्परविरोध उघड दिसतो आणि असाधुत्वाचा साधुत्वाने प्रतिकार करणे हेच नैतिकदृष्ट्या सर्वश्रेष्ठ तत्त्व आहे, हे स्पष्ट होते. अपरिहार्य म्हणून केलेला असाधुतेचा स्वीकार हा तत्त्वदृष्ट्या गौणच ठरतो.

सत्य अहिंसादी श्रेष्ठ नीतितत्त्वे दुष्काळासारख्या आपत्प्रसंगी पाळणे चांगल्या माणसालाही कठीण होत असल्यामुळे, अशा प्रसंगी 'आपद्धर्म' म्हणून आपल्या शास्त्रात ज्या सवलती सांगितल्या आहेत, त्यांच्यापेक्षा टिळकांच्या कर्मयोगातील विचार उच्च पातळीवरील आहे, हे येथे लक्षात ठेवले पाहिजे. नीतिधर्म आणि इंद्रियवृत्ती यांच्या झगड्यात दुर्बलपणामुळे माणसे नेहमीच शुद्ध नीतिधर्माचे आचरण करू शकत नाहीत. पण टिळकांच्या कर्मयोगात या दुर्बल पोटभरू लोकांचा पक्ष उचलून धरलेला नाही. इंद्रियजय करणाऱ्या पुरुषार्थी साधकाचाच त्यात विचार आहे. अशा साधकालाही आत्मरक्षणासाठी नैतिक धर्माला मुरड घालावी लागल्यास शुद्ध नैतिकदृष्ट्या तो गौणपक्ष आहे, हेही टिळकांना मान्य आहे.

### नैतिक विकास ही सततवर्धिष्णु जीवनशक्ती

हक्क आणि कर्तव्य यांच्या विचारांची क्वचित गल्लत केली जाते. 'आपल्या दुष्ट कृत्याने लोकांचे गळे कापण्यास जो पुरुष प्रवृत्त झाला, त्यास इतरांनी आपल्याबरोबर साधुपणाने वागावे असे म्हणण्यास कोणताही नैतिक हक्क राहिलेला नसतो.' 'किंबहुना साधुपुरुषांस याप्रमाणे एखादे असाधुकर्म करणे भाग पडते तेव्हा त्याची जबाबदारी शुद्ध बुद्धीच्या साधुपुरुषाकडे न येता, दुष्ट पुरुषाच्या दुष्ट कृत्याचाच तो परिणाम असल्यामुळे त्या दुष्ट पुरुषासच त्याबद्दल जबाबदार धरले पाहिजे.' (गी.र.पृ.३९५) असे टिळकांनी म्हटले आहे. धर्मशास्त्रे काय अथवा व्यावहारिक जगातील कायदे काय हेच तत्त्व पुरस्कारितात, हे प्रसिद्धच आहे. तथापि, कायदेशीर हक्कांपेक्षा जसे नैतिक कर्तव्य श्रेष्ठ मानावे लागते, त्याचप्रमाणे नैतिक हक्कांपेक्षाही नैतिक कर्तव्य श्रेष्ठ असते, हेही लक्षात ठेवले पाहिजे. उच्च ध्येयवादासाठी जो माणूस आत्मसंरक्षणाच्या आपल्या श्रेष्ठ हक्कावरही स्वेच्छेने पाणी सोडण्यास तयार होतो त्या माणसाची नैतिक योग्यता सर्वांपेक्षा श्रेष्ठ समजतात, हे टिळकांनीही दाखवून दिले आहे (गी.र.पृ.३९९). पण लोककल्याणाच्या शुद्ध सात्त्विक हेतूने, म्हणजेच अत्यंत स्वार्थनिरपेक्षतेने कर्मयोग्याने नैतिक धर्माला मुरड घातली, तर ती नैतिकदृष्ट्या दोषार्ह नाही इतकेच त्यांचे म्हणणे आहे. पण याही बाबतीत आदर्श समाजात अधिक शुद्धता निर्माण होऊ शकेल असा त्यांचा विश्वास आहे. म्हणजे कर्मयोगी पुरुषांचे शुद्ध स्वरूप आदर्श समाजातच व्यक्त होऊ शकेल असा सिद्धांत निष्पन्न होतो. पूर्ण समाजाच्या निर्मितीच्या पूर्वी कोणतीही व्यक्ती पूर्ण होऊ शकत नाही हाच याचा अर्थ होय. गांधीजींचा सत्याग्रहसिद्धांत याच दृष्टीने, कोणाही माणसाला पूर्णपणे स्थितप्रज्ञ होणे शक्य नाही, असे प्रतिपादन करतो. ते प्रतिपादन अधिक सूक्ष्म व तर्कदृष्ट्या अधिक काटेकोर आहे असेच म्हणावे लागते. नैतिक जीवनाच्या दृष्टीने पूर्ण समाजाची कल्पना देखील तर्कशुद्ध नाही. मानवाच्या हृदयविकासाबरोबर त्याच्या नैतिक जीवनाचे क्षेत्रही सतत वाढतच जाणार. एका अवस्थेत अपरिहार्य वाटणाऱ्या नैतिक मर्यादा दुसऱ्या अवस्थेत अपरिहार्य वाटणार नाहीत. नैतिक विकास ही एक सतत वाढत जाणारी व केव्हाही न थांबणारी अशीच जीवनशक्ती आहे. आत्मसाक्षात्कारी पुरुषांच्या बाह्य वर्तनात यामुळेच भिन्न भिन्न आविष्कार झालेले इतिहासात नमूद आहेत. त्यामुळे आत्मविकासाच्या क्षेत्रातही वाढ होऊ शकते असे म्हणावे लागते. या बाबतीत टिळक आणि गांधी यांच्या विचारांतील भेद अति सूक्ष्म भासला, तरी जीवनाच्या तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने तो अत्यंत महत्त्वाचा आहे, असे मला वाटते.

### क्षत्रियांचा कर्मयोग आणि ब्राह्मणांचा कर्मयोग

हा अतितात्त्विक प्रश्न सोडून सामाजिक जीवनाच्या आजच्या परिस्थितीचा विचार करू लागल्यासही कर्मयोग आणि सत्याग्रह यामध्ये महत्त्वाचा भेद आढळून येतो. सामाजिक व्यवहारात अहिंसेची मर्यादा कोणती या प्रश्नावर या








दोन तत्त्वज्ञानांचा मतभेद दिसून येतो. चातुर्वर्ण्याच्या सिद्धांतात राज्य संस्थेला आणि क्षात्रधर्माला फार महत्त्वाचे स्थान देण्यात आलेले आहे. आणि क्षात्रधर्मात हिंसा अपरिहार्य म्हणून धर्म्य मानलेली आहे. टिळकांच्या कर्मयोगात चातुर्वर्ण्याचा पुरस्कार केलेला नसला तरी क्षात्रधर्माला आवश्यक मानलेले आहे. क्षात्रवृत्तीच्या कर्मयोगी पुरुषाने निष्कामबुद्धीने, लोककल्याणार्थ अपरिहार्य म्हणून, हिंसेचा स्वीकार केला असता त्याच्या मोक्षाला म्हणजेच त्याच्या समत्वबुद्धीला बाध येत नाही, असे टिळकांचे म्हणणे आहे. चातुर्वर्ण्याच्या विचारात क्षात्रधर्माबरोबरच ब्राह्मणधर्माचेही विवेचन येते. हा ब्राह्मणधर्म संपूर्णपणे अहिंसेवर उभारण्यात आला आहे. टिळकांनी आपल्या 'गीतारहस्या'त फक्त क्षात्रधर्मातील कर्मयोगाचीच सविस्तर चर्चा केली आहे. ब्राह्मणधर्मातील कर्मयोगाचे विवरण त्यात नाही. भारतीय संस्कृतीच्या इतिहासात ब्राह्मण आणि क्षत्रिय या दोनही वृत्तीच्या साधकांची वर्णने येतात. गृहस्थाश्रमात राहून आपापल्या स्वभावधर्माप्रमाणे आपला विकास व समाजाची सेवा आमरण करीत राहणे यालाच टिळकांनी कर्मयोग म्हटले असल्यामुळे, क्षात्रधर्माव्यतिरिक्त इतर गृहस्थधर्मांना संन्यासधर्म म्हणता येणार नाही. पण टिळकांच्या विवेचनात ही उणीव राहून गेलेली दिसते. क्षात्रधर्माचे कार्य दुष्टांचा निग्रह करण्याचे आहे. पण समाजातील दुष्ट प्रवृत्तींचे केवळ बाहेरून नियमन केल्याने त्या नाहीशा होत नाहीत. त्यांच्या पूर्ण निर्मूलनासाठी समाजात सत्प्रवृत्तींची आवड वाढवावी लागते. हे कार्य सत्प्रवृत्तींचा धगधगीत आदर्श समाजापुढे उभा केल्याखेरीज घडून येत नाही. समाजात दुष्टांची म्हणजे काही स्वतंत्र जात असते असे नाही. प्रत्येक माणसात सत् व असत् या दोनही प्रवृत्तींचे मिश्रण कमी अधिक प्रमाणात आढळते. त्यांतील सत्प्रवृत्ती वाढत गेल्या म्हणजे समाजात सत्प्रवृत्तींचे लोक वाढलेले दिसतात. हे सत्प्रवृत्ती वाढवण्याचे कार्य मुख्यतः ब्राह्मण धर्माचे कार्य होय. केवळ आत्म्याच्या चिंतनात गढून जाऊन सामाजिक प्रश्नांकडे दुर्लक्ष करणारा माणूस कर्मयोगी ब्राह्मण नव्हे. समाजाच्या सर्व व्यवहारांत आपली अहिंसेची प्रवृत्ती उभी करून अन्यायाचा आत्मबलिदानाने प्रतिकार करणारा माणूस म्हणजे कर्मयोगी ब्राह्मण. दुष्टाव्याचा जय किंवा निवारण करणे हे साधुपुरुषाचे मुख्य कर्तव्य असल्याचे टिळक सांगतात; पण 'साधुपणाने निवारण होणे शक्य नसेल, तर जशास तसे होऊन दुष्टाचे निवारण करू नये; त्याच्या दुष्ट कृत्यास खुशाल बळी पडावे असे आमच्या धर्मग्रंथांनी कोठेही प्रतिपादन केलेले नाही.' (गी.र.पृ.३९५) हे टिळकांचे म्हणणे चिंत्य आहे. अशा वेळी क्षात्रवृत्तीच्या माणसाने शस्त्र घेऊन प्रतिकार करणे हा क्षात्रधर्माचा कर्मयोग असला तरी ब्राह्मणधर्माचा कर्मयोगही तोच आहे, हे म्हणणे मान्य करता येणार नाही. दुष्ट पुरुषाच्या दुष्टपणाला भीतीनें, दुर्बलपणामुळे बळी जाणे हे निःसंशय भेकडपणाचे लक्षण होय. हा भेकडपणा देखील हिंसाच आहे आणि त्यापेक्षा प्रतिकारक हिंसा श्रेष्ठच आहे. तथापि आपल्या आत्मबलाच्या सामर्थ्यावर दुष्ट पुरुषाचा दुष्टपणा झेलून घेताना अहिंसक पुरुष जरी दुष्टांच्या हिंसेला शरीराने बळी गेला, तरी त्यात दुष्टाचा जय होत नसून अहिंसक पुरुषाचाच जय होतो. अशा अहिंसेच्या तेजस्वी बलिदानाने दुष्टांच्याही हृदयातील असत् प्रवृत्ती वितळून जातात आणि ते कायमचे सत्प्रवृत्त बनतात. धार्मिक इतिहासात असल्या प्रकारांची अनेक उदाहरणे नमूद आहेत. हा अहिंसक कर्मयोग उत्कटतेने आचरणारे लोक ज्या समाजात नसतील त्या समाजात केवळ क्षात्रकर्मयोगाने दुष्टांचे प्राबल्य थांबवले जाणार नाही. आमच्या धर्मग्रंथातही अशी उदाहरणे आहेतच. दुष्ट माणूस आणि दुष्ट प्रवृत्ती या दोन गोष्टी भिन्न आहेत. अध्यात्मिकदृष्ट्या प्रत्येक माणसात सद्अंश असतो हे मान्य केले पाहिजे. म्हणून दुष्टांचा नाश याचा अर्थ केवळ दुष्टप्रवृत्तीचा विलय असाच समजला पाहिजे आणि दुष्टांचेही हृदयपरिवर्तन कोणत्या मार्गाने होईल याचे संशोधन करीत राहिले पाहिजे. टिळकांच्या कर्मयोगात दुष्टांच्या हृदयपरिवर्तनाचा कोठेच विचार केलेला नाही.

### अहिंसक मार्ग ही समाजाची सृजक शक्ती

'पूर्ण समाजातच नैतिक जीवनाचा पूर्ण आदर्श प्रकट होऊ शकतो' हा हर्बर्ट स्पेन्सर यांचा टिळकांनी उपयोगिलेला सिद्धांत विल्यम जेम्स यांनी 'The Varieties of Religious Experience' या ग्रंथातही काही प्रमाणात मान्य केलाच आहे. पण त्यांनी 'The Value of Saintliness' नावाच्या एका महत्त्वाच्या प्रकरणात अहिंसक कर्मयोगाची दुसरी बाजूही उत्तम प्रकारे मांडली आहे. अहिंसक संत आपल्या अव्यवहार्य प्रेमबळावर समाजातील अत्यंत दुष्ट हृदयावरही विजय मिळवतात, दुष्टांचे हृदयपरिवर्तन करून त्यांना सज्जन बनवितात, शत्रूंचे मित्रात रूपांतर घडवून आणतात असे दाखविले आहे. संतांची ही कामगिरी सामाजिक विकासाच्या दृष्टीने अत्यंत श्रेष्ठ प्रकारची आहे असे विल्यम जेम्स यांनी स्पष्ट म्हटले आहे. "They are impregnators of the world, vivifiers and animators of potentialities of

goodness which, but for them, would lie forever dormant'' संतांचे अहिंसक मार्ग या समाजाच्या सृजन शक्ती आहेत, (These saintly methods are creative energies) असे त्यांनी दाखवून दिले आहे. स्पेन्सर यांच्या बरोबरच विल्यम जेम्स यांचाही हा विचार टिळकांनी आपल्या ग्रंथात दिला असता, तर त्यांच्या कर्मयोगाच्या विवेचनाला पूर्णता आली असती. स्पेन्सर यांच्या मते साधुपुरुषाला आपल्या पूर्ण साधुत्वाने नरमांसभक्षकांच्या समाजात राहता येणे शक्य नाही. (गी.र.पृ.३७३). परंतु संतांच्या जीवनेतिहासात अशा गोष्टी कित्येकांनी शक्य करून दाखविल्या आहेत. विल्यम जेम्स यांनी वरील प्रकरणांतच, मेलॅनेशिअन नरमांसभक्षकांच्या समाजात प्राणघातक भाल्यांच्या वर्षावात निःशस्त्रपणे ख्रिस्ताचा संदेश सांगण्यास गेलेल्या एका ख्रिस्ती मिशनऱ्याची कथा दिली आहे. त्या मिशनऱ्याच्या अहिंसक धैर्याचा त्या नरमांसभक्षकांवर तत्काळ परिणाम घडून आल्याचे आणि तो सर्व समाज अखेरीस ख्रिस्ती झाल्याचे ऐतिहासिक वृत्त दिले आहे; आणि हे काही एखादे अपवादात्मक उदाहरण नसून, अशा अहिंसक शौर्याच्या कथांनी मिशनरी लोकांचा इतिहास वराच भरून राहिला असल्याचेही नमूद केले आहे.

गांधींच्या सत्याग्रह-सिद्धांतात हे हृदयपरिवर्तनाचे तत्त्व प्राणभूत मानलेले आहे. मानवाने मानवाचा वध करणे ही गोष्ट सत्याग्रह-सिद्धांताला मंजूर नाही. दुर्जनाची हिंसा ही देखील हिंसाच असल्यामुळे सत्याग्रहाच्या दृष्टीने ती मानवाचा धर्म बनू शकत नाही. आजच्या राज्यसंस्थेच्या वतीने होणारी हिंसादेखील नैतिकदृष्ट्या निर्दोष नव्हे. मानवांना जोपर्यंत सत्याग्रहधर्म आचरण्याची पात्रता येणार नाही तोपर्यंत मानवसमाजात राज्यसंस्था ही अपरिहार्य म्हणून राहीलच. परंतु ते मानवसमाजाचे भूषण मानणे बरोबर नाही. आपल्या अपूर्णतेचेच ते लक्षण असल्यामुळे, मानव समाजाचे ते दूषणच समजले पाहिजे. आणि हे दूषण कोणत्या उपायांनी घालविता येईल याचे कर्मयोगी पुरुषांनी सतत चिंतन व संशोधन चालविले पाहिजे. त्यासाठी प्रथम आपल्या व्यक्तिगत जीवनात सत्याग्रहधर्माची दीक्षा घेतलेले, सेवापरायण कर्मयोगी निर्माण झाले पाहिजेत. अशा सत्याग्रही व्यक्तींनी सामुदायिक जीवनाच्या विविध क्षेत्रांतील आज अपरिहार्य वाटणारी हिंसा कशी परिहार्य करून दाखविता येईल, याचे प्रयोग हाती घेतले पाहिजेत. म्हणजे क्रमाक्रमाने मानव समाजाच्या जीवनात अहिंसेचा प्रदेश वाढत जाईल. या दृष्टीने गांधींचा सत्याग्रहमार्ग हाच उच्च कर्मयोग आहे. कोणत्याही अर्थाने त्याला कर्मसंन्यास म्हणता येणार नाही. टिळकांच्या कर्मयोगापेक्षा गांधींच्या सत्याग्रहविचारात सामाजिक जीवनाचा अधिक सूक्ष्म विचार सामावलेला आहे असे म्हणावे लागेल. सामाजिक जीवनातील जे क्षेत्र अपरिहार्य हिंसेचे क्षेत्र ठरेल, तेथे टिळकांचा निष्कामबुद्धीचा कर्मयोगच स्वीकारणे योग्य होईल. पण ज्या क्षेत्रात अहिंसक पर्याय उपलब्ध होऊ शकेल त्या क्षेत्रात सत्याग्रहमार्गाचाच अवलंब केला पाहिजे. या क्षेत्रांच्या मर्यादांच्या बाबतीत कित्येकवेळा मतभेद होणे अगदी स्वाभाविक आहे. अशावेळी सत्याग्रही निष्ठेच्या माणसांनी आपले प्रयोग स्वतःच्या जबाबदारीवर स्वतंत्रपणे चालू ठेवले पाहिजेत. हे सत्याग्रही म्हणजेच चातुर्वर्ण्याच्या भाषेतील ब्राह्मण कर्मयोगी होत.

### परमेश्वर आणि ज्ञानी पुरुष

टिळकांनी लोककल्याणार्थ करावी लागणारी हिंसा निर्दोष आहे असे म्हणताना परमेश्वरानेही साधूंच्या संरक्षणासाठी व दुष्टांचा नाश करण्यासाठी वेळोवेळी अवतार घेतले आहेत, असे म्हटले आहे. 'ज्ञानाने ज्ञानी पुरुष जर परमेश्वररूप होतो तर परमेश्वर जे काम करतो ते, परमेश्वराप्रमाणे म्हणजे निःसंग बुद्धीने करण्याची आवश्यकता ज्ञानी पुरुषास तरी कशी सुटणार?' (गी.र.पृ.३३०). 'सर्व सृष्टीचे पालनपोषण करून लोकसंग्रह करण्याचा भगवंतांचा जो हा अधिकार तोच, पुरुष ज्ञानी झाला म्हणजे त्याला प्राप्त होत असतो' (पृ.३२८) असे टिळकांनी प्रतिपादले आहे. याही बाबतीत सत्याग्रहसिद्धांताचा तात्त्विक विरोध आहे. माणूस कितीही ज्ञानी झाला तरी, तो देहधारी असेपर्यंत संपूर्ण ईश्वर होणे शक्य नाही असे गांधींचे मत आहे. 'ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति' इत्यादी उपनिषदांतील वचनांचा शब्दशः अर्थ करता येत नाही, असे वेदांतसूत्रांचेही स्पष्ट मत आहे. 'जगद्व्यापारवर्जं प्रकरणाद्, असंनिहितत्त्वाच्च' (वेदांत-सूत्र ४-४-१७) या सूत्राने ब्रह्मवेत्त्यालाही जगद्व्यापारात वाटेल ती ढवळाढवळ करण्याचे सामर्थ्य प्राप्त होत नाही, तर तो ईश्वराचाच खास अधिकार आहे, असे स्वच्छ म्हटले आहे. वेदांतसूत्रांचा अत्यंत बारकाईने उपयोग करणाऱ्या टिळकांनी 'गीतारहस्या'तील आपल्या विवेचनात या महत्त्वाच्या सूत्राचा कोठेच उल्लेख केला नाही याचे आश्चर्य वाटते. ईश्वराने दुष्टांचा वध केला तरी, त्यात केवळ साधूंचे रक्षण एवढाच हेतू असत नाही. दुष्टांनाही मुक्ती देणे हा त्यामागे हेतू असल्याचे आपल्या पुराणग्रंथात

सर्वत्र वर्णन आहे. याचा उल्लेख टिळकांनी 'गीतारहस्या'त (पृ.३९४) केला असला तरी त्याची विशेष चर्चा केली नाही. ज्याची हिंसा करायची त्याचेही त्या हिंसेने कल्याण होणार असेल, तर अशा हिंसेला गांधीदेखील अहिंसा म्हणण्यास तयार आहेत. गायीच्या वासराचे प्राणहरण करण्याच्या निमित्ताने या अहिंसात्मक हिंसेची फार सुंदर चर्चा गांधींनी अनेक लेखांतून केलेली आहे. दुष्ट हिंसेला अहिंसा म्हणता येत नाही; याचे कारण, ती हिंसा त्या दुष्टाला वगळून बाकीच्या सर्व समाजाच्या कल्याणाची असली तरी, ती त्या दुष्टाच्या कल्याणाची असेलच असे म्हणता येणार नाही. माणूस कितीही ज्ञानी झाला तरी परमेश्वराप्रमाणे तो सर्वज्ञ कधीच होऊ शकत नसल्यामुळे, त्याच्या हातून होणारी दुष्ट-हिंसा ही अहिंसा ठरणे शक्य नाही. तो फक्त सर्वज्ञ परमेश्वराचाच अधिकार आहे. 'न देवचरितं चरेत्' हा इशारा यामुळेच निर्माण झालेला आहे.

याशिवाय ईश्वराचे सारेच अवतार दुष्टांची हिंसा करण्याकरिता झाले आहेत असे नाही. संपूर्ण अहिंसेचा आचार करणारेही अवतार आपल्याकडे मानले आहेतच. ईश्वराचे स्वरूप भक्तिमार्गातील संतांनी संपूर्ण प्रेममय मानिले आहे. तो कोणाही पतिताला कधीही सोडून देण्यास तयार होत नाही. त्याला पावन करण्याची तो सदैव इच्छा बाळगतो. माणसाला जशी ईश्वरप्राप्तीची तळमळ असते त्याप्रमाणेच परमेश्वराला पतिताचा उद्धार करण्याचा कळवळा आहे, असे सर्व संतांचे सांगणे आहे. टिळकांनी 'गीतारहस्या'त भक्तियोगावर एक स्वतंत्र प्रकरण लिहिले असले तरी, संतांच्या या प्रेमस्वरूप परमेश्वराचा बोध त्यात कोठेच आढळत नाही. गांधींच्या सत्याग्रहात ईश्वराच्या प्रेमस्वरूपाचा सर्वत्र पुरस्कार आढळून येतो. टिळकांच्या भक्तीतही हृदयाचे अनिवार भरते आढळत नाही. 'गतिर्भर्ता प्रभुः साक्षी, निवासः शरणं सुहृद्' या ईश्वराचे दर्शन टिळकांच्या कर्मयोगात मिळत नाही. बुद्धिवादाची रूक्षताच सर्वत्र व्यापून राहिलेली आढळते. रूक्ष बुद्धिवादाने मानवी हृदयाचे परिवर्तन होण्याची फारशी आशा नाही. त्याला अपरंपार प्रेमाचा ओलावाच हवा. असे प्रेम मानववधाचा स्वीकार करू शकत नाही.

### पापपुण्याच्या अतीत?

ब्रह्मीभूत झालेल्या साधुपुरुषांची स्थिती नेहमीच पवित्र व निष्पाप असते, कारण त्यांची बुद्धी पापपुण्यापासून अलिप्त असते, हा एक अध्यात्मातील प्रसिद्ध सिद्धांत आहे. 'समबुद्धीने केलेले घोर युद्धही धर्म्य व श्रेयस्कर आहे.' (पृ.३९३) हे कर्मयोगाचे सार आहे असे म्हणताना टिळकांनी या सिद्धांताचा आश्रय केला आहे. ज्ञानी पुरुष पापपुण्याच्या अतीत होतो याचा खरा अर्थ येथे स्पष्ट केला पाहिजे. द्वंद्वातीत अवस्था प्राप्त करून घेण्यासाठी प्रथम पापकर्मांचा स्वरूपतः बुद्धिपुरस्सर त्याग करावयाचा असतो. पुण्यकर्मांचा आग्रहपूर्वक अंगीकार करून हा त्याग सिद्ध होतो. परंतु 'मी पुण्यकर्म आचरीत आहे' याचा अहंभाव म्हणजे जाणीवही शेवटी गळून पडावी लागते. पुण्यकर्म करण्याचा देहाला, मनाला आणि बुद्धीला अखंड अभ्यास घडला म्हणजे शेवटी पुण्यकर्म हा सहजस्वभावच बनतो. पुण्याच्या अतीत होण्याचा हा एकच मार्ग आहे. म्हणून ब्रह्मज्ञानी कर्मयोगी पापपुण्याच्या अतीत झाला, तरी त्याच्या हातून कोणतेही पापकर्म संभवत नाही. मात्र असा ब्रह्मज्ञानी पुरुष देखील आपल्या प्रकृतीने व्यवहारात मर्यादित झाल्याशिवाय राहत नाही. तो आपल्या समाजाच्या आणि आपल्या काळाच्या पापपुण्यविषयक कल्पनांनी मर्यादित राहतो. क्वचित एखादा पुरुष वृत्तीने क्रांतिकारक असल्यास तो पापपुण्याच्या नवीन कल्पना स्वतः निर्माण करतो आणि समाजापुढे आदर्श म्हणून मांडतो. श्वेतकेतूसारख्या साधुपुरुषांनी समाजाच्या नैतिक आदर्शात अशा रीतीने भर घातल्याचे टिळकांनीही दाखवून दिले आहे. या दृष्टीने पाहता टिळकांच्या कर्मयोगापेक्षा गांधींचा सत्याग्रह हा नैतिक आदर्शात भर घालणारा क्रांतिकारक विचार आहे असे दिसून येते. समाजहितासाठी दुष्ट हिंसा अपरिहार्य म्हणून स्वीकारणाऱ्या 'कर्मयोगा'पेक्षा कोणत्याही परिस्थितीत मानववध अधर्म्य समजून दुष्टाचे हृदयपरिवर्तन करण्याचे साध्य अंगीकारणारा 'सत्याग्रह' अधिक विकसित झालेला आहे हे उघड आहे.

### 'जशास तसे'चा झालेला विकृत अर्थ

'शठं प्रत्यपि सत्यम्' हा बुद्धाचा आणि 'शठे शाठ्यम्' हा कृष्णाचा मार्ग असे म्हणण्यात टिळकांनी दोघांवरही उगाच अन्याय केला आहे. 'गीतारहस्या'त 'न पापे प्रतिपापः स्यात् साधुरेव सदा भवेत्,' 'न चापि वैरं वैरेण केशव व्युपशाम्यति', 'जयो वैरं प्रसृजति' इत्यादी भारतातील वचने देऊन हा मार्ग वैदिकच आहे असे टिळक म्हणतात. 'अक्रोधेन जयेत् क्रोधम्' इत्यादी श्लोक मूळ महाभारतातला असून धम्मपदात त्याचा हुबेहूब अनुवाद केला असल्याचेही टिळकांनी प्रतिपादले आहे (पृ.३९५). असे असता बिचाऱ्या बुद्धाच्या डोक्यावर नापसंतीचा शिक्का का? कृष्णाच्या वचनाचा 'जशास तसे' असा अगदीच प्राकृत अर्थ केल्याने कृष्णालाही लघुत्व आले










आहे. 'जशास तसे' याचा सामान्य व्यवहारातील अर्थ टिळकांच्या मनात नाही, हे 'गीतारहस्या'च्या आस्थेवाईक अभ्यासकालाच फक्त कळेल. इतरांना त्यामुळे विकृत अर्थाचीच प्रतीती होईल. 'राजकारण हे साधूंसाठी नाही' असे म्हटल्यानेही, ते गुंडांसाठी आहे असे टिळकांना खास म्हणावयाचे नव्हते; पण त्यांच्या या सदोष शब्दप्रयोगामुळे अविचारी आणि माथेफिरू लोकांच्या हाती पेटलेले कोलीत मिळाल्यासारखे झाले. 'जशास तसे' म्हणजे क्रोधाला क्रोध अथवा द्वेषाला द्वेष नव्हे. 'जशास तसे' म्हणजे दुर्बुद्धीचा सद्‌बुद्धीने, अज्ञानाचा ज्ञानाने आणि क्षुद्रतेचा उदात्ततेने आघात जिरवणे होय. आपण मागावे ते आपणाला सृष्टीत मिळते असा सृष्टीचा नियम असल्यामुळे, आपण सदैव शुभच मागत राहिले पाहिजे तरच ते आपणाला मिळेल, एवढाच कृष्णवचनाचा अर्थ समजला पाहिजे. अज्ञानाने वाईट मागितले तरीही परमेश्वर ते न देता परमकारुणिकतेने तो दुष्टाचा उद्धारच करतो, हे मागे दाखविलेच आहे.

### सत्याग्रहातील प्रामाणिक निर्भयपणा

सत्य-अहिंसादी नीतिधर्म आणि सर्वभूतहित यांचा विरोध आला असता वाचिक सत्य अथवा शारीरिक अहिंसा यांचा त्याग करून सर्वभूतहित साधावे असा टिळकांच्या कर्मयोगाचा महत्त्वाचा दावा आहे. त्याचाही थोडा विचार येथे अवश्य केला पाहिजे. वरवर पाहता हा प्रश्न जितका सुलभ वाटतो तितका तो खास सुलभ नाही. बाह्य कर्मापेक्षा कर्त्याची बुद्धी म्हणजेच त्याचा हेतू श्रेष्ठ समजला पाहिजे हे जितके खरे, शुद्ध हेतूप्रमाणे बाह्य कर्माचीही शुद्धता महत्त्वाची आहे हेही खरे आहे. यामुळे ज्या क्रियेत या दोघांचीही शुद्धी साधली जाईल ती क्रिया नैतिकदृष्ट्या पूर्ण शुद्ध समजली पाहिजे. व्यावहारिक जीवनात हा सिद्धांत कसा अमलात आणावयाचा हा प्रश्न केवळ तर्काने सुटणार नाही. त्यासाठी जीवनशुद्धीची आवश्यकता आहे. शिवाय जीवमात्राचे कल्याण साधण्यासाठी आपले सर्वस्व वाहून घेण्याची गरज आहे. अशा शुद्ध बुद्धीच्या व जीवमात्राच्या सेवेसाठी देहार्पण केलेल्या पुरुषाचाच निर्णय प्रमाण मानला पाहिजे. गांधींचा सत्याग्रह सिद्धांत आणि टिळकांचा कर्मयोग यामध्ये याबाबतीत तात्त्विक दृष्ट्या महत्त्वाचा भेद आहे. कर्मयोगाची दृष्टी अशावेळी कर्त्याच्या बुद्धीला अधिक महत्त्व देऊन बाह्य कर्माकडे थोडी डोळेमिचकावणी करणारी आहे. तर सत्याग्रहाच्या विचारात दोन्हीकडेही करड्या नजरेने पाहण्याची वृत्ती आढळते. 'सत्य बोलावे' याचा अर्थ लोककल्याणाचा विचार न करता जे दिसेल वा जे मनात येईल ते सारखे बडबडत राहावे असा नाही. 'सत्य बोलावे' या वाक्यातील 'बोलावे' हा विधी नसून 'बोलण्याची नैतिक आवश्यकता निर्माण होईल त्यावेळी 'सत्य' बोलावे' हा विधी आहे. यामुळे सत्याच्या साधकाला फार मोठ्या संयमाची साधना करावी लागते. सत्याग्रहातील सत्य या शब्दाचा अर्थ जीवनसत्य (म्हणजेच सर्वभूतहित) असा आहे. मात्र त्या जीवनसत्यात वाचिक सत्याचाही अवश्य समावेश केलेला आहे. कारण वाचिक सत्य हे एक भूतहितच आहे. आणि जितक्या प्रमाणात आवश्यक वाचिक सत्याचा त्याग केला जाईल तितक्या प्रमाणात भूतहिताचाही बळी गेल्याशिवाय राहत नाही असा इतिहासाचा अनुभव आहे. म्हणून सत्याग्रहधर्मात वाचिक मौन आवश्यक ठरते, पण वाचिक असत्य मात्र कधीही योग्य मानले जात नाही. हाच नियम इतर नैतिक तत्त्वांनाही लावावयाचा आहे, त्याच्या तपशिलात येथे जाता येणार नाही. भूतहिताच्या दृष्टीने सत्य हेच असत्य व असत्य हेच सत्य, हिंसा हीच अहिंसा व अहिंसा हीच हिंसा असे प्रतिपादन केल्याने नैतिक विचारात स्पष्टता येण्याऐवजी गोंधळ आणि विकृती माजण्याची भीती आहे. मानवी जीवनाचा इतिहास तपासला असता अशी विकृती समाजात मोठ्या प्रमाणात निर्माण झालेली आढळते. कर्मयोगी विचाराने असा गोंधळ माजविण्याच्या कामी वराच हातभार लावलेला आहे. याला केवळ टिळकच जबाबदार आहेत असे नाही. तर महाभारतासारख्या ग्रंथातही काही ठिकाणी असे प्रयत्न केलेले आढळतात. सत्याचा आणि अहिंसेचा जसजसा महिमा वाढू लागला तसतसा असत्याचा स्वीकार करूनही त्याला सत्य म्हणण्याची आणि हिंसेचा आचार करूनही त्याला अहिंसा म्हणण्याची युक्ती कित्येकांनी शोधून काढली. उदाहरणार्थ, वेदात यज्ञकर्माच्या निमित्ताने पशुहिंसा उपदेशिलेली आहे. पण पुढे अहिंसेचा सिद्धांत नैतिक दृष्ट्या सर्वमान्य झाल्यामुळे वैदिक धर्माच्या अभिमानी पंडितांनी 'यागीया हिंसा अहिंसा, वेदविहितत्वात्' असा सिद्धांत बनवला. पण वेदाने सांगितली तरीदेखील पशुहिंसा कोणत्याही अर्थाने अहिंसा होणे शक्य नाही. सरळपणाने आणि ऐतिहासिक दृष्टीने असेच कबूल केले पाहिजे, की हा नैतिक विचारांचा ऱ्हास झालेला आहे. नवा सिद्धांत हृदयाने मान्य केला तरी जुन्या सिद्धांताची पकड बुद्धीला काही काळ सोडीत नाही आणि त्यामधून मग या प्रकारच्या अप्रामाणिक युक्त्या लढविण्याची विकृती निर्माण होते. जीवनाचे पूर्ण सत्य आकलन होण्यासाठी बुद्धीची सर्व








प्रकारच्या आग्रहापासून, एककल्लीपणापासून, जे चालत आलेले आहे त्याचेच समर्थन करण्याच्या मूढ-ग्राहापासून मुक्तता व्हावी लागते. कर्मयोगी विचाराने सरळपणाने भूतहितासाठी वाचिक सत्य सोडून वाचिक असत्याचा स्वीकार करावयाचा असेल, तर तो उघड करावा ! त्यालाच पुन्हा सत्य शब्द लावण्याचा अट्टहास करू नये. सामाजिक व्यवहारात असत्य, हिंसा इत्यादिकांचा उपयोग करणे जेव्हा अपरिहार्य वाटेल तेव्हा तसे स्पष्ट म्हणावे. सत्याग्रह सिद्धांताने असा निर्भय प्रामाणिकपणा निर्माण केला आहे. अपरिहार्य हिंसा ही हिंसाच मानली आहे. तिला अहिंसा म्हटलेले नाही. वस्तुतः पाहता येथे शब्दांचीच अपूर्णता भासू लागते. वाढत्या विकास कल्पनांमध्ये प्रत्येक अवस्थेला वेगवेगळे शब्द वापरण्याची व्यवस्था केली पाहिजे. म्हणजे व्यर्थ गोंधळ माजणार नाही.

### मानसिक मांद्य (Mental Laziness)

लोककल्याणासाठी हिंसेचा स्वीकार करणाऱ्या कर्मयोगावर एक महत्त्वाचा आक्षेप असा, की त्यामुळे हिंसेला प्रतिष्ठा मिळाल्यासारखे होते आणि सामाजिक मनातून हिंसेचे निर्मूलन होण्याऐवजी तिला खतपाणी पडत राहते. दुष्टाव्याचा विनाश करण्यासाठी दुष्टाव्याचे आवाहन करण्याची दुष्ट आपत्ती निर्माण झाल्यामुळे सामाजिक मन शुद्ध होण्याचे कार्य स्थगित होते. पण सर्वात मुख्य आक्षेप असा आहे, की कर्मयोगाने दुष्टांचा प्रतिकार प्रथम साधुपणाने करण्याचा प्रयत्न केला पाहिजे असे कितीही प्रामाणिकपणाने मान्य केलेले असले, तरी हिंसेचा आश्रय करण्याची सवलत ठेवली असल्याकारणाने अहिंसात्मक पर्याय शोधून काढण्याचा उत्साह मंदावतो. टिळकांना उत्तर देताना गांधींनी 'Mental Laziness'चा, म्हणजेच मानसिक मांद्याचा, आक्षेप घेतला आहे. त्याचा हाच अर्थ आहे. लोकसंग्रहासाठी हिंसेचा कायमचा त्याग करण्याची प्रतिज्ञा केलेला अहिंसक कर्मयोगीच नवे अहिंसक पर्याय शोधून काढू शकेल. याच दृष्टीने पाहता कर्मयोगापेक्षा सत्याग्रहाचा मार्ग अधिक तेजस्वी म्हणावा लागतो. दुष्टाच्या हिंसात्मक प्रतिकाराच्या बावतीत आणखी एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. सामाजिक विचार करताना एकेकट्या दुष्टाचा विचार पुढे येत नाही. तर एकेका समाजाचा वा एखाद्या सबंध राष्ट्राचा प्रश्न उत्पन्न होत असतो. अशा वेळी हिंसात्मक प्रतिकाराचा अवलंब करावयाचा म्हणजे प्रचंड सामाजिक विनाश ओढवून घ्यावा लागतो. त्या युद्धांच्या तयारीसाठी शत्रुत्वाच्या भावनांचा दीर्घ काळ उपदेश करावा लागतो व त्यामुळे शेवटी सामाजिक मन अधिकाधिक भ्रष्ट व विफल होत जाते. विज्ञानाच्या आधुनिक युगात हिंसात्मक युद्धाचा स्वीकार म्हणजे सर्व सांस्कृतिक मूल्यांचा विनाश होय. भारतीय युद्धानंतर भारतात कलियुग सुरू झाले या म्हणण्याचा अर्थ भारतीय युद्धाने भारतीय संस्कृतीच्या मूल्यांचा संपूर्ण विनाश केला असाच आहे. महाभारताने युद्धाची दुष्टता व विफलताच सिद्ध केलेली आहे. आजच्या मानवसमाजापुढे असलेले प्रश्न अत्यंत मूलगामी आहेत. आर्थिक, सामाजिक आणि राजकीय क्षेत्रांत प्रत्येक व्यक्तीला समानतेने वागविले गेले पाहिजे अशी संस्कृतीची हाक मानवाला मिळालेली आहे. या हाकेसरशी जगातील सारा मानवसमाज खळवळून उठत आहे. सामाजिक जीवनातील अनेकविध अन्यायांविरुद्ध आणि आर्थिक व राजकीय क्षेत्रांतील शतकानुशतकांच्या पिळवणुकीविरुद्ध संग्राम सुरू झालेला आहे. या संग्रामाचे नेतृत्त्व करण्यासाठी नव्या नैतिक आदर्शांची आणि नव्या भौतिक संघटनांची आवश्यकता निर्माण झाली आहे. जुन्या जगातील नैतिक विचारदेखील नव्या काळाला अपुरे भासत आहेत. या जाणिवेतूनच गांधींचा सत्याग्रह-धर्म निर्माण झाला आहे. मानवमात्र अवध्य आहे, मानवातील दुष्ट प्रवृत्तींचा शिक्षणाने आणि आत्मबलाने विलय होणे इष्ट आणि शक्य आहे अशी त्यांची श्रद्धा आहे. टिळकांच्या कर्मयोगाचे अत्यंत सुसंस्कृत स्वरूप म्हणून गांधींचा सत्याग्रह भारतात प्रकटला आहे. यात टिळकांचा अधिक्षेप नाही. उलट, टिळकांच्या अध्यात्माचा हा यथार्थ गौरवच आहे, असे महाराष्ट्राने मानावे इतकेच माझे म्हणणे आहे.



समर्पये ग्रंथमिमं श्रीशाय जनतात्मने ।
अनेन प्रीयतां देवो भगवान् पुरुषः परः ।।

गीतारहस्याची ही अर्पणपत्रिका आहे. यात 'पुरुषः परः' आहे, जनता जनार्दन आहे, कर्मयोग आहे. परंतु कोणताही देव नाही, धर्मही नाही.

- देवदत्त दाभोलकर










# आचार्य जावडेकरांचा सत्याग्रही समाजवाद

### आचारशील तत्त्वज्ञ

आचार्य जावडेकर यांची भूमिका इतिहासकाराची अथवा केवळ तत्त्वचिंतकाची नाही. भारतीय स्वातंत्र्याच्या सर्वांगीण चळवळीचा ते पुरस्कार करीत आले आहेत. सामाजिक सुधारणा आणि राष्ट्रीय स्वातंत्र्य यांचा त्यांनी कधी परस्परविरोध मानला नाही. उलट, या दोन्ही गोष्टी परस्परानुकूल आहेत अशीच त्यांची स्वतःची बालपणापासून निष्ठा आहे. तथापि, परतंत्र राष्ट्राचे संजीवन स्वातंत्र्यप्राप्तीनेच होऊ शकते, हा त्यांचा दृढ विश्वास होता. यामुळे सामाजिक सुधारणेच्या एकेरी आग्रहाने ते राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या मुख्य लढ्यापासून कधीही पराङ्मुख झाले नाहीत.

गांधीयुगाच्या प्रारंभी त्यांनी सार्वजनिक जीवनात प्रवेश केला, तोपर्यंत त्यांची विद्यासाधनाच चालू होती. या विद्यार्थिदशेत त्यांच्यावर टिळक आणि आगरकर या दोघांचेही सारखेच संस्कार झालेले होते. यामुळे गांधीयुगाच्या स्वागताची त्यांची पूर्वतयारी झालेली होती. ते स्वतः अर्थशास्त्र व राजकारण या विषयांचे अभ्यासक असल्यामुळे, त्यांनी समाजवाद व रशियन राज्यक्रांती यांचा अभ्यास प्रारंभिलेला होताच. पण त्यांच्या बुद्धीला तत्त्वज्ञानाचीही आवड असल्यामुळे, त्यांनी आपल्या महाविद्यालयीन जीवनात पौरस्त्य व पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा अभ्यास आरंभिलेला होता. तत्त्वज्ञानाच्या बैठकीवरून सामाजिक जीवनाच्या सर्व व्यवहारांचे परीक्षण करण्याची पात्रता या अध्ययनप्रवृत्तीमुळे त्यांना सहजच लाभली. एवढ्या व्यापक शिदोरीसह त्यांनी गांधीयुगाच्या प्रारंभी महाराष्ट्राच्या राजकीय व शैक्षणिक जीवनात प्रवेश केल्यामुळे महाराष्ट्रातील तरुण कार्यकर्त्यांमध्ये त्यांचे वैचारिक उच्चस्थान निर्माण झाले. ग्रंथलेखन, अध्यापन आणि वृत्तपत्रीय संपादन या तीन मार्गांनी त्यांनी आपले वैचारिक मार्गदर्शनाचे कार्य अव्याहत चालू ठेवले. १९३०, १९३२ व १९४२ च्या स्वातंत्र्याच्या सामुदायिक लढ्यांमध्ये त्यांनी देहदंडही सोसला. अशा रीतीने त्यांनी आपल्या विचारांना आचाराचे योग्य पाठबळही दिलेले आहे. असहकारितेच्या प्रारंभी इस्लामपूर येथे त्यांनी अस्पृश्यता निवारणाच्या कामाला धैर्याने हात घातला व पुण्याला आल्यावर एका अस्पृश्य विद्यार्थ्याला त्यांनी जाहीरपणे आपल्या कुटुंबात एकत्र राहण्यास घेतले. यामुळे आचार्य जावडेकरांचा राष्ट्रवाद हा सर्वांगीण क्रांतिकारक बनलेला आहे.

राष्ट्रवादी तत्त्वज्ञाने वा चळवळी पुष्कळ वेळा एकांगी, हठवादी आणि संकुचित झालेल्या दिसतात. अशी विकृती जावडेकरांच्या विचाराला वा आचाराला जडलेली कोणी पाहिली नाही. राजकीय विचाराला अतिरिक्त पक्षनिष्ठेनेही विकृती येऊ शकते. बहुधा राजकारणातील पक्षभेद हे एक प्रकारच्या बौद्धिक वकिलीने डागळलेले असतात. त्यांचे लिखाण सत्यनिष्ठेपेक्षा पक्षनिष्ठेवरच आधारलेले असते. आचार्य जावडेकर यांचे वृत्तपत्रीय संपादन देखील या दृष्टीने आदर्श मानावे लागेल. त्यांनी आपल्या आयुष्यात आपल्या बौद्धिक निष्ठेशी कधीही प्रतारणा होऊ दिली नाही. संकुचित पक्षनिष्ठेचा स्वीकार करून आपल्या बौद्धिक स्वतंत्रतेचा त्यांनी कधीच बळी दिला नाही. यामुळे त्यांच्या लेखनात ओजस्वी तत्त्वनिष्ठा भरून राहिलेली आढळते. महाराष्ट्राच्या अलीकडच्या कित्येक वर्षांच्या लेखन-इतिहासात आचार्य जावडेकरांना अलौकिक स्थान द्यावे लागेल. भारतीय स्वातंत्र्यपर्वाचा रोमहर्षक इतिहास लिहिण्यासाठी महाराष्ट्राला आचार्य जावडेकरांसारखा ध्येयनिष्ठ आणि आचारशुद्ध तत्त्वज्ञ लेखक लाभला हे महाराष्ट्राचे विशेष सौभाग्य होय.

### समन्वय-बुद्धी

आचार्य जावडेकर यांच्या राष्ट्रवादाला आणखी दोन बाजू आहेत. एका बाजूने त्यांनी आपला राष्ट्रवाद अध्यात्मिक भूमीवर स्थिर केला आहे आणि दुसऱ्या बाजूने त्या राष्ट्रवादाला त्यांनी समाजवादाची दिशा जोडून दिली आहे. त्यांच्या समन्वयबुद्धीनेच त्यांना ही गोष्ट साध्य करता आली हे








अभ्यासावर फार वाईट होत असे, हे पारीख यांना आढळले. विद्यार्थी महाविद्यालयात हजेरी लावून पसार होत, म्हणून सकाळची महाविद्यालये बंद करावी, असा निर्णय मुंबई विद्यापीठास पारीखांनी घ्यावयास लावला. याबाबतीत मुंबई विद्यापीठाच्या दोन्ही मंडळाचे सदस्य माजी उच्चतम न्यायाधीश श्री. प्र. बा. गजेंद्रगडकर यांचा पारीख यांना पूर्ण पाठिंबा होता. पारीख हे मुंबई विद्यापीठामध्ये रेक्टर म्हणून काम करीत असता क्रमाने दोन कुलगुरू झाले. त्यांनीही पारीख यांचीच बाजू उचलून धरली. पारीख यांच्या कारकिर्दीत अखेरीस श्री. गजेंद्रगडकर कुलगुरू झाले व त्यांनी सकाळची महाविद्यालये सुरू करावी असा निर्णय घेतला; याचे कारण महाराष्ट्र राज्याचे जे अनेक शिक्षणमंत्री झाले त्यांनाही सकाळची महाविद्यालये पुन्हा सुरू करावी असे फार वाटत होते. पारीख यांच्यावर या शिक्षणमंत्र्यांनी अप्रत्यक्षपणे खूप दडपण आणले. त्याचा पारीख यांच्या मनावर फार ताण पडत होता. अनेक वर्षे हा ताण सोसत असताना पारीख यांनी आपला हट्ट सोडला नाही. पारीख म्हणत की, श्री. यशवंतराव चव्हाण हे जोपर्यंत मला शिक्षणमंत्री म्हणतात तशा प्रकारचा सल्ला देत नाहीत, तोपर्यंत मी माझा मुद्दा सोडणार नाही; परंतु डॉ. श्री. गजेंद्रगडकर कुलगुरू झाल्यानंतर सगळीच परिस्थिती बदलली. सहकारी व मित्र म्हणून गजेंद्रगडकरांचे जे पाठबळ मिळत होते, ते नाहीसे झाले. एवढेच नव्हे, तर गजेंद्रगडकरांची पारीख यांच्या विरुद्ध दिशेने पावले पडू लागली. पारीख यांचा अपमानही होईल अशी कृती गजेंद्रगडकरांच्या हातून झाली. कारण मुंबई विद्यापीठात पारीख यांच्याविरुद्ध कायम कारवाया करणारी अनेक मंडळी गजेंद्रगडकरांच्या पाठीशी उभी राहिली. या संदर्भात एकच उदाहरण दिले म्हणजे गजेंद्रगडकरांच्या धोरणाचा अर्थ स्पष्ट होतो. डॉ. गजेंद्रगडकर ज्या दिवशी कुलगुरू पदावर आले त्या दिवशी पारीख यांना बोलावून घेऊन गजेंद्रगडकरांनी विद्यापीठाच्या इमारतीत ज्या खोलीत बसून पारीख कार्यवाही करीत असत, ती खोली मला पाहिजे, ती तुम्ही सोडा, असा हुकूम सोडला. पारीख यांनी ती खोली सोडली. रेक्टरपदी पारीख नकोत, असे गजेंद्रगडकरांनी ठरविले होते. गजेंद्रगडकरांच्या या दिशेने हालचाली सुरू झाल्या, हे पारीख यांच्या लक्षात आले व त्यांनी रेक्टरपदच आवश्यक नाही, असा प्रस्ताव विद्यापीठाकडून संमत करून घेतला. हा ठराव संमत होईपर्यंत सुमारे १ वर्षापर्यंत पारीख विद्यापीठाचा कारभार पहात होते. गजेंद्रगडकरांचा खूप जाच होत होता. वस्तुतः पारीख मला व अनेक मित्रांना एक हिंदी म्हण वापरून नेहमी सांगत, की 'ऐसी जगह बैठ जहाँ कोई न कहें ऊठ.' मी त्यांना त्यावर उत्तर देत असे, की मला हा विचार मान्य नाही. कारण मी कोठेही, कोणत्याही आसनावर स्थिर बसण्यास उत्सुकच नसतो. पक्षी हे माझे जीवनाचे प्रतीक मानतो. थोडी चाहूल लागली तरी पक्षी बसलेल्या जागेवरून उडून जातो. पारीख यांना जबरदस्तीने आपल्या पदावरून उठून जावे लागले. डॉ. गजेंद्रगडकरांचा नूर पहिल्याच दिवशी पारीख यांना कळला होता. त्यांनी तेव्हाच विद्यापीठ सोडले असते, तर दीर्घकालापर्यंत मनोवेदना सहन करावी लागली नसती व प्रकृती भराभर ढासळत गेली नसती.

विद्यापीठ सोडल्यानंतर पारीख यांच्या मनातून विद्यापीठ लवकर उठले नाही; कारण विद्यापीठ ही संस्था त्यांना आपल्या उच्च ध्येयवादाच्या पूर्तीचे अद्वितीय साधन वाटत होते आणि त्यांचा हा जीवनाचा दृष्टिकोन उपनिषदकार व प्लेटोपासून तो आधुनिक तत्त्वज्ञ व्हाईटहेड बर्ट्रँड रसेल, जे. आर्टेगा ई गॅसेट इ. तत्त्ववेत्त्यांनी स्वीकारलेला आहे.

विद्यापीठ सोडल्यावर पारीखांची प्रकृती सारखी ढासळत होती, तरी ते महत्त्वाच्या सार्वजनिक कार्यांमध्ये मोठ्या साक्षेपीपणे भाग घेत,सल्लामसलत करीत. त्यांची सल्लामसलत अत्यंत मूल्यवान असे. उच्च ध्येयवाद कार्यवाहीत कसा आणावा, यासंबंधी ते जे मार्गदर्शन करीत, ते फार अचूक असे. मुंबई, दिल्ली, कलकत्ता, मंगळूर, हैद्राबाद, मद्रास येथूनही शिक्षणतज्ज्ञ त्यांची भेट घेऊन सल्ला मागत असत. त्यांनी 'बेनेट कोलमन अँड कंपनी' व बँक ऑफ इंडिया' येथे डायरेक्टर म्हणून यशस्वी रीतीने नंतर कामे केली. मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय या संस्थेचे ते उपाध्यक्ष म्हणून अनेक वर्षे होते. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे ते प्रथमपासूनचे सदस्य होते. या मंडळाची सर्व कार्यवाही अध्यक्ष म्हणून मी पाहत होतो. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचा प्रबंध प्रकल्प (प्रॉजेक्ट) प्रथम पारीख आणि प्रा. अ. भि. शाह या दोघांनी तयार केला. या सर्व संस्थांमध्ये अनेक पेचप्रसंग उत्पन्न झाले, की संस्थाचालकांना बिनतोड रीतीने त्या पेचप्रसंगातून सोडविण्याची कामगिरी पारीखांकडे सोपविलेली असे. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय या संस्थेचे अध्यक्ष श्री. स. का. पाटील यांनी पारीख यांना श्रध्दांजली देताना असे म्हटले, की चांगल्या चांगल्या कायदेपंडितांना ज्या संस्थाविषयक संकटातून मार्ग काढणे अशक्य झाले, त्या संकटातून आम्हाला पारीख यांनी मार्ग दाखविला. अखेरच्या २ वर्षात पुणे येथे सहकारी मुद्रणालय ही संस्था पारीख यांनी स्थापन केली. त्या संस्थेच्या








संचालक मंडळामध्ये अनेक सहकारी चळवळीचे नेते सदस्य म्हणून समाविष्ट झालेले आहेत. सध्याचे महाराष्ट्र राज्याचे मुख्यमंत्री श्री. वसंतदादा पाटील हे महाराष्ट्रातील सहकारी चळवळीचा फार मोठा व्याप निर्माण करणारे गृहस्थ आहेत. त्यांनाही पारीख यांचे यासंबंधातले कार्यक्रमविषयक विचार नवे व मोलाचे वाटले.

इंदिरा गांधी भारत संघराज्याच्या प्रधानमंत्रिपदावर आल्या. नंतर पारीख हे फार अस्वस्थ झालेले दिसले. इंदिरा गांधींनी काँग्रेसचे दोन तुकडे करून नवी काँग्रेस स्थापन केली तेव्हा मी 'महाराष्ट्र टाइम्स' मध्ये समीक्षात्मक लेख लिहून इंदिरा गांधींची प्रतिमा ही राजकीय पुरोगामित्वाची दर्शक आहे, असे म्हटले. तेव्हा एकदा संध्याकाळी आम्ही दोघे चर्चा करीत असता पारीख म्हणाले, की एक अशिक्षित महिला भारताच्या प्रधान मंत्रिपदावर येते हे काही भारताच्या राजकीय भवितव्याचे शुभसूचक चिन्ह नाही. मी त्यावर त्यांच्या विरुद्ध बाजूने असे म्हटले, की अहो पारीखसाहेब, इंदिरा गांधी औपचारिक शिक्षण घेऊन विद्यापीठीय पदवीधर झालेल्या नसल्या, तरी त्या नेहरूंच्या राजकीय विद्यापीठाच्या डॉक्टरेट घेतलेल्या महिला आहेत. म्हणजे असे की, पंडित जवाहरलाल नेहरूंबरोबर त्या अनेक वर्षे सहायक म्हणून राहिल्या आहेत; त्यांच्याबरोबर देशोदेशी फिरल्या; देशी व विदेशी राजकीय मुत्सद्यांच्या नेहरूंबरोबर चाललेल्या अगणित खलवतांच्या वेळी उपस्थित राहिल्या. त्यामुळे त्यांना फारच मोठा अनुभव मिळाला, पुष्कळच ऐकावयास मिळाले. अशी संधी जगामध्ये फारच थोड्या व्यक्तींना मिळू शकते.

इंदिरा गांधींनी आणीबाणी पुकारून एक महिना झाला होता. १९७५ च्या जुलै महिन्याच्या शेवटच्या आठवड्यात मी नेहमीप्रमाणे संध्याकाळी पारीख यांच्या निवासस्थानी गेलो. मी विचारले, की आज स्वारी खूप प्रसन्न दिसते. काही महत्त्वाचे अनुकूल असे घडले का? ते म्हणाले :- आता सगळा आनंदीआनंद आहे. आपले गुरू रॉय हे मोठे राजकीय भविष्यवादी होते याचे पुन्हा प्रत्यंतर आले. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर तुम्ही म्हणत होता, की रॉय साहेबांचे इंडियन नॅशनल काँग्रेसबद्दलचे भविष्य खोटे ठरले; कारण काँग्रेस ही फॅसिस्ट पद्धतीचे राज्य निर्माण करील, असे त्यांनी म्हटले होते. पण त्याऐवजी सगळ्या वयात आलेल्या भारतीय नागरिकांना मतदानाचा हक्क मिळाला आणि मूलभूत नागरिक हक्कांच्या आधारावर निर्माण झालेले संविधान अंमलात आले. जगातील सर्वात मोठ्या लोकसंख्येची लोकशाही स्थापित झाली, पण आता या आणीबाणीपासून काय घडत आहे? अधिकारशाहीची पावले गुपचुप रीतीने पुढे पडत आहेत. रॉयसाहेबांची विचारपद्धती अखेरपर्यंत मार्क्सवादीच होती असे फिलीप स्प्रॅट म्हणत होते; परंतु तुम्हाला रॉयसाहेब एकदा म्हणाले, की 'मी मार्क्सवादी असलो, तरी मी हेगेल सोडलेला नाही. हेगेल अजून मार्क्सनंतरदेखील पायावरच उभा आहे.'

मानवी जीवनात अंमलात येत असलेल्या विचारसरणीचा व तत्त्वज्ञानाचा परिपाक होऊन इतिहास कसा बदलतो, हे रॉय पाहत होते. या प्रकारच्या विचारसरणीत हेगेल एका अर्थी अंतर्भूत आहेच. महात्मा गांधींची विचारसरणी फॅसिझमकडे नेईल, असे रॉय दुसऱ्या जागतिक महायुद्धाच्या संदर्भात आवेशाने सांगत. काँग्रेसचे तात्त्विक मार्गदर्शन गांधीवादीच करीत आहे. त्यामुळे भारताची लोकशाही गांधीवादाच्या पार्श्वभूमीवर उभी राहिल्याने तिचे रूपांतर हळुहळू अधिकारशाहीमध्ये होणारच आणि तसेच आता होऊ लागलेले आहे. रॉयसाहेबांचा भविष्यवाद खरा ठरला आहे. रॉयसाहेबांसारख्यांचा भविष्यवाद हा ऋषिमुनींसारखा नसला, तरी इतिहासाच्या अपरिहार्य क्रमात सावकाश परंतु निश्चितपणे जे घडून येते, त्याचे लक्षण रॉय यांना आगाऊच दिसले. वैयक्तिक जीवनातील कालक्रम आणि मोठमोठ्या राष्ट्रांच्या जीवनातील कालक्रम याचे मान भिन्न असते; हे लक्षात ठेवूनच रॉयसाहेबांच्या भविष्यवादाचा अर्थ करावा लागतो. या पारीख यांच्या विधानाने मी थोडा खूश झालो.

मी पुन्हा विचारले, की आजची ही तुमची दिसणारी प्रसन्नता एका आठवड्यापूर्वी दिसत नव्हती. मध्यंतरी काय झाले ते सांगा. ते म्हणाले:- अहो शास्त्रीजी, माझ्या एका मित्राने कालच दिल्लीहून वार्ता आणली. तो म्हणाला, की ही वार्ता इंदिराजींच्या स्वप्नाची वार्ता आहे. इंदिराजींना आणीबाणी पुकारल्यानंतर एके दिवशी स्वप्न पडले, "प्रथम इंदिराजींचे पिताजी जवाहरलाल नेहरू लगबगीने इंदिराजींपुढे स्वप्नात आले आणि म्हणाले, की तू प्रधानमंत्रिपद स्वीकारून राजकारणात प्रवेश केला आहेस. मी तुला बजावले होते, की समाजसेवा करीत रहा; पण राजकारणाच्या जंजाळात शिरू नको. त्यावर लगेच इंदिराजींनी उत्तर दिले की, पिताजी तुम्हीच नेहमी सांगत होता, की परिस्थिती पूर्ण बदलली म्हणजे व्यक्तीने आपला जीवनक्रम परिस्थितीला अनुसरून बदलणे शहाणपणाचे असते. मी शहाणपणा केला आहे. हे इंदिराजींचे उत्तर ऐकल्याबरोबर पंडितजी दिसेनासे झाले. लगेच काठी टेकीत टेकीत, वाकलेले म. गांधी समोर आले व म्हणाले, की

इंदिरे, तुला पंडितजींच्या जवळ पाहून मी फार खूश होत असे; कारण मला लहान मुले फार आवडतात, तूही खूप आवडत होतीस; परंतु त्यावेळेस तू आता राजकारणात जे करीत आहेस, ते तू करशील हे जर लक्षात आले असते, तर मी ब्रिटिश राज्याविरुद्ध जे आंदोलन, माझ्या ईश्वरोपासनेला मर्यादा घालून, चालविले होते, ते चालविलेच नसते. कारण ब्रिटिशांनी जेवढे नागरिकस्वातंत्र्य जनतेला बहाल केले होते तेवढेही ठेवले नाहीस. इंदिराजींच्या उत्तराची वाट न पाहताच म. गांधी झपाट्याने परत फिरले व दिसेनासे झाले.

ही पारीख यांनी सांगितलेली इंदिराजींच्या स्वप्नाची वार्ता पारीख यांची स्वकपोलकल्पित वार्ता होती, असे माझ्या ताबडतोब लक्षात आले आणि मी त्यांना हसत-हसत म्हटले, की हे तुमच्या सद्यःस्थितीबद्दलच्या चिंतनाचे चित्रमय स्पष्टीकरण आहे. नंतर यावर काही उत्तर न देता ते म्हणाले, की इतिहासाच्या शक्तींची वेगवान गती अडविणे हे मोठे कठीण काम असते. शास्त्रीजी, तुम्ही काँग्रेसमध्ये १९५२ साली पुनः प्रवेश केला तेव्हा ते तुमचे कृत्य रॉय यांच्या मानवतावादाच्या विरुद्ध म्हणून मला नापसंत होते; कारण तुम्हास हे पटलेले आहे, की पक्षीय राजकारण हे सत्तापिपासूंचे राजकारण असते. कोणताही राजकीय पक्ष स्वतःची सत्ता कायम राखण्याचा प्रयत्न करतो. ते करीत असता नागरिक संघटित रीतीने जागृत नसेल, तर विरोधी पर्यायी पक्षाच्या अभावी सत्ताधारी पक्षाचे अधिकारशाहीत रूपांतर होते. या देशात पर्यायी पक्ष म्हणून काँग्रेसविरोधी असा कोणताच पक्ष आतापर्यंत ३० वर्षात संघटित होऊ शकला नाही; आणि ब्रिटन व अमेरिका याच्याप्रमाणे प्रबल पर्यायी पक्ष उभे राहिले, तरी खरीखुरी मूलगामी (रॅडिकल) लोकशाही दुबळीच राहते. पारीख यांनी सांगितलेले हे स्वप्न १९७५ च्या ऑगस्ट १ ला टिळक विद्यापीठाच्या पुणे येथील समारंभात मी त्यांचे नाव न घेता सांगितले. अध्यक्षपदी माजी न्यायमूर्ती वि. अ. नाईक हे होते आणि प्रसिद्ध समाजवादी श्री. एस्. एम्. जोशी हे श्रोतृवर्गात उपस्थित होते. एस्. एम्. जोशी हे माझे आणीबाणीबद्दलचे विचार काय आहेत, हे समजावून घेण्याकरताच मुद्दाम या समारंभास उपस्थित होते. त्यांची माझ्याबद्दलची शंका या स्वप्ननिवेदनाने नष्ट झाली. समारंभ संपल्यावर मी एस्. एम्. ना सांगितले, की हे स्वप्न पारीख यांनी कल्पिलेले स्वप्न आहे.

इंदिरा गांधींनी आणीबाणी पुकारल्यानंतर ते सारखे मला म्हणत, की आशिया खंडाला लोकशाही राज्यपद्धती पचत नाही, हे याने सिद्ध होते. आशियाई सुलतानशाही (एशियॅटिक डेस्पटिझम) हेच एक कायमचे ऐतिहासिक राजकीय सत्य आहे. १९७५ साली इंदिरा गांधींनी आणीबाणी अंमलात आणल्यानंतर कराड येथे मराठी साहित्य संमेलनाचे अधिवेशन झाले. त्या अधिवेशनाच्या उद्घानप्रसंगी मी जे भाषण केले, त्यात आणीबाणीच्या संदर्भात वृत्तपत्रीय स्वातंत्र्य आणि विचारप्रचाराचे स्वातंत्र्य नष्ट झाल्याबद्दल टीका केली आणि असेही सांगितले, की आज जे उपाय दिसतात, ते अखेरीस अपाय ठरतील आणि लोकशाहीचा कायम संकोच होऊन सत्तेचे केंद्रीकरण होईल. एकदा केंद्रीकरण झाले म्हणजे ते कायम तसेच दृढमूल होण्याचा प्रयत्न करील. हे माझ्या छापील भाषणातील वक्तव्य वाचून पारीख फार अस्वस्थ झाले होते. साहित्य संमेलन आटोपल्यानंतर एक दिवशी संध्याकाळी ९ वाजता मी पारीख यांना त्यांच्या निवासस्थानी अचानक भेटलो. ते आपल्या आतल्या खोलीत शय्येवर काही वाचत पडले होते. ते खोलीतून बाहेर आले, तेव्हा त्यांचा चेहरा मला फार गंभीर दिसला. थोडा वेळ काहीच बोलले नाहीत. मी किंचित अस्वस्थ झालो. तेव्हा ते स्वतः होऊनच म्हणाले, ' काय संमेलन संपवून आलात?' 'होय', मी म्हटले. 'तुमचे संमेलनाचे छापील भाषण मी वाचले. त्यातील एक परिच्छेद माझ्या मनाला फारच खटकला. श्री. यशवंतराव चव्हाण स्वागताध्यक्ष असताना तुम्ही आणीबाणीवर टीका करावी हे योग्य नव्हते. चव्हाण हे तुमचे मित्र आहेत. तुमच्या भाषणामुळे त्यांना तुम्ही संकटात आणले असावे.' मी यावर उत्तर दिले, की 'मी माझी लोकशाही-निष्ठा काही झाले तरी विसरू शकत नाही.' त्यावर पारीख उत्तरले, की 'तुमच्या वक्तव्याने भारतीय लोकशाहीचे भवितव्य यत्किंचित तरी सुधारणार आहे काय? मुळीच नाही. तुमचे भाषण म्हणजे पालथ्या घड्यावरील पाणी होय. असले व्यर्थ उद्योग न करता तुम्ही आपले वैचारिक लेखन स्वस्थ बसून दैनंदिन व्यावहारिक राजकारणात वेळ न दवडता चालू ठेवा.' पारीख हे भारतीय लोकशाहीबद्दल अत्यंत निराशावादी होते. भारतीय भूमी ही लोकशाही मूल्यांच्या बाबतीत वांझ भूमी आहे, अशी इंदिरा गांधींच्या प्रचंड विजयामुळे त्यांची खात्री झाली होती. त्यामुळे हे ध्येयवादी गृहस्थ शरीरप्रकृतीने जसे खचत गेले तसे मनानेही खचले. याचा अनिष्ट अंतिम परिणाम फार लवकर दिसून आला.

मुंबई विद्यापीठ सोडल्यानंतर पारीख मधुमेह व हृदयविकार यांनी जर्जर झाले होते; परंतु सकाळी उठल्यापासून झोपी जाईपर्यंत निरोगी व समर्थ व्यक्तीप्रमाणे कार्यात निरंतर मग्न असत. प्रवासही खूप करत. त्यांच्या निधनाच्या






अगोदरच्या दिवशी संध्याकाळी सचिवालयात 'महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळा'च्या संबंधात वार्ताहरांची बैठक भरली होती. त्यात त्यांनी भाग घेतला होता. ही बैठक संपल्यानंतर मी डेक्कन क्वीनने वाईस येण्यास निघालो तेव्हा ते आग्रहाने म्हणाले, की आज जाऊ नका. दोन दिवस थांबा. मला पूर्वी त्यांनी असा आग्रह केला नव्हता. पुढचे दोन दिवस कसे जातील याबद्दल त्यांना काही चाहूल लागली असावी, म्हणून त्यांनी मला असा आग्रह केला असावा. मी त्यांच्या आग्रहाच्या मुळाशी काय भावना होती हे जाणू शकलो नाही व डेक्कन क्वीनने रात्री पुण्यास गेलो व दुसऱ्या दिवशी सकाळी वाईस पोहोचलो. सकाळी ११ वाजता मुंबईहून मंत्रालयातून तातडीचा फोन आला, की पारीख या जगातून निघून गेले. मी त्यांच्या अखेरच्या दर्शनाकरीता टॅक्सी-मोटार शोधली; परंतु ती लवकर मिळू शकली नाही. म्हणून त्यांचे अंत्यदर्शन मला होऊ शकले नाही. त्या दिवशी मी रात्री १० वाजता त्यांच्या निवासस्थानी मुंबईस येऊन दाखल झालो व दुःखसमुद्रात बुडून गेलो. या आदर्श मित्राची स्मृती मला अखंड मार्गदर्शन करीत राहील, यावद्दल मला धन्यता वाटते. मी माझे हे मोठे भाग्य समजतो, की मला इतका प्रज्ञावंत व ध्येयवादी मित्र मिळाला.



### अध्यापकांचे स्वातंत्र्य

या वादात अध्यापकांच्या स्वातंत्र्याचे विरोधक विसरतात ती गोष्ट ही की, दुय्यम शाळांतील अध्यापन आणि विद्यापीठातील अध्यापन यात मूलभूत फरक आहे. महाविद्यालयातील प्राध्यापक हा केवळ शाळेतील शिक्षकाची सुधारून वाढवलेली आवृत्ती नव्हे, असूही नये. आज अनेकदा शाळेतील शिक्षकांपेक्षाही महाविद्यालयातील काही प्राध्यापक निकृष्ट दर्जाचे आढळतात ही गोष्ट खरी आहे. परंतु मुख्य प्रश्न काय असते हा नसून आपली अपेक्षा काय असावी व ती अपेक्षा पुरी व्हावयाची असेल तर कशी योजना आखावयास पाहिजे, हा आहे. केवळ कामाचे तास वाढवून किंवा सुट्टीवर आक्रमण आणून शाळेतील शिक्षक व महाविद्यालयातील प्राध्यापक यांचे समीकरण साधता येईल; परंतु त्यामुळे शिक्षणाच्या त्या दोन भिन्न टप्प्यांतील शिक्षणाची पातळी मात्र एकच होईल हे विसरता कामा नये. प्राध्यापक आपल्या विषयांतील किती मोजक्या गोष्टी विद्यार्थ्यांना शिकवितो व त्यांच्याकडून पाठ करून घेतो यापेक्षा तो किती विद्यार्थ्यांच्या ठिकाणी आपल्या विषयाविषयी जागृत, समुत्सुक जिज्ञासा निर्माण करू शकतो, हे अधिक महत्त्वाचे आहे. ज्या प्राध्यापकाला आपल्या विषयाविषयी जिवंत उत्साह वाटत नाही तो विद्यार्थ्यांना आवश्यक ती प्रेरणा कधीच देऊ शकणार नाही. विद्यापीठाच्या कार्यपद्धतीची अशी आखणी अशा प्राध्यापकांना डोळ्यांपुढे ठेवून करण्यापेक्षा, अशा प्राध्यापकांना विद्यालयापासून दूर ठेवणे अधिक इष्ट आहे. सुट्टीचा व फुरसतीचा सदुपयोग करण्याइतकी आर्थिक सुस्थिती व अभ्यासास आवश्यक अशी इतर साधने विद्यापीठाने उपलब्ध करून दिली, की खरा जातिवंत जिज्ञासू आपला काळ आपल्या आवडीच्या विषयाच्या अध्ययनातच घालवील, याविषयी निश्चिती बाळगावयास हरकत नाही. अशी अनुकूलता निर्माण करण्याचा प्रयत्न न करता उलट दिशेने विचार करून निर्बंधाच्या जोखडाखाली काम चोपून घेण्याचा प्रयत्न करणे, म्हणजे विद्यापीठाने आपल्या मुख्य ध्येयकार्याला विसरण्यासारखे आहे. पुणे विद्यापीठ आज काहीशी अशीच चूक करीत आहे.

सामाजिक कार्यक्षेत्रात काम करण्याविषयी विशेष काही लिहावयाची गरज नाही. आज भारतात राष्ट्राच्या एकूण उन्नतीच्या दृष्टीने समाजसेवेच्या काही क्षेत्रात तरी विद्यापीठातील प्राध्यापक व विद्यार्थी यांनी प्रत्यक्ष कार्य करणे आवश्यक आहे. असे कार्य विद्यापीठाच्या मार्गर्शनाखाली सुरू करता येईल व चालू ठेवता येईल. या कार्याचा व विद्यापीठाचा विरोध येण्याचे कारण नाही. या खेरीज इतर कार्यक्षेत्रांत प्रत्येक प्राध्यापकाने आपल्या सवडीप्रमाणे, आवडीप्रमाणे आपापले कार्यक्षेत्र निवडावे. विद्यापीठातील मुख्य कामावर जोपर्यंत या कार्याचा प्रतिकूल परिणाम होत नसेल तोपर्यंत याही बाबतीत विद्यापीठाने कोणतेही नियंत्रण ठेवू नये. प्राध्यापकाची अध्यापनातील कार्यक्षमता कमी झाली तर त्याला कामावरून दूर करण्याचा अधिकार विद्यापीठाला आहेच. समाजशास्त्राच्या अभ्यासकांना तर आपल्या विषयाचे नीट आकलन होण्याच्या दृष्टीनेही निरनिराळ्या सामाजिक संस्थांशी व संघटनांशी संबंध ठेवणे इष्ट असते. नाहीतर त्यांचे ज्ञान अगदीच एकांगी व पुस्तकी होण्याचा संभव असतो. राज्यसत्ता प्रक्षोभक मार्गांनी उलथून पाडणाऱ्या कोणत्याही संघटनेशी त्यांचा संबंध नसला की पुरे. लोकशाही राज्यात इतर सर्व संघटना सनदशीरपणे अस्तित्वात राहू शकतातच. हुकुमशाही राजवटीत तर राज्यसत्ता उलथून पाडण्यासाठीही प्रयत्न करण्यात प्राध्यापकांना काहीच गैर वाटण्याचे कारण नाही असेही बर्ट्रांड रसेलने सांगितले आहे.

- देवदत्त दाभोलकर (नवभारत ऑक्टोबर १९५१)










# रॉय यांचे मानवविषयक तत्त्वज्ञान

स०मा० गर्गे

### युद्धोत्तर जगापुढे दोन मार्ग

दुसरे महायुद्ध संपले तेव्हा जगातील सर्वच राष्ट्रांपुढे पुनर्घटनेचा प्रश्न महत्त्वाचा होता. समाजव्यवस्था आणि राज्यव्यवहार महायुद्धात विस्कटून गेले होते. अनेक राष्ट्रांचे जीवन उद्ध्वस्त झाले होते. अशा स्थितीत पुनर्घटनेचे कार्य कोणत्या पद्धतीने करावे? जीवनातील सामाजिक भूमिका कोणती असावी? अशा समस्या उभ्या होत्या. त्यावेळी जगापुढे दोन प्रमुख मार्ग दिसत होते : मार्क्सवादावर उभारलेली सोव्हिएट रशियातील कामगार-हुकुमशाही आणि पश्चिम युरोपातील प्रमुख देशात रूढ असलेली प्रातिनिधिक लोकशाही. खरे तर, या दोन प्रमुख भूमिकांचे राजकीय आणि आर्थिक धोरण सकृद्दर्शनी परस्परविरोधी असले तरी, त्यांचे समाजावर, मुख्यतः व्यक्तिस्वातंत्र्यावर, होणारे परिणाम कमी-अधिक प्रमाणात सारखेच होते. साम्यवादी-हुकुमशाही मार्क्सवादी विचाराने व्यवहार करीत होती. या विचारसरणीप्रमाणे राज्यसंस्था क्रमाक्रमाने विरून जाईल आणि जगातील वर्गवादी अर्थपद्धती शोषणमुक्त होऊन अखेरीस समता प्रस्थापित होईल, आणि मग मानवी समाज सुखी, समाधानी व निश्चिंत होईल. कामगार-हुकुमशाहीच्या रशियातील प्रयोगाने आणि वर्गवारी तत्त्वज्ञानाने जी स्थिती निर्माण झाली, त्यामुळे शासनव्यवस्था विरून जाण्याची कल्पना भ्रामक ठरली. हुकुमशाहीचे प्रणेते अधिक भ्रष्ट व क्रूर झाले. सत्ता आणि संपत्ती त्यांच्या हाती केंद्रित झाली व समाज हतबल झाला. व्यक्तिस्वातंत्र्य नष्ट झाले.

दुसरी विचारसरणी प्रातिनिधिक लोकशाहीप्रचलित होती. अशा लोकशाहीचे प्रतिनिधी, लोकांनी एकदा निवडून दिल्यानंतर आपल्या स्वार्थी राजकारणामुळे प्रबळ होतात आणि सत्तेच्या जोरावर समाजातील सामान्य माणसांना परावलंबी बनवतात. व्यक्तिस्वातंत्र्य नष्ट होते आणि लोक सत्ता व संपत्ती केंद्रित झालेल्या शासनाचे दुर्बल घटक बनतात.

### गांधीजींचा धार्मिक नीतिवाद

भारतापुरता आणखी एक मार्ग समाजापुढे होता आणि तो म्हणजे गांधीवादाची तत्त्वे. रशियात मार्क्सवाद आणि जर्मनीत नाझीवाद यांचे क्रूर प्रयोग चालू होते, त्याच कालखंडात भारतातही महात्मा गांधींनी सत्य व अहिंसेचे प्रयोग समाजापुढे ठेवले. त्यालाच गांधीजी नैतिक मानदंड मानीत असत. आणि त्याला अनुसरून साध्याप्रमाणे साधनांच्या शुचितेचा आग्रह व्यक्त करीत असत. त्यांची सामाजिक पुनर्घटनेची उद्दिष्टे वेगळी होती आणि त्यांचे मार्गही वेगळे होते; पण त्यांचे नीतिशास्त्र धार्मिक तत्त्वावर आधारलेले होते आणि अर्थव्यवस्थेचा आधार हस्तव्यवसाय होता. स्वयंपूर्ण ग्रामव्यवस्थेवर त्यांच्या राज्यव्यवहाराची इमारत उभारलेली होती. त्यांनी प्रतिपादन केलेले नीतिविषयक विचार धर्मतत्त्वावर आधारलेले असल्यामुळे त्यांचे निर्णय बुद्धीपेक्षा आतल्या आवाजाला अनुसरून ठरत असत. ईश्वराचे अनन्य सामर्थ्य हे धर्मश्रद्धेचे मूळ एकदा मान्य केले की सर्व नैतिक कल्पनांचा उगम आणि आधारही परमेश्वरच मानला जातो. राजकीय व सामाजिक मूल्यांचे मोजमापही त्याच अनुषंगाने केले जाते. या भूमिकेत भूतदया, देव, दैव इत्यादी कल्पनांनी माणसाचे स्वतंत्र व्यक्तित्व, त्याची जिज्ञासू वृत्ती दुर्बल बनते. परमेश्वरी इच्छेचे दडपण माणसाला परावलंबी व निष्क्रिय बनवते.

### मार्क्सवादाच्या पलीकडे

वरील सर्व तात्त्विक भूमिकेतील दोष, वैगुण्य व अपुरेपणा नाहीसा करून मनुष्याचे स्वतंत्र व्यक्तित्व व बुद्धिप्रामाण्य यांवर आधारलेला नवा पर्याय मानवेंद्रनाथ रॉय यांनी नवमानवता-वादाच्या तत्त्वज्ञानात प्रतिपादन केला आहे. मुळात हुकुमशाही ज्या तत्त्वावर आधारलेली होती त्या मार्क्सवादाच्या पलीकडे (Beyond Marxism) जाण्याची आवश्यकता त्यांनी हिरिरीने सांगितली. त्यातूनच त्यांनी बावीस सूत्रे विशद केली. ती त्यांची तात्त्विक भूमिका.

जागतिक अरिष्टाचे स्वरूप आणि त्याची उग्रता यांची वास्तव जाणीव करून देण्यासाठी नवमानवतावादाची तत्त्वे यथार्थ आहेत असा त्यांचा आत्मविश्वास होता. या तत्त्वांचे

आचरण जगाला राजकीय व आर्थिक समस्यांतून बाहेर पडण्यासाठी अपरिहार्य आहे, अशी त्यांची भूमिका होती.

मार्क्सवादाचा प्रयोग मानवी संहाराला कारणीभूत ठरला, अशी त्यांची धारणा होती. रशियात राज्यक्रांतीनंतर विकासशील समाजरचना अस्तित्वात येईल व एक आदर्श जीवन समाजाला लाभेल ही आशाही मावळली. क्रांतीची नवाळी निघून गेल्यानंतर त्यात विकृती उत्पन्न होऊ लागली. हे सर्व प्रत्यक्ष पाहिल्यावर मानवेंद्रनाथ रॉय यांच्या मार्क्सवादावरील श्रद्धेला प्रचंड धक्का बसला. त्यातूनच मार्क्सवादाकडे चिकित्सक दृष्टीने पाहण्याची आवश्यकता त्यांना वाटू लागली. शास्त्रीय मानवतावाद - हे त्यांच्या चिकित्सेचे उदात्त आणि व्यापक फलित होय.

### मानव हाच प्रगतीचा मानदंड

श्री. रॉय यांचा मानवतावाद राष्ट्रीय अथवा वर्गीय बंधने मानीत नाही. मानव हाच सर्व विचारांचा केंद्रबिंदू. त्याचे जीवन विशाल, संपन्न आणि निर्भय बनविणे हेच सर्व ज्ञानविज्ञानाचे उद्दिष्ट. सामाजिक मुक्ती आणि प्रगती साधताना जर स्वातंत्र्य आणि समाधान यांचा प्रत्यक्ष अनुभव व्यक्तीला मिळत नसेल तर ती प्रगती केवळ आभास ठरेल. खरे स्वास्थ्य आणि समाधान व्यक्तीला भोगता आले पाहिजे. व्यक्तीच्या हितानेच सामुदायिक हिताची साधना होत असते. म्हणूनच व्यक्तिस्वातंत्र्याची आवश्यकता आणि ते अबाधित टिकवणारी समाजरचना आवश्यक आहे. किंबहुना तेच सर्व आर्थिक, राजकीय आणि नैतिक विचारांचे एकमेव ध्येय असले पाहिजे. नवमानवतावादाचा हा आग्रह आहे : मानव हाच प्रगतीचा मानदंड.

### भौतिक परिस्थिती, विचार व नीती

"समाजात अस्तित्वात असलेल्या उत्पादनपद्धतीला अनुसरूनच त्या काळातील विचारनिर्मिती होते आणि ज्या भौतिक परिस्थितीत मनुष्य जन्माला येतो त्या परिस्थितीच्या परिसीमेतच तो इतिहास घडवितो." हे मार्क्सने प्रतिपादन केलेले दोन्ही विचार रॉय यांना मान्य नाहीत. त्यांच्या मते, विचारांचा उगम उत्पादनसाधनांच्या नंतर झालेला नाही. विचारांचे मूळ मानवी जीवनाच्या उत्क्रांतीत शोधावे लागेल. आर्थिक उत्पादनसाधने अस्तित्वात येण्यापूर्वीही विचारांचे अस्तित्व होते. किंबहुना, विचारसामर्थ्याच्या जोरावरच मनुष्याला उपजीविकेचे साधन शोधून काढता आले. 'विचारातून भौतिक विश्व निर्माण झाले,' हे सत्य नाही. विचार अव्यक्त नसतात. त्यांचा उगम शोधण्यासाठी एखाद्या गूढ तत्त्वाचा अवलंब करण्याचीही गरज नाही. विचार हा प्राणिजीवनाचा एक अविभाज्य भाग आहे. या जीवनाच्या उत्क्रांतीबरोबरच विचारांचीही उत्क्रांती होत आली आहे. म्हणून विचाराचा विकासक्रम सामाजिक विकासक्रमा-बरोबरच होत असतो. त्यांचा परस्परांवर प्रभाव पडत असतो हेही मान्य केले पाहिजे. 'मानवी बुद्धी भौतिक विश्वाच्या एकंदर रचनेशी सुसंगत आणि सुसंबद्ध आहे,' हेही वरील सिद्धान्ताने स्पष्ट होऊ शकते. हा शुद्ध भौतिकवाद स्वीकारला पाहिजे. नीतीची परंपराही जीवनाच्या व विचारांच्या परंपरेशी निगडित असते. भौतिक परिस्थिती, विचार आणि नीती यांचा परस्परसंबंध लक्षात घेतला पाहिजे, तरच नैतिक कल्पनांना बुद्धिनिष्ठ बैठक लाभू शकेल. निसर्गाचे ज्ञान ज्या मानाने वाढते त्या मानाने मनुष्य निसर्गाच्या कचाट्यातून व भौतिक व सामाजिक बंधनातून मुक्त होत जातो.

### मानवी विकासामागे स्वातंत्र्याची इच्छा

मनुष्याचा भोवतालच्या परिस्थितीशी जगण्यासाठी संघर्ष चालू असतो. त्याच्या मुळाशी अनेक बंधनांतून मुक्त होण्याचीच मानवी इच्छा व्यक्त होते. प्रथम नैसर्गिक शक्ती आणि त्याचबरोबर मनुष्यानेच निर्माण केलेल्या संस्था, संघटना व समाज यांच्या दडपणातून स्वतंत्र होणे आणि विकास करणे त्याला आवश्यक वाटते. स्वातंत्र्याची ही इच्छाच मानवी विकासामागील खरी प्रेरक शक्ती आहे. मनुष्य स्वभावतःच बुद्धिप्रधान आहे कारण नियमबद्ध निसर्गाच्या कुशीतूनच तो उदय पावला आहे. त्याचाच एक आनुषंगिक भाग म्हणजे मानवी इच्छाशक्ती. ही इतिहासाची एक प्रभावी शक्ती बनते. इतिहासाचा क्रम परमेश्वरी संकेताने घडलेला नाही. तसा तो पूर्वनियोजितही नाही. हे दोन्ही धार्मिक सिद्धान्त बुद्धिप्रामाण्य-वादाला मान्य नाहीत. इतिहासाचा क्रम कार्यकारणभावावर आधारलेला आहे. अशा अनेक कारणांमध्ये मानवी इच्छाशक्ती हे एक महत्त्वाचे कारण आहे. स्वातंत्र्याचे नवे जग निर्माण करण्यासाठी समाजाच्या आर्थिक पुनर्घटनेच्या पलीकडे गेले पाहिजे. शोषित वर्गाच्या नावाने राजकीय सत्ता हस्तगत करून उत्पादनाचे राष्ट्रीयीकरण करणे व खासगी मालकी नाहीशी करणे, म्हणजे समाजाला स्वातंत्र्य मिळाले असे होत नाही.

अशा प्रक्रियेतून राष्ट्र किंवा वर्ग यांच्या नावाने सामुदायिक अहंकार निर्माण केला जातो आणि त्या अहंकाराच्या स्थंडिलावर व्यक्तीचा बळी दिला जातो. यात व्यक्तिस्वातंत्र्यही नाही आणि व्यक्तिविकास तर मुळीच नाही. व्यक्तीचे सार्वभौमत्व त्याज्य ठरविणारे हे तत्त्वज्ञान म्हणावे लागेल. अशा राष्ट्र किंवा वर्ग यांच्या सामुदायिक पुनर्घटनेने प्रगती साधली तरी, ती व्यक्तिस्वातंत्र्याला आणि परिणामी समाजालाही घातक ठरते. म्हणूनच मानवेंद्रनाथ रॉय यांचा मानवतावाद राष्ट्रीय अथवा वर्गीय बंधने कृत्रिम मानतो. श्री. रॉय यांनी प्रतिपादन केलेल्या तात्त्विक विचारांची बैठक सर्वस्वी व्यक्तिस्वातंत्र्यवादी विचारांची आहे. त्यासाठी त्यांनी व्यक्तिस्वातंत्र्याला पोषक ठरतील अशाच राजकीय, आर्थिक आणि सामाजिक संघटना निर्माण करण्याची आवश्यकता प्रतिपादन केली.

### हुकुमशाहीचे प्रकार आणि विकार

राज्यसंस्था ही समाजाची राजकीय संघटना आहे. मार्क्सच्या मते 'भांडवलशाहीविरुद्ध कामगारवर्गाने क्रांती केली म्हणजे राज्यसंस्था हळुहळू निस्तेज होईल आणि तिची गरजही राहणार नाही. नंतर कष्टकऱ्यांचे राज्य निर्माण होईल.' पण हे वर्गयुद्धाचे तत्त्वज्ञान किती काल्पनिक आहे याचा प्रत्यक्ष अनुभव रशियातील प्रयोगाने सिद्ध झाला आहे. उद्योगधंदे आणि शेती यांवर श्रमजीवी वर्गाची नव्हे तर, राजकीय हुकुमशाहीची सत्ता निर्माण होते, वाढते आणि शेवटी हुकुमशहांच्या हातात समाजाची सर्व आर्थिक व राजकीय सत्ता केंद्रित होते. ही वस्तुस्थिती लक्षात घेतली म्हणजे आणखी एक मुद्दा विचारात घ्यावा लागतो. हुकुमशाही प्रस्थापित झाली म्हणजे ती अधिकाधिक बलदंड होते. श्रमजीवींच्या नावाने ती श्रमजीवी लोकांवरच दडपण वाढवते. एका अर्थाने ते राजकीय सत्तेकडून होणारे शोषणच असते. अशा नियंत्रणाच्या छत्राखाली चालणारे आर्थिक नियोजन व्यक्तीचे स्वातंत्र्य नष्ट करते. तात्पर्य असे, की एकीकडे हुकुमशाही बळकट होते आणि दुसरीकडे सामान्य माणसाचे शोषण अधिकाधिक होत जाते, वाढत जाते. प्रातिनिधिक लोकशाहीत देखील फार मोठे दोष अनुभवाला आले आहेत. राज्याची सत्ता सत्तातुर प्रतिनिधींकडे सोपविल्यामुळे असे दोष उत्पन्न होतात. निवडून गेल्यानंतर त्यांच्यावर मतदारांचे दडपण नसते. त्यातून प्रातिनिधिक लोकशाहीच्या राजकारणात भांडवलशाही अधिक बळकट होत जाते. आणि उत्पादनसाधने भांडवलदारांच्या हाती केंद्रित होतात. तेच त्यांचे सामान्य माणसाच्या पिळवणुकीचे साधन बनते. शिवाय त्यांचे उत्पादनकार्य नफ्यासाठी केलेले असते. सामान्य माणसांना मालकांच्या नफ्यामुळे फार थोडे उत्पन्न मिळू शकते. अशा राजकीय जीवनात भांडवलशाहीचे पुरस्कर्ते आणि विरोधक असे गट पडलेले दिसत नाहीत. उलट, हुकुमशाही प्रस्थापित करण्याच्या दृष्टीने नफ्यापैकी आपल्या गटाला अधिक वाटा मिळावा यासाठी ते झगडत राहतात. याचा अर्थ असा की, प्रातिनिधिक लोकशाहीमध्ये हुकुमशाहीच बलिष्ठ बनते. अशा राजवटीत डावे आणि उजवे असे दोन गटही पडतात. पण परिणामाच्या दृष्टीने त्यात फक्त तरतमभाव लक्षात येतो. स्वातंत्र्य, लोकशाही आणि सामाजिक कल्याण यांच्या दृष्टीने दोन्ही पक्ष सारखेच अनिष्ट असतात. वरील विवेचनाचे तात्पर्य असे की, भांडवलशाहीच्या वर्चस्वाखाली असलेली प्रातिनिधिक लोकशाही की समाजवादी लोकशाही, हा आजचा खरा प्रश्न नाही; सत्तेच्या राजकारणातून उद्‌भवणारी हुकुमशाही की जनसामान्यांची लोकशाही, हा खरा प्रश्न आहे.

### राष्ट्रीयीकरणाने सत्ताधाऱ्यांचा हस्तक्षेप

समाजवादी कार्यक्रमावर आधारलेले 'डावे' पक्ष लोकशाहीचा दावा करतात. पण ते आजच्या अरिष्टातून बाहेर पडण्याचा मार्ग दाखवीत नाहीत. मुख्य गोष्ट अशी की, केवळ उत्पादन, विभागणी आणि विनिमय यांच्या साधनांचे 'राष्ट्रीयीकरण' केल्याने हा प्रश्न सुटत नाही. 'डाव्या' पक्षांची मागणी आणि 'उजव्या' पक्षांचा कार्यक्रम यात विशेष फरक दिसत नाही. दोन्ही पद्धतीत राजकीय सत्तेचा कोणत्या ना कोणत्या तरी मार्गाने हस्तक्षेप चालू असतो. डाव्या पक्षांप्रमाणे उजवे पक्षदेखील राज्यानेच आर्थिक नियोजन करावे असे आग्रहाने सांगतात. याचा अर्थ नियोजनाच्या द्वारे उत्पादनाच्या आणि विनिमयाच्या साधनांवर ते नियंत्रण ठेवीत असतात. या दोहोंनाही लोकशाही हवी आहे. पण त्यांच्या लोकशाहीत मूठभर प्रतिनिधींच्या हातात सत्तेचे केंद्रीकरण होते. मग त्याला 'समाजवादी डावे केंद्रीकरण' म्हणा की 'भांडवलवादी उजवे केंद्रीकरण' म्हणा. या दोन्ही पद्धतींत जनतेचे सार्वभौमत्व केवळ औपचारिक बनते. दोन्ही गट लोकप्रियता मिळावी म्हणून जनतेच्या धार्मिक श्रद्धेला, जुन्या पूर्वग्रहांना आणि जनतेच्या रूढिग्रस्त विचारांनाही दुखवू इच्छित नाहीत.

सांस्कृतिक व राजकीय मागासलेपणातून निर्माण झालेल्या परंपरेला दोन्ही गट उत्तेजन देत असतात. राष्ट्र या कल्पनेलाही इतर राष्ट्रांच्या द्वेषभावनेवर जोपासीत असतात. समाजवादी म्हणवणारी राष्ट्रे राष्ट्रवादाचीच पुरस्कर्ती बनल्याची रशिया व पूर्व युरोपातील राष्ट्रे ही उत्तम उदाहरणे आहेत. अशा वेळी लोकांच्या तथाकथित स्वाभिमानाला, अस्मितेला, विभूतिपूजेला आवाहन करण्यात येते. अशा स्थितीत कोणत्याही गटाने अथवा पक्षाने एकदा सत्ता हस्तगत केली की, ती सतत आपल्याच हातात कशी राहील यासाठी सर्व बऱ्यावाईट मार्गांचा उपयोग करण्यात येतो.

### देशभर लोकसमित्यांची स्थापना

लोकसत्ता खरीखुरी प्रभावी करावयाची असेल तर सत्ता ही नेहमीच निरपवादपणे जनतेच्या हाती स्थिरावली पाहिजे. अधूनमधून नव्हे, तर सतत व दैनंदिन ती जनतेला प्रभावीपणे वापरता आली पाहिजे. त्यासाठी प्रचलित प्रातिनिधिक लोकशाहीच्या ठिकाणी संघटित लोकशाही स्थापणे हाच एकमेव पर्याय आहे असे मानवेंद्रनाथ रॉय यांनी ठामपणे प्रतिपादन केले आहे. त्यासाठी देशभर लोकसमित्यांची स्थापना करून सुसंघटित लोकसत्ता अस्तित्वात आणावी लागेल, असेही ते म्हणतात. त्यांच्याच शब्दांचा आशय असा की, "संघटित लोकसत्तेच्या पायावर पिरॅमिडच्या धर्तीने निमुळता होत जाणारा मनोरा उभारून त्या मनोऱ्याचे शिखर म्हणजे संसद होय. अशा रचनेने राजकीय संघटना म्हणजेच राज्य सर्व समाजाशी एकरूप होईल."

### मानव हाच स्वातंत्र्याचा शिल्पकार

या सर्व कल्पनांमागे एक महत्त्वाचे तत्त्व आहे. मानव हाच स्वतःच्या विश्वाचा शिल्पकार आहे. तो विचारशील प्राणी आहे व ही विचारशीलता व्यक्त होण्यासाठी तो व्यक्तिसंपन्न झाला पाहिजे. ज्यांना आपल्या सर्जनशील शक्तीचा प्रत्यय येतो, समाजाची नव्या भूमिकेवर म्हणजेच मानवतावादावर नवरचना करण्याची इच्छाशक्ती असते, अशा शक्तीनेच तो प्रेरित झाला तर, अशा स्वतंत्र मानवाचा स्वतंत्र समाज निर्माण होऊ शकतो. संख्येने सतत वाढत जाणारे असे लोकच लोकशाहीसाठी योग्य परिस्थिती निर्माण करू शकतात. रॉय म्हणतात, "सामाजिक प्रगतीची ही सारी तत्त्वे निश्चितपणे मांडून त्यांच्या पायावरच सामाजिक क्रांतीची आणि त्यासाठी आवश्यक त्या कार्याची उभारणी केली पाहिजे. लोकांना ही स्वातंत्र्याची तत्त्वे, बुद्धिवादी विचार आणि सहकारी अर्थपद्धती यांचे शिक्षण देणे, हाच समाजाला नवजीवन देण्याचा मार्ग आहे. त्यासाठी जनसमित्या स्थापन करणे, त्यांचा प्रसार करणे यांची आवश्यकता आहे. थोडक्यात स्वातंत्र्य, बुद्धिवाद आणि सामाजिक व आर्थिक सहकार या तत्त्वांवरच क्रांतीचा कार्यक्रम उभा करता येतो." त्यामुळे आर्थिक बंधनातून जनतेची मुक्तता होईल आणि मूलगामी सत्ता स्थापन होईल. लोकांच्या उपयोगासाठीच उत्पादन करावयाचे आणि त्याची वाटणीही मानवी गरजा भागविण्याच्या दृष्टीनेच करावयाची; नफ्यासाठी नव्हे.

### बुद्धिप्रामाण्य व व्यक्तिस्वातंत्र्य

सत्ता, संपत्ती आणि उत्पादनसाधने यांचे केंद्रीकरण हा आजच्या सत्तारचनेतील महान दोष आहे. यांपैकी एकेकाचे केंद्रीकरण समाजविकासाला घातक ठरणारे आहे, मग ही तिन्ही साधने एकत्र झाल्यावर त्यांचे दुष्परिणाम काय होतील हे अजमावण्यासाठी राजकीय तत्त्वज्ञांची गरज नाही. मानवतावादी तत्त्वज्ञानाने प्रेरित होऊन जी समाजरचना अस्तित्वात आणावयाची तिच्यावर मूठभर लोकांचे नियंत्रण नसावे. या संघटनेचे स्वरूप सहकारी समाजाचे असावे. तसेच त्याचे घटक लहान, सुसंघटित अशा स्थानिक लोकशाही स्वरूपाचे असावेत. त्यामुळे साहजिकच त्यात राजकीय पक्षांना आणि त्यांच्या नेत्यांना स्थान मिळणार नाही. अर्थात हे सर्व करण्यासाठी संघटित लोकशाहीचे प्रतिनिधी लोकांकडून उत्स्फूर्ततेने निवडून दिलेले असतील. सहकारी राज्याची इष्टता त्यांना पटवून दिली जाईल. दैनंदिन कामासाठी त्यांना समर्थ करणे, ही लोकप्रतिनिधींची कामे असतील. निरपेक्ष आणि निःस्वार्थपणे कामे करणे, अशा समाजाच्या पुनर्रचनेचे कार्य असेल. ते लोकांचे मार्गदर्शक, स्नेही आणि तत्त्वज्ञ या नात्याने काम करतील. त्यांनाच खऱ्या अर्थाने क्रांतिकारक म्हटले पाहिजे. क्रांती म्हणजे जनतेच्या भावना प्रक्षुब्ध करणे नव्हे. लोकशिक्षणाच्या द्वारा वैचारिक व राजकीय परिवर्तन घडवून आणणे हा क्रांतीचा वास्तव अर्थ आहे. नवमानवतावादाच्या मते, सार्वजनिक जीवनात नीतिमूल्यांना सर्वश्रेष्ठ स्थान मिळाले पाहिजे. अर्थात ही नीती धर्मनिरपेक्ष असेल तशीच पक्षनिरपेक्षही असेल. बुद्धिप्रामाण्य आणि व्यक्तिस्वातंत्र्य हीच नवमानवतावादाच्या नीतीची अधिष्ठाने असावीत.

### नवमानवतावादाचा प्रसार?

नवमानवतावादाचे हे ध्येय उदात्त आहे. ते समाजासाठी प्रत्यक्षात आले पाहिजे असाही मानवेंद्रनाथ रॉय यांचा प्रामाणिक आग्रह आहे. प्रश्न आहे तो विचार प्रत्यक्षात व्यवहारात आणण्याचा. लोकशिक्षण आणि ध्येयावर खंबीर निष्ठा ही त्याची साधने आहेत. पण ती कोणी आणि केव्हा प्रत्यक्षात आणावयाची? रॉय यांनी आपले तत्त्वज्ञान सांगितलेल्याला आता पन्नास वर्षे झाली आहेत. ज्या मंडळींनी तो ध्येयवाद स्वीकारला ते लोक आता वयाने सत्तर-ऐंशीच्या घरात आहेत. तरुण वर्गाला या तत्त्वज्ञानाचा परिचय नाही. कोणी तो करून देण्याच्या अवस्थेत नाही. सभोवतालची परिस्थिती अत्यंत प्रतिकूल. अशा स्थितीत हे तत्त्वज्ञान केवळ शब्दांतच अडकून पडणार की काय, अशी या विचाराच्या चाहत्यांना शंका येते. त्याशिवाय एकीकडे ज्ञानविज्ञानाची घोडदौड चालू आहे, तर त्याच वेळी धर्मवाद, दहशतवाद, शस्त्रवाद यांचीही तेवढीच घोडदौड चालू आहे. अशा पार्श्वभूमीवर मानवतावादाचा विचार गेल्या पन्नास वर्षांत वाढत आहे, की मर्यादित होत आहे? त्याचा प्रसार होत आहे की तो आकुंचन पावत आहे? थोडक्यात नवमानवतावादाचे तत्त्वज्ञान अधिक देशांत, अधिक समाजांत विकसित होत आहे, की ते मर्यादित होत आहे? या आणि अशा प्रश्नांच्या संदर्भात, आपल्या देशापुरता का होईना, निर्लेप मनाने आढावा घेण्याची अनेकांना आवश्यकता वाटते. प्रत्यक्ष कार्याच्या दृष्टीनेही काही स्पष्ट मार्ग दिसावा असेही अनेकांना वाटते. हे तत्त्वज्ञान केवळ तात्त्विक स्वरूपात राहिले तर ते थोड्या सज्जन लोकांच्या चिंतनाच्या स्वरूपातच अनुभवावे लागेल. काही विचारवंत गंभीरपणे म्हणतात तसे, नवमानवतावादी म्हणजे निरुपद्रवी प्रवचनकार ठरता कामा नयेत. तसेच आपण काहीतरी सर्वोच्च तत्त्वज्ञान मांडीत आहोत, असा अहंकारही त्यांच्या मनात उत्पन्न होता कामा नये.



### प्रलय - प्रभव

| | |
|---|---|
| जडांतील | जीवांतील |
| एक अणू | एक अणू |
| अणू अणू | अणू अणू |
| साधा अणू - १ | साधा अणू - १ |
| | |
| अणू आत | अणू आत |
| विश्वे सात | विश्वे सात |
| अणू आत | अणू आत |
| वज्राघात - २ | जगन्नाथ - २ |
| | |
| विभाजन | विभाजन |
| संयोजन | संयोजन |
| संयोजन | संयोजन |
| विभाजन - ३ | विभाजन - ३ |
| | |
| फुटे अणू | फुटे अणू |
| उठे रण | उठे मन |
| दारी उभा | दारी उभे |
| प्रभंजन - ४ | संजीवन - ४ |

- देवदत्त दाभोलकर
(नवभारत डिसेंबर १९५०)

### देव आणि दगड

आणि त्या पतितेवर साऱ्यांनी आपले दगड रोखले.

पतितेला आड करीत तो उदारचरित युगपुरुष म्हणाला : "ज्याचे मन निष्कलंक असेल त्यानेच पहिला दगड मारावा."

साऱ्यांनी आपले हात आवरले. प्रत्येकाला मनोमन आपली खूण पटली होती.

परंतु द्वेष जळत होता. बाहू स्फुरत होते. पहिला दगड तर पडावयास पाहिजे होता.

"तर तूच पहिला दगड टाक. पुढचे आम्ही पाहून घेतो."

एकाने त्या युगपुरुषाला सूचना केली.

ही सोपी युक्ती सर्व जनसमुदायाला रुचली आणि तो पहिला दगड टाकीत नाही म्हणून साऱ्यांनी ठेचून ठेचून त्याचाच बळी घेतला!

- देवदत्त दाभोलकर
(नवभारत जानेवारी १९५१)

# नवमानवतावादी बावीस सूत्रे आणि रॅडिकल्ससाठी कार्यक्रम

विश्वास नाईकनवरे

या विषयावर लेख लिहिण्याची सूचना मला मे.पुं.रेगे यांनी केल्यावर मी धाडसाने या अवघड विषयाची मांडणी करण्यासाठी बसलो आहे. पण सुरुवातीलाच मला असे धाडस करण्याची बुद्धी व्हावी यामागची कारणे सांगणे किंवा थोडासा वैयक्तिक खुलासा करणे आवश्यक वाटल्यामुळे तो संक्षेपाने करतो.

मानवेंद्रनाथ रॉय, त्यांचा रॅडिकल डेमॉक्रॅटिक पक्ष, साप्ताहिक इंडिपेंडंट इंडिया, नंतरच्या वैचारिक वाटचालीत झालेले राजकीय पक्षाचे विसर्जन व नवमानवतावादाच्या बावीस सूत्रांचा स्वीकार वगैरे सर्व घडत असताना मी रॉय व त्यांचे राजकीय, आर्थिक, तात्त्विक वगैरे विचार यांच्याशी परिचित होतो; कारण तरुण वयात मी विचारपूर्वक रॉय यांच्या विचारसरणीचा माझ्या परीने अभ्यास करून ती मनापासून स्वीकारलेली होती. आजही मी स्वतःला मानवतावादीच मानतो. तटस्थ, त्रयस्थ बुद्धीने, अलिप्तपणे मी या सर्व विषयाकडे पाहिले नाही. पण विचार करूनच स्वतःची मते बनविली होती. अभिनिवेश होता पण अंधविश्वास नव्हता. रॉय यांचे व्यक्तिमत्त्व उत्तुंग असले तरी विभूतिपूजा केली नाही.

या सर्व घडामोडींना आता पन्नास वर्षे उलटून गेली आहेत. जे स्वप्न आम्ही पाहिले होते ते तर विरून गेले आहे अशी राजकीय परिस्थिती दिसते. तरीही त्या तत्त्वज्ञानाचा असा काही जबरदस्त ठसा मनावर उमटलेला आहे की, विचार केल्यावर नवमानवतावादाखेरीज अन्य काहीच मार्ग आजही मला दिसत नाही. इतकी मोहिनी घालणारे हे प्रकरण जरा विस्ताराने मांडण्याची संधी दिल्याबद्दल मी प्रा. रेगे यांचा अर्थातच ऋणी आहे.

मानवेंद्रनाथ रॉय यांची ज्यांना काहीही माहिती नाही अशी आज पुष्कळ माणसे आहेत. पण राजकारणाशी ज्यांचा अधिक जवळून परिचय आहे त्यांनी कधी ना कधी रॉयिस्ट विचारांबद्दल ऐकलेले असते. एक राजकीय विचारसरणी म्हणून जाणकारांना मानवेंद्रनाथ रॉय यांच्या विचारांची तोंडओळख तरी असते. नरेंद्र भट्टाचार्य या नावाने २१ मार्च १८८७ रोजी आजच्या बांगला देशात, बंगाल एकच होता त्या काळात जन्मलेले जहाल क्रांतिकारक स्वदेशाच्या मुक्तीसाठी शस्त्रास्त्रांनी भरलेले एक जहाज क्रांतिकारकांसाठी आणण्याकरिता परदेशगमनाला सिद्ध झाले, तेव्हा त्यांच्या वयाने अजून विशी ओलांडली नव्हती. अनेक वेषांतरे, नावे बदलणे वगैरे करत जेव्हा ते अमेरिकेत पोहोचले तेव्हा त्यांनीच मानवेंद्रनाथ रॉय हे नाव स्वतःसाठी निश्चित केले व ते नाव त्यानंतर कायम राहिले. अमेरिकेतून मेक्सिकोत पळून जाण्यापूर्वीच त्यांचा मार्क्सवादाचा अभ्यास पूर्ण होऊन ते कट्टर कम्युनिस्ट झाले होते. मेक्सिकोत असलेल्या सोशॅलिस्ट पक्षाचे रूपांतर एम.एन. रॉय यांच्या नेतृत्त्वाखाली रशियाबाहेरच्या पहिल्या कम्युनिस्ट पक्षात झाले व यथावकाश सन्मानपूर्वक त्यांचा रशियातून जगभर कम्युनिस्ट क्रांतीचे विचार पसरविणाऱ्या उच्चस्तरीय नेतृत्त्वात समावेश झाला. लेनिनच्या निकटवर्ती विचारवंतात त्यांची गणना होऊ लागली. स्टॅलिन हा या चळवळीचा प्रमुख झाल्यावर चीनमध्ये क्रांती घडवून आणण्यासाठी रॉय आणि बोरोदिन या दोघांना पाठविण्यात आले होते. पण तो पहिला प्रयत्न फसला. चीनच्या क्रांतीमध्ये अपयश आल्यानंतर रॉय आणि कम्युनिस्ट इंटरनॅशनल यांच्यात धोरणाविषयी मतभेद झाले आणि अधिकृत कम्युनिस्ट चळवळीतून रॉय वेगळे होऊन १९३० साली 'डॉ. मेहमूद' या लटक्या नावाने व वेषांतर करून मातृभूमीला परत आले. लवकरच तेव्हाच्या ब्रिटिश सरकारला त्यांच्या खऱ्या व्यक्तिमत्त्वाचा सुगावा लागला व त्यांना मीरत कट आणि कानपूर कट यांचे मुख्य आरोपी म्हणून सहा वर्षांची तुरुंगवासाची शिक्षा झाली. त्या तुरुंगवासाच्या काळात त्यांनी स्वाध्याय चालूच ठेवला आणि तुरुंगातून बाहेर येताच कॉंग्रेसमध्ये प्रवेश करून राजकीय कार्याला प्रारंभ केला. पुढे वैचारिक मतभेदामुळे कॉंग्रेसचा त्याग करून त्यांनी रॅडिकल डेमोक्रॅटिक पार्टी हा राजकीय पक्ष स्थापना केला.

एक स्वतंत्र राजकीय पक्ष म्हणून रॅडिकल डेमोक्रॅटिक पार्टी १९४०-४१ मध्ये भारताच्या राजकीय क्षितीजावर दिसू लागली असली तरी कॉंग्रेसमध्ये १९३६-३७ मध्ये रॉय यांच्या प्रवेशापासूनच 'लीग ऑफ रॅडिकल कॉंग्रेसमेन' नावाचा गट







अनुक्रमणिका

त्या राष्ट्रीय चळवळीच्या अंतर्गत निर्माण झालेला होता. त्यापूर्वीही रॉय डॉ. मेहमूद बनून १९३० मध्ये भारतात आल्यानंतर रॉय यांच्या विचारसरणीकडे आकर्षित झालेल्या राजकीय कार्यकर्त्यांचा एक समूह मुंबई व अन्य काही ठिकाणी दिसू लागलेला होताच. कम्युनिस्ट, रॉयिस्ट, फॉर्वर्ड ब्लॉक, समाजवादी असे डावे गट काँग्रेसमध्ये त्या काळात होतेच. पाहता पाहता सगळेच बाहेर पडले व त्यांचे लहानमोठे पक्ष निर्माण झाले. रशियात झालेल्या समाजवादी क्रांतीकडे प्रेमादराने पाहणारे हे सगळे होते व आज ना उद्या तशी गरिबांची सत्ता निर्माण करणारी, मार्क्सच्या विचारप्रणालीला अनुसरणारी क्रांती भारतातही होणार, असे सर्वांना वाटत होते. त्या ऐतिहासिक प्रक्रियेत आपणही सहभागी व्हावे अशीच त्यांची दृष्टी होती.

रॉय हे मुळात सशस्त्र क्रांतिकारकांच्या दहशतवादी गटात कार्यरत होते. त्या त्यांच्या ऐन तारुण्यातल्या अद्भुतरम्य कार्यात त्यांनी अनेक धाडसाची कामे पार पाडली होती. त्या काळातले त्यांचे गुरू होते स्वातंत्र्यवीर सावरकर. पण देशाच्या स्वातंत्र्यासाठी या मार्गाने जाण्यात अर्थ नाही याची त्यांना लवकरच जाण आली आणि अमेरिकेतल्या सुसज्ज सार्वजनिक ग्रंथालयाचा उत्तम उपयोग करून त्यांनी मार्क्स, एंगल्स व इतर अनेक ग्रंथकार यांच्या लिखाणाचा पद्धतशीर अभ्यास केला. या स्वाध्यायातून खऱ्या स्वातंत्र्यलढ्याचा मार्ग ते धुंडाळत होते. केवळ गोरे लोक आपल्या देशातून गेले आणि त्यांच्या जागी भारतीय राज्यकर्ते आले की देश स्वतंत्र होतो या वालिश भ्रमातून ते बाहेर पडले. देश म्हणजे देशातला वहुसंख्य मानवसमूह आणि त्या सामान्य, पददलित वहुसंख्यांक गरीब माणसांची वैचारिक, सांस्कृतिक, राजकीय व आर्थिक प्रगती व मुक्ती म्हणजे खरे स्वातंत्र्य या निर्णयाला ते येऊन पोहोचले. राष्ट्र-राष्ट्र म्हणून सतत गहिवरून येणाऱ्या आंधळ्या देशभक्तीपेक्षा ही डोळस राष्ट्रभक्ती त्यांना अधिक महत्त्वाची वाटली. त्यामुळेच जगातल्या सर्व गरिबांना संघटित करून त्यांना लुबाडणाऱ्या भांडवलशाहीचा नाश करू पाहणाऱ्या समाजवादी विचारांकडे ते आकर्षित झाले. मात्र मार्क्सवादाच्या तत्त्वज्ञानातला हा मुख्य गाभा जरी त्यांना पटला होता तरी त्या विचारसरणीतला निरिश्वरवादी व जडवादी विचार त्यांना चटकन स्वीकारावा वाटत नव्हता. आमच्या 'प्राचीन भारतीय संस्कृतीचा जो जगात श्रेष्ठ असा तत्त्वज्ञानाचा वारसा' आहे, असे ते तेव्हा मानत. त्याच्या अहंकारातून तर मुळातला राष्ट्रवाद तेव्हा पोसलेला होता. त्यातून बाहेर पडणे त्यांना जरा कठीण गेले.

बोरोदिन हा रॉय यांचा मित्र त्या काळात त्यांच्यावरोबर होता आणि त्याच्या मार्गदर्शनाखाली रॉय यांनी जडवादाचा भरपूर अभ्यास केल्यावर उरलासुरला मार्क्सवादी तत्त्वज्ञानाचा भागही त्यांना पटला. रशियात असताना भारतामध्ये कम्युनिस्ट विचारसरणीचा प्रचार करण्याचे काम त्यांनीच सुरू केले. जो काही कम्युनिस्ट पक्ष भारतात निर्माण झाला त्याचे श्रेय रॉय यांनाच आहे. पण पुढे रॉय यांचे मॉस्कोतून क्रांती जगभर निर्यात करणाऱ्या कम्युनिस्ट इंटरनॅशनलशी वैचारिक व सैद्धांतिक मतभेद झाले व रॉय या चळवळीतून वाहेर फेकले गेले. तेव्हापासून भारतीय कम्युनिस्टांनी रॉय यांना शत्रुस्थानी मानले यात संशय नाही. पण इतिहास काही पुसता येत नाही.

रॉय हे स्वतंत्र प्रज्ञेचे पंडित होते. मार्क्सवादसुद्धा त्यांनी आंधळ्या भक्तिभावाने स्वीकारलेला नव्हता. मार्क्सवादाची कसून तपासणी अनुभवाच्या पुराव्याने ते सतत करीत असत. त्यामुळेच रशियाच्या मूळपीठाने ठरविलेली धोरणे अयोग्य वाटताच रॉय यांनी त्या धोरणांवर टीका केली. हडेलहप्पी मूळपीठाला ही टीका व स्वतंत्र विचार मानवला नाही. त्यामुळे ते मार्क्सवादाचाच अधिक सखोल अभ्यास करू लागले. त्या अभ्यासात त्यांच्या असे निदर्शनाला आले, की जी आधारभूत विचारसरणी मार्क्सने मांडलेली होती तीच काहीशी सदोष होती.

मानवेन्द्रनाथ रॉय आणि इतर राजकीय नेते यांतला महत्त्वाचा फरक म्हणजे रॉय हे सतत व्यासंग करणारे अभ्यासू पंडित होते. प्रत्यक्ष राजकीय कार्याच्या धावपळीत मग्न असणाऱ्या मंडळींना सहसा न जमणारा हा ज्ञानाचा मार्ग व संशोधनाची वाटचाल रॉय यांनी जन्मभर केल्यामुळे ते सर्वसाधारण इतर राजकीय नेत्यांपेक्षा फार वेगळे होते. त्यामुळेच विचारांच्या क्षेत्रात काही वैशिष्ट्यपूर्ण योगदान रॉय करू शकले व नवमानवतावादाचे तत्त्वज्ञान निर्माण करू शकले.

अमेरिकेत रॉय यांचे वास्तव्य असताना त्याच काळात भारतातून हद्दपार करण्यात आलेले थोर देशभक्त लाला लजपतराय हेही अमेरिकेत विजनवास व्यतीत करत होते. लाला लजपतराय यांच्या सभेत एका श्रोत्याने प्रश्न केला, "का हो? तुम्हाला परकीय लोकांचे सरकार कशासाठी नको आहे? स्वकीय राज्यकर्ते कशासाठी हवे आहेत?" या प्रश्नाने लालाजी चकित झाले. रागारागाने त्यांनी उत्तर दिले, "आम्ही आमच्या स्वराज्याचे काहीही करू. पण परक्यांची हुकुमत आमच्यावर

नको." हा संवाद मानवेन्द्रनाथ रॉय जवळ बसून अर्थातच ऐकत होते. त्यांना तो प्रसंग निभावून देणारे ते लालाजींचे उत्तर पटले नव्हते. कारण प्रश्न अधिक मूलभूत होता. स्वराज्य कशासाठी? माणसाच्या व्यक्तिमत्त्वाला जखडून टाकणारी सर्व बंधने नष्ट करून त्यांचा पूर्ण विकास व्हावा अशी परिस्थिती असणे म्हणजे खरे स्वातंत्र्य ही संकल्पना या मंथनातून त्यांना गवसली. त्यामुळे केवळ राज्यकर्ते बदलले की झाले हे गणित बाजूला पडले. अशा चिंतनांतून व अनेक प्रत्यक्ष अनुभवांतून राजकीय जीवनातून प्रवास करता करता त्यांच्या अध्ययनशील प्रतिभेने अखेर नवमानवतावादाचे जीवनाच्या सर्व अंगांना स्पर्श करणारे असे सर्वंकष तत्त्वज्ञान निर्माण केले. त्याची प्रमुख अशी बावीस विचारसूत्रे रॅडिकल डेमोक्रॅटिक पक्षाच्या १९४६ साली मुंबईत भरलेल्या अखिल भारतीय अधिवेशनात त्यांनी मांडली व त्या तत्त्वज्ञानाची विवेचक मांडणी करणारा द्विखंडात प्रसिद्ध झालेला त्यांचा ग्रंथ रॉय यांच्या १९५४ साली झालेल्या देहावसानाच्या सुमाराला Reason, Romanticism and Revolution या शीर्षकाने बाहेर पडला.

नवमानवतावादाच्या बावीस विचारसूत्रांपैकी पहिल्याच सूत्रामध्ये म्हटले आहे, की व्यक्तिविकास हाच समाजप्रगतीचा खरा मापक होय. राष्ट्र किंवा समाज असा काही सामुदायिक प्रकार व्यक्तींना वगळून असत नाही. व्यक्तिव्यक्तींनी मिळून राष्ट्र बनते किंवा समाज बनतो. म्हणूनच व्यक्तीच्या हितसंबंधांचा त्याग राष्ट्रासाठी किंवा समाजासाठी आवश्यक मानणे योग्य नाही. उलट, राष्ट्राच्या किंवा समाजाच्या प्रगतीचे खरेखुरे प्रतिबिंब त्या राष्ट्रातील व्यक्तींची कितपत प्रगती झाली यातच शोधले पाहिजे. अगोदर व्यक्ती असतात आणि त्यांचा एकत्र निर्देश राष्ट्र किंवा समाज या समुदायवाचक शब्दात होतो. तेव्हा प्राथम्य हे व्यक्तीलाच असले पाहिजे. कोणत्याही अशा समूहवाचक गोष्टीला सामुदायिक आत्मा असतो हे म्हणणे अयोग्य आहे. कारण या तत्त्वाच्या पोटी व्यक्तीच्या बलिदानाचे तत्त्वच पुढे केले जाते.

या सूत्रात मांडलेला विचार इतका उपेक्षित होऊन बसला आहे, की राष्ट्रीय अहंकाराच्या जपणुकीखातर जगातली दोन अत्यंत दारिद्र्यग्रस्त राष्ट्रे आपल्या राष्ट्रातल्या असंख्य दीनदुबळ्या जीवांचा जरासुद्धा विचार न करता अणुशस्त्रास्त्रांच्या मागे धावत सुटली आहेत व दररोज एकमेकांशी युद्ध करत आहेत हे आपण पाहतोच आहोत. ज्या काश्मीरच्या प्रश्नावर गेली पन्नास वर्षे ही दोन राष्ट्रे अटीतटीचा सामना करीत लक्षावधी माणसांचे प्राण खुशाल राष्ट्रदेवतेला अर्पण करीत आहेत आणि अत्यंत मोलाचे कोट्यवधीचे धन चांगल्या, विधायक कामाला लावण्याऐवजी कधीही न संपणाऱ्या युद्धामध्ये नष्ट करीत आहेत, त्या कश्मीरमधल्या माणसांपेक्षा ती भूमी इकडे राहणार की तिकडे याचेच महत्त्व दोन्ही राष्ट्रांना वाटते आहे. हे दृश्य पाहिले म्हणजे राष्ट्र ही गोष्ट राष्ट्रातल्या व्यक्तींपेक्षा मोठी मानली जाते हे उघडच दिसते.

बावीस सूत्रांतले दुसरे सूत्र उत्क्रांतीच्या संदर्भात निर्माण झालेले आहे. स्वातंत्र्याची अन्वेषणा आणि सत्याचा शोध या माणसाच्या प्रगतीच्या मूलभूत प्रेरणा आहेत. उत्क्रांती होताना शरीरपिंड जगण्याची धडपड करीत असतो. त्या प्रयत्नात मनुष्यप्राणी हा प्रगत असल्यामुळे त्याच्या जगण्याची धडपड इतर प्राण्यांपेक्षा अधिक उच्च पातळीवर म्हणजे बुद्धी आणि भावनेच्या पातळीवर सुरू झाली की, माणसाला स्वातंत्र्याची भूक लागते. त्या स्वातंत्र्याच्या शोधातच सत्याचाही शोध सुरू असतो. सत्य म्हणजे ज्ञानाचा गाभा असतो आणि ज्ञानाच्याच उपयोगाने माणूस निसर्गाच्या जुलमातून आणि भौतिक व सामाजिक बंधनातून क्रमाक्रमाने मुक्त होत स्वातंत्र्याचा लाभ घेऊ लागतो. अज्ञानाचा अंधकार जिथे दाटून आलेला असतो तिथे सत्य दडून बसलेले असते आणि स्वातंत्र्याचा पत्ताच नसतो. जगात सर्व मागासलेल्या देशांत जो स्वातंत्र्याचा दुष्काळ पडलेला दिसतो त्याचा उगम याच सूत्राने स्पष्ट होतो. मग कवी वसंत बापट प्रश्न करतात : स्वातंत्र्य? कुणा स्वातंत्र्य? कुठे स्वातंत्र्य? भारताला तथाकथित स्वातंत्र्य मिळाल्याला अर्धशतक उलटल्यानंतरही खऱ्या स्वातंत्र्याचा सूर्योदय अजून दूर असावा याचा दुसरा काय अर्थ करावा? देश स्वतंत्र पण देशवासी मात्र स्वातंत्र्यापासून दूर आहेत.

नवमानवतावादाचे प्राणतत्त्व म्हणजे स्वातंत्र्यसंकल्पना. म्हणूनच बॅ.वि.म. तारकुंडे यांच्या अमृतमहोत्सवप्रसंगी प्रसिद्ध झालेल्या लेखसंग्रहाचे शीर्षक आहे : For Freedom. तिसऱ्या सूत्रात या स्वातंत्र्यकल्पनेची व्याख्या दिली आहे: 'व्यक्तीच्या ठायी वसत असणाऱ्या शक्तींच्या विकासावरील बंधनांचा सतत वाढत जाणारा निरास म्हणजेच स्वातंत्र्य होय.' व्यक्ती म्हणजे मनुष्यप्राणीच असतात. म्हणूनच सामाजिक संस्थांच्या स्वातंत्र्यप्रवणतेचे मोजमाप या व्यक्तींच्या विकासाच्या मोजमापानेच करावे लागणार. या व्याख्येवर एक टीका करणे शक्य आहे, की ती 'बंधनांचा निरास' अशा नकारार्थी भाषेत स्वातंत्र्याची संकल्पना मांडते. पण स्वातंत्र्य हे प्रत्यक्षात उमलून येईल तेव्हा त्या व्यक्तीचे सांस्कृतिक जीवन कोणकोणत्या

क्षेत्रांत व किती उंच भरारी मारणार आहे याची व्याख्या कशी करता येईल? मूल वाढत असताना त्याला चांगली शाळा, महाविद्यालय, चांगले शिक्षक, ग्रंथालय व अनुकूल वातावरण तुम्ही उपलब्ध करू शकाल; पण त्या सर्वांचा लाभ घेऊन ते मूल प्रत्यक्षात कसे घडेल याचा आराखडा कोण देऊ शकेल? म्हणूनच स्वातंत्र्य मिळण्याच्या मार्गात येणारी बंधने नष्ट करून सर्व अनुकूलता निर्माण करणे याचाच विचार करता येतो.

आणि कोणी सांगावे, कदाचित सर्व अनुकूलता असून स्वातंत्र्याचे बीज अंकुरेल की नाही? सुखसमृद्धी असलेल्या घरातली सगळीच मुले कुठे चमकतात? त्या परिस्थितीचे वर्णन करणारे इंग्रजी वचन प्रसिद्ध आहे : You can take a horse to water, but you can't make him drink. तेव्हा अडचणी दूर करणे एवढेच शक्य आहे. त्यातून निष्पत्ती काय होणार याची खात्री देता येणार नाही. पण सर्वसाधारणतः अनुकूल वातावरणात सुप्त गुणांचा विकास होईल असे मानले पाहिजे.

चौथे सूत्र फार महत्त्वाचे आहे. मनुष्य स्वभावतःच बुद्धिप्रधान आहे हे ते सूत्र असून या बुद्धिप्राधान्याचे मूळ नियमबद्ध निसर्गाच्या कुशीत माणसाचा उदय झालेला असतो या गोष्टीत सापडते. कारण बुद्धी हाही जीवनधर्मच असतो, तसाच भावना हाही जीवनधर्मच असतो. भावनेतून स्फुरणारी इच्छाशक्ती व तिचे स्वातंत्र्य त्यामुळेच ऐतिहासिक नियतिवादाशी विसंवादी किंवा विरोधी नसते. उत्क्रांतीच्या प्रक्रियेतच बुद्धी, भावना, इच्छाशक्तीचे स्वातंत्र्य या सर्व गोष्टींचा जीवसृष्टीत उगम असल्यामुळे त्या एकमेकांशी सुसंगत ठरतात. ऐतिहासिक नियतिवाद म्हणजे नैसर्गिक प्रक्रियेत या सर्व गोष्टी निश्चित होतात. नियमबद्ध असा हा इतिहासाचा क्रम असतो. माणसात बुद्धी ही अत्यंत प्रगत स्वरूपात असल्यामुळेच तिचे उन्नत स्वरूप मानवी उच्चतर भावनेत व उच्चतर अशा इच्छाशक्तीत दिसून येते. जे जे घडते ते ते सर्व निसर्गाच्या नियमांना धरूनच घडते. दैवी किंवा पारलौकिक शक्तींनी घटना घडत नसतात. जीवशास्त्रीय उत्क्रांतीतच या सर्व गोष्टींचा उगम शोधता येत असल्याने त्या घटनेत कसलेही गूढ सापडत नाही. प्राण्यांमध्ये सापडणाऱ्या अर्धस्फुट बुद्धीचे, भावनांचे व इच्छाशक्तीचेच अधिक विकास पावलेले स्वरूप मानवी व्यवहारांत दिसून येते. मानवी बुद्धीने धारण केलेले विकसित रूप निश्चित करण्याचे काम नियत स्वरूपाचा इतिहासक्रमच करत असतो.

पाचवे सूत्र इतिहासाच्या आर्थिक उपपत्तीविषयी आहे. मार्क्सवादाने असे प्रतिपादिले, की इतिहास हा आर्थिक घडामोडींनी निश्चित होतो. असे मानण्यात एक अडचण अशी येते, की भौतिकवाद हा एकाच कारणाने म्हणजे आर्थिक कारणाने इतिहास घडतो असे एकीकडे म्हणतो; पण दुसरीकडे भौतिक गोष्टींमध्येच मोडणाऱ्या मन आणि बुद्धी या गोष्टींचाही हात इतिहासाच्या जडणघडणीत असतो. म्हणजेच एकापेक्षा अधिक कारणांनी इतिहासक्रम निश्चित होतो असे भौतिकवादातून निघते. वस्तुस्थिती अशी आहे, की इतिहासक्रम हा अनेक कार्यकारणांच्या नियमांनी बद्ध असतो. त्यात मानवी इच्छाशक्ती हा एक महत्त्वाचा घटक असतो. अर्थातच आर्थिक हेतूशी इतिहासक्रमाचा साक्षात संबंध नेहमीच जोडता येत नाही.

सहावे सूत्र हे कल्पना व विचार यांच्या निर्मितीसंबंधी आहे. माणसाच्या मनातच निर्माण होणारी गोष्ट म्हणजे कल्पना आणि विचारसरणी. मानवी देहात जे मन आहे त्या मनाचेच हे खेळ असतात. निर्माण होण्याची जागा जरी मन असले तरी ते विचार पुढे कसे विकसित होतील हे त्या विचारांच्या गतिशास्त्राने ठरते. विचार निर्माण करणाऱ्या मनाचा त्यांच्या पुढच्या हालचालीवर अधिकार चालत नाही. जसे मूल निर्माण करणाऱ्या मातेचा मुलाच्या नंतर निर्माण होणाऱ्या आयुष्यक्रमावर काही अंकुश चालत नाही, तसे कल्पना आणि विचार हे पुढे ते निर्माण करणाऱ्या मनाच्या कह्यात नसतात. कारण एकदा कल्पना अथवा विचार निर्माण झाले म्हणजे ते पृथक्पणे राहतात; आणि त्यांचा व्यापार त्यांच्या स्वतंत्र नियमांनीच चालतो.

विचारांच्या विकासक्रमावरोबर एकीकडे सामाजिक विकासही होतच असतो. या दोन गोष्टींचा विकास एकाच वेळी होत असतो. हे दोन्ही विकास आपापली पावले टाकत असताना एकमेकांशी पावले जुळवीतही चाललेले असतात. त्यांचा प्रभाव एकमेकांवर पडत असतो. मार्क्सवादाने ठासून मांडलेले तत्त्व येथे लटके पडते. मार्क्सवादाचा एक मूलभूत सिद्धान्त असा आहे, की आर्थिक व्यवस्थेच्या प्रस्थापित सांगाड्यावरच विचारांचा डोलारा म्हणजे संस्कृतीचे आकृतिबंध व नैतिक मूल्ये आधारलेली असतात. पण हे खरे नाही. खरे तर संस्कृती व नैतिक मूल्ये यांनाही विशिष्ट ऐतिहासिक नियम आहेत आणि त्यांचा इतिहास विचारेतिहासाच्याच तर्कशास्त्राने बद्ध असतो. Being determines conscioussness हे एक रॉयच्या प्रतिपादनात नेहमी येणारे पालुपद कित्येक वर्षे होते. अर्थात त्या काळात ते मार्क्सवादाच्या प्रभावाखाली होते.




अनुक्रमणिका



तेच त्यांचे नेहमी येणारे प्रतिपादन मार्क्सवादापलीकडे गेल्यावर आपोआप बंद झाले. रॉय हे एक प्रभावी व्यक्तिमत्त्व होते हे ज्यांनी त्यांना प्रत्यक्ष पाहिलेले होते ते लगेच मान्य करतील. पण जरी ते ज्या त्या वेळी त्यांना पटलेले असेल ते ठासून आणि शब्दांवर जोर देऊन मांडत असत तरी नव्या ज्ञानाच्या प्रकाशात त्यांच्या विचारात पुष्कळ बदल होत असत आणि तसे बदलणे खऱ्या ज्ञानमार्गी माणसाला अटळ असते. या गोष्टीचा विचार करून तर असे म्हटले जाते, की नदीच्या वाहत्या पाण्यात म्हणजे त्याच पाण्यात आपण दोनदा हात घालू शकत नाही. रॉय यांच्या अभ्यासकांनी हे नेहमी लक्षात ठेवले पाहिजे.

सातवे सूत्र असे सांगते, की स्वातंत्र्याचे नवे जग निर्माण करण्यासाठी जी क्रांती आवश्यक असते ती होण्यासाठी केवळ आर्थिक पुनर्घटना पुरेशी नाही. मार्क्स म्हणतो, त्याप्रमाणे दलित आणि पिळल्या जाणाऱ्या वर्गाच्या नावाने राजकीय सत्ता हस्तगत करून उत्पादनाच्या साधनाची खाजगी मालकी नष्ट केली म्हणजे स्वातंत्र्ययुगाचे आगमन आपोआपच होते असे नाही. ही गोष्ट रशिया आणि चीनमध्ये अशा क्रांतीनंतर जे काही घडले त्यावरून स्पष्ट दिसून येते. तेथे उत्पादनाच्या साधनांवर होती ती खाजगी मालकी नष्ट झाली पण त्यामागोमाग स्वातंत्र्य काही आले नाही. उलट, जुलूम करणाऱ्या हृदयशून्य हुकुमशाहीचा नंगानाच सुरू झाला.

आठवे सूत्र असे सांगते, की कम्युनिझम किंवा समाजवाद हे स्वातंत्र्यध्येयाच्या सिद्धीचे साधन होऊ शकते असे मानले तरी ही गोष्ट अखेरपक्षी अनुभवावरून पडताळून पाहिली पाहिजे. राष्ट्र किंवा वर्ग असा काही सामूहिक स्वरूपाचा 'अहंकार' श्रेष्ठ मानून जित्याजागत्या माणसाला डावलण्यातून जी राजकीय व आर्थिक व्यवस्था निर्माण होते, त्यात स्वातंत्र्यसिद्धी प्राप्त होत नाही. कारण स्वातंत्र्याचा नाश स्वातंत्र्याकडे नेईल हा भ्रम आहे. केवळ काल्पनिक अशा सामूहिक अहंकाराच्या देवतेपुढे व्यक्तीचा बळी देणे हे स्वातंत्र्य नक्कीच नाही. या विचारसरणीतून प्रगती अशक्य होते.

नववे सूत्र असे सांगते, की वास्तवात राज्यसत्ता कम्युनिझममध्ये क्रमाक्रमाने आपोआप विरून जाईल या दिवास्वप्नाचा निकाल लागला आहे. खरोखरी ज्या तऱ्हेचे सामाजिक मालकीच्या उद्योगधंद्यांवर अधिष्ठीत असे आर्थिक नियोजन करावयाचे असते त्यासाठी जबरदस्त राज्ययंत्राची आवश्यकता असते. अशा जोरकस राजकीय यंत्रणेवर लोकसत्तेचे नियंत्रण असल्याशिवाय नव्या व्यवस्थेत स्वातंत्र्याची निश्चिती कशी होणार? लोकसत्ता आणि वैयक्तिक स्वातंत्र्य यांच्याच पायावर आर्थिक नियोजन उभे करता आले पाहिजे. त्याशिवाय जनतेच्या गरजा भागविण्यासाठी उत्पादन हा हेतू साध्य होणार नाही. दहावे सूत्र असे सांगते की, धंद्याचे राष्ट्रीयीकरण व आर्थिक नियोजन या दोन गोष्टींमुळे कामगारांची पिळवणूक आपोआप थांबेल आणि संपत्तीचे समान वाटपही होईल याची हमी देता येत नाही. आर्थिक लोकशाही नसेल तर ज्याप्रमाणे राजकीय लोकशाही प्रस्थापित होणे शक्य नाही, त्याप्रमाणेच जर राजकीय लोकशाही नसेल तर आर्थिक लोकशाही देखील प्रस्थापित व्हावयाची नाही. या सूत्राचे प्रत्यक्ष प्रमाण रशिया व चीन या दोन देशांमध्ये जे व्यवहार झाले त्यांमध्ये सापडते. अनेक वर्षे रशियातल्या सरकारने प्रसिद्ध केलेल्या आकडेवारीवर विश्वासून जगभरच्या समाजवादी मंडळींनी असे मानले, की रशियात सामान्य माणसाच्या जीवनात सुखसमृद्धी व समाधान निर्माण झाले आहे. पण हा भ्रमाचा भोपळा स्टॅलिनच्या मृत्यूनंतर ज्या गोष्टी बाहेर आल्या त्यामुळे फुटला. अशी जगाची फसवणूक आणि खुद्द रशियन समाजाचीही घोर वंचना शक्य झाली याचे कारण राजकीय लोकशाहीच्या अभावातच शोधता येते. अखेर कडेलोट झाल्यावर आणखी काही वर्षांनी रशियाचे विभाजनसुद्धा थांबवणे शक्य झाले नाही. चीनमध्येसुद्धा स्वातंत्र्यावरची बंधने तिथले हुकुमशहा अजून किती काळ तशीच ठेवू शकतील याची शंकाच आहे.

अकरावे सूत्र सांगते, की हुकुमशाही एकदा प्रस्थापित झाली, की ती कायमची होऊ पाहते. त्यासाठी सबबी पुढे केल्या जातात : कामाचा उरक, सामुदायिक प्रयत्न आणि सामाजिक प्रगती. या पद्धतीने राजकीय हुकुमशाहीच्या छत्राखाली चालणारे आर्थिक नियोजन हे व्यक्तिस्वातंत्र्याची अवहेलना करते. त्यामुळे समाजवादी रचनेत उच्च प्रतीची लोकशाही प्रस्थापित होते ही एक कपोलकल्पित कथाच ठरते आणि हुकुमशाही स्वतःच्या घोषित ध्येयांना हरताळ फासत असते.

बारावे सूत्र सांगते, की संसदीय लोकशाहीमध्ये प्रतिनिधी निवडून त्यांना सत्तेवर बसवण्याचा प्रकार हा नावापुरताच लोकशाहीचा व्यवहार असतो. खरोखरीची प्रभावी लोकशाही ही सत्ता नेहमी निरपवादपणे जनतेच्याच हाती स्थिर ठेवते. सार्वभौम सत्ता जनतेलाच, अधूनमधून नव्हे तर सतत व रोजच्या रोज प्रभावीपणे वापरता यावी यासाठी उपाययोजना झाली पाहिजे. एकमेकांपासून विभक्त झालेल्या नागरिक व्यक्ती प्रत्यक्षात असमर्थ बनत असतात; कारण आपले सार्वभौम अधिकार अमलात आणण्याचे व राज्ययंत्र सतत

ताब्यात ठेवण्याचे व चालवण्याचे आवश्यक असे कोणतेही साधन त्यांच्या हाती नसल्याने त्या अगदीच दीन बनलेल्या असतात.

तेरावे सूत्र असे आहे, की उदारमतवाद लोकशाहीत नकली होऊन बसतो व खरे तर त्याचे पुरते विडंबन होते. तथाकथित खुल्या भांडवलशाहीत माणूस माणसाची जी पिळवणूक करतो त्या पिळवणुकीला कायदेशीरपणा प्रदान करण्याचा उद्योग खुल्या व्यापाराच्या तत्त्वाने उदारमतवाद करीत आला आहे. अर्थ हा मानवाचा एकमेव पुरुषार्थ मानणारा विचारच व्यक्तिवादाच्या विमोचक तत्त्वाला निष्प्राण करतो. अर्थप्रधान मनुष्य एक तर गुलाम बनतो किंवा तो फार तर गुलामांचा धनी असतो. मनुष्य अर्थप्रधान ठरवण्याची ग्राम्य कल्पना टाकून देऊन तो बुद्धिप्रधान व म्हणूनच नीतिविचारी असतो हे ध्यानात ठेवले पाहिजे. नीती म्हणजेसुद्धा विवेकबुद्धीला आवाहन असते आणि विवेकबुद्धी म्हणजे परिस्थितीची साहजिक जाणीव आणि परिस्थितीला अनुसरून होणारी प्रतिक्रिया असते. बुद्धीच्या पातळीवर घडणारी जीवपिंडाची यांत्रिक क्रिया म्हणजे विवेकबुद्धी आणि म्हणूनच विवेकबुद्धी बुद्धिनिष्ठ असते.

चौदावे विचारसूत्र खरी लोकशाही प्रस्थापित कशी करता येईल याचा विचार करते. हुकुमशाही हा काही प्रतिनिधीप्रधान लोकशाहीचा पर्याय खासच नाही. आधुनिक समाजपद्धतीतील तुटक आणि म्हणूनच दुर्बल अशा व्यक्तींच्या प्रतिनिधीप्रधान लोकशाहीच्या जागी संघटित लोकशाही स्थापणे हाच त्या वेगडी लोकशाहीचा पर्याय आहे. देशभर स्थापिलेल्या जनसमित्यांचे जाळे विणून सुसंघटित लोकसत्ता अस्तित्वात आणली पाहिजे व या लोकसत्तेच्या पायावर पिरॅमिडच्या धर्तीवर निमुळता होत जाणारा मनोरा उभारून त्या सुस्थिर मनोऱ्याचे शिखर शोभणारी संसद अस्तित्वात आली पाहिजे. अशा रचनेमुळे समाजाची राजकीय संघटना (राज्य) सर्व समाजाशी एकरूप होईल आणि राज्यावर लोकसत्तेचे निरंतर नियंत्रण राहील. 'लोकशाही धड चालत नाही तेव्हा हुकुमशाही आली पाहिजे', असे वैतागाने म्हणणाऱ्या मंडळींना वास्तवात येऊ शकेल असा विधायक पर्याय संघटित लोकशाहीमुळे उपलब्ध होतो हे माहीत नसते. या पर्यायात सर्वात महत्त्वाचे स्थान ग्रामसमित्यांना आहे. आपापल्या घरी बसून नुसती वांझ टीका करण्यात काही अर्थ नाही. लोकसमित्या कार्यरत केल्या पाहिजेत.

पंधरावे सूत्र असे सांगते, की मानव हाच स्वतःच्या विश्वाचा शिल्पकार आहे. मानव हा विचारशील प्राणी आहे व ही विचारशीलता तो व्यक्तित्वसंपन्न राहिला, तरच दिसून येईल. माणसाचे मेंदू हे एक उत्पादनाचे साधन असून तो क्रांत्या होण्यापूर्वी रूढ कल्पनांचा विध्वंस करणाऱ्या विचारांची निर्मिती करतो. त्यामुळे ज्यांना आपल्या सर्जनशील आत्मशक्तीचा प्रत्यय आलेला आहे, विश्वाची नवरचना करण्याच्या दुर्दम्य इच्छाशक्तीने जे प्रेरित झालेले आहेत, साहसी विचारांनी जे गतिमान झाले आहेत आणि स्वतंत्र मानवांचा बनलेला स्वतंत्र समाज निर्माण करण्याच्या ध्येयाच्या ध्यासाने जे चेतले आहेत असे संख्येने सतत वाढत जाणारे लोकच, लोकशाही नांदेल अशी परिस्थिती निर्माण करू शकतात. विश्वाच्या शिल्पकाराच्यापुढे ही कामगिरी असते. अशा शिल्पकाराला शोधण्यासाठी जिताजागता माणूस सोडून अन्यत्र जावे लागत नाही.

सोळावे सूत्र सामाजिक नवजीवन करण्याचा मार्ग उघड करून सांगते. खंबीर आणि व्यापक प्रयत्न करून लोकांना स्वातंत्र्याची तत्त्वे आणि बुद्धिवादी व सहकार्याची राहणी यांचे शिक्षण देणे हाच तो मार्ग होय. यासाठी जनतेच्या कार्यक्षम अशा लोकशाही संघटना तयार कराव्या लागतील. नवजीवनाचे रहस्य आत्मसात केलेल्या लोकांची संख्या त्वरेने वाढवणे आणि जनतासमित्यांचा जलद प्रसार करून या दोन्हीमध्ये एकसूत्रीपणा निर्माण करणे या गोष्टी सामाजिक क्रांतीला आवश्यक आहेत. क्रांतीच्या कार्यक्रमाची उभारणी स्वातंत्र्य, बुद्धिवाद आणि सामाजिक संवाद या तत्त्वांवरच होऊ शकते. त्यामध्ये जे सामाजिक नियंत्रण अटळ असते त्यात सर्व प्रकारची मक्तेदारी व पक्षपाती हितसंबंधांचे निर्मूलन अभिप्रेत आहे. सतरावे सूत्र आर्थिक पुनर्घटनेचा विचार मांडते. मानवी पिळवणूक अशक्य करणारी आर्थिक पुनर्घटना समाजामध्ये घडल्याशिवाय मूलगामी लोकसत्ता येणे शक्य नाही. व्यक्तींच्या बौद्धिक व इतर सूक्ष्म शक्तींचा आविष्कार व्हावयाचा असेल तर प्रथम माणसांच्या भौतिक गरजांची वाढत्या श्रेणीने तृप्ती करणे आवश्यक आहे. राहणीचे मान सतत वाढवत नेणारी ही आर्थिक पुनर्घटना असेल व त्या पायावरच मूलगामी लोकसत्ता उभी राहील. आर्थिक बंधनांतून जनतेची मुक्ती होण्याने ती स्वातंत्र्याकडे जाईल. इथे मार्क्सने पाहिलेले स्वप्नच साकार होताना दिसेल.

अठरावे विचारसूत्र मानवतावादी अर्थशास्त्राचा तपशील पुरवते. सर्व उत्पादन हे उपयोगासाठीच करावयाचे आणि त्याचे वाटप मानवी गरजा भागविण्यासाठीच असेल. बुद्धी व विज्ञान






यांवर हा नवा समाज आधारलेला असल्याने आर्थिक नियोजन करणे हे अपरिहार्य असले तरी ते व्यक्तीचे स्वातंत्र्य हा उद्देश ठेवूनच केले पाहिजे. ज्ञानाचा सार्वत्रिक प्रसार आणि कमीत कमी नियंत्रणे ठेवून वैज्ञानिक सर्जनशील प्रवृत्तींना व प्रयत्नांना अधिकाधिक वाव व प्रेरणा देण्यावर नवसमाजरचनेची संस्कृती उभारली जाईल. एकोणिसावे सूत्र राजकीय दृष्ट्या मूलगामी लोकसत्तेचे ध्येय कसे साध्य होऊ शकेल याचे वर्णन करते. बुद्धीवरील वंधने तोडून टाकून आत्मिकदृष्ट्या स्वतंत्र झालेली माणसे जेव्हा स्वातंत्र्याचे जग निर्मिण्याच्या दृढ निश्चयाने एकत्र येतील तेव्हाच त्यांच्या सामुदायिक प्रयत्नांनी मूलगामी लोकसत्तेचे ध्येय साध्य होईल. ते जनतेचे मार्गदर्शक, मित्र व तत्त्वज्ञ असतील. त्यांचे राजकीय वर्तन व कार्य बुद्धिप्रधान व म्हणूनच नैतिकही असेल. सर्वत्र विकेंद्रीकरण हा त्यांचा उद्देश राहील; कारण सत्तेचे केंद्रीकरण आणि स्वातंत्र्य या विसंगत गोष्टी आहेत.

विसावे विचारसूत्र नागरिकांचे शिक्षण या संकल्पनेचे महत्त्व स्पष्ट करते. स्थानिक जनसमित्या या नागरिकांच्या आणि राजकारणाच्या शिक्षणाच्या आधुनिक पाठशाळाच असतील. अशा पाठशाळा अनासक्त व्यक्तींना समाजकार्याची धुरा वाहण्याला समर्थ वनवतील. ज्यांच्या आत्म्यावरील वंधने उद्ध्वस्त झाली आहेत अशी सत्तारूढ माणसेच गुलामगिरीच्या वेड्या तोडून सर्वांना स्वातंत्र्याचा लाभ घडवतील.

एकविसावे सूत्र म्हणते, की मूलगामीवाद (Radicalism) विज्ञानास समाजसंघटनेचे अंग वनवतो. तो व्यक्ती आणि समाज यांतील विसंवाद संपवतो आणि स्वातंत्र्यकल्पनेत नैतिक, बुद्धिवादी आणि समाजपरायणतेचा आशय भरतो. या मूलगामीवादात जशी विचारांची गतिमीमांसा (Dynamics of Ideas) असेल तसाच त्यांत आर्थिक नियतीवादाचा विरोधविकासही (Dialectics of Economic Determinism) असेल. थोडक्यात, या मूलगामी वादातच विचारांची गतिमानता आणि आर्थिक प्रगतीची सांगड घातली जाईल.

वावीसावे विचारसूत्र असे बजावते, की मानव हाच प्रत्येक गोष्टीचे मूल्यमापन करण्याचा मानदंड आहे (प्रोटॅगोरस) आणि मानव हाच मानवसमूहाचे मूळ आहे (मार्क्स). मूलगामीवादाचा सिद्धान्त या दोन तत्त्वांपासूनच सुरू होतो. अंतर्विश्वामध्ये विमुक्त (पारलौकिक कल्पनांच्या जंजाळातून वर आलेल्या) आणि नीतिवान अशा माणसांच्या सामूहिक प्रयत्नांच्या वळावर जग म्हणजे 'स्वतंत्र माणसांचे एकराज्य व वंधुसमूह' असे होईल, असे हा वाद प्रतिपादतो. याचा अर्थ पूर्ण आत्मिक व नैतिक स्वातंत्र्यावरच मूलगामीवाद उभा असतो.

या सूत्रांवर आधारलेले आचरण करण्याचा मार्ग म्हणजे सत्तेसाठी झगडणारे राजकीय पक्ष हे स्वातंत्र्यसंपादनाचे साधन नव्हेत हे पक्के ध्यानात धरावे. सत्ताकलहावाहेर राहून लोकशाहीत अभिप्रेत असलेल्या सांस्कृतिक मूल्यांचे आवश्यक शिक्षण जनतेला देणे हे मुख्य कार्य राहील. हे मूलभूत कार्य वराच काळ करीत राहावे लागणार आहे. तसेच आवश्यक लोकशाही संस्था निर्माण करण्याचा प्रयत्न नवमानवतावादी चळवळ करील. या आंदोलनातून नव्या विचारांचे स्त्री-पुरुष निर्माण होतील. आता अनुयायांच्या संख्येवरून चळवळीचे वरोवर मूल्यमापन होणार नाही. स्वातंत्र्यलालसा, बुद्धिवादी दृष्टिकोन आणि ऐहिक विचारांवर आधारलेली नैतिकता यांचा जनतेत किती प्रसार झाला आणि राज्यसंस्थेवर किती परिणाम दिसून येत आहे यावरच ती अवलंबून राहील. राज्यघटनेच्या आराखड्यात जनतासमित्या हा या नव्या राज्याचा पाया असेल. पंचायत राज्याचा अलीकडे होणारा उद्घोष हे एक नवे प्रसादचिन्ह म्हटले पाहिजे. या समित्या लोकशिक्षणाचे कार्य करणारी विद्यालयेच होत. त्याचप्रमाणे त्या लोकांचा सार्वभौम अधिकार प्रत्यक्षात आणणारी साधने वनतील. जसजशी ही चळवळ नव्या विचारांनी भारलेल्या संगणकयुगातील नवतरुण-तरुणींमधल्या जागरूक नेतृत्त्वाच्या हाती जाईल तसतशी आज दिसणारी मरगळ निघून जाईल आणि खूप उशीर झालेली २१व्या शतकाची नवजीवनाची चळवळ या मध्ययुगीन भारतीय मानसात एक दिवस रुजल्याखेरीज राहणार नाही. या कार्यक्रमाची तपशीलवार चर्चा जिज्ञासूंना मूळ कार्यक्रम १९४८ साली रॅडिकल पक्ष वरखास्त झाला त्यावेळीच तयार केलेला आहे, त्यात पाहता येईल.

❖❖❖

एषः पन्था ।
एतत् कर्म ।
नान्यः पन्था
विद्यते अयनाय ।

असे अनेकदा वाटते पण असे कधी नसते,
मानवाच्या मुक्तीचा हा एक निरंतरचा शोध असतो.
- देवदत्त दाभोलकर

# रॉय आणि गांधी

मे० पुं० रेगे

रॉय हे मार्क्सवादाच्या पठडीतून आणि मानवी इतिहासातील अखेरची क्रांती घडवून आणण्याच्या कार्याला वाहून घेतलेल्या कम्युनिस्ट पक्षाच्या कार्यपद्धतीतून आणि कठोर शिस्तीतून गेले होते. कांटनंतरचे तत्त्वज्ञान कांटवादी नसेल, पण कांटवादाशी मुकाबला करूनच ते घडलेले असले पाहिजे, असे जे कांटविषयी म्हणण्यात येते, ते मार्क्सनंतरचे सामाजिक तत्त्वज्ञान आणि मार्क्स ह्यांच्या बाबतीतही सत्य आहे. मागासलेल्या राष्ट्रांतील लोकांना मार्क्सवादाचे स्वाभाविक आकर्षण असते. कारण मार्क्सवादापासून त्यांना अनेक लाभ मिळतात. मानवी संस्कृतीच्या मध्यवर्ती इतिहासाची कल्पना आपण केली, तर ह्या इतिहासात कधीच स्थान न मिळालेली किंवा स्थान मिळूनही ते टिकवून धरण्याचे कर्तृत्व दाखवू न शकलेली ही राष्ट्रे होत, असा ठपका त्यांच्यावर असतो. पण मार्क्सने साऱ्याच मानवी इतिहासाला व म्हणून मानवजातीला काही मूलभूत नियमांच्या एका सूत्रात गोवले. संस्कृती म्हणजे भौतिक विज्ञाने, तत्त्वज्ञान, कला, नैतिक संकल्पना, मूल्ये इत्यादी ही उत्पादनतंत्रे, उत्पादनपद्धती ह्यांच्या आधारावर उभी राहिलेली एक दुय्यम रचना असते, ह्या मार्क्सच्या सिद्धान्तामुळे मागासलेल्या लोकांना काही दिलासा मिळू शकतो. मानवी संस्कृतीच्या विकासात आपण निर्मितीशील भाग घेऊ शकलो नाही ह्याची जबाबदारी उत्पादनपद्धतीवर टाकता येते; आणि उत्पादनतंत्रे अविकसित राहिली ह्याचीही भौतिक, ऐतिहासिक कारणे शोधून काढता येतात. आपण मागासलेले राहिलो याचे कारण आपल्यातच कर्तृत्वाचा, कल्पकतेचा, प्रयत्नशीलतेचा अभाव होता ह्या जाणिवेतून जी नाउमेद करणारी न्यूनत्वाची भावना निर्माण होते, तिच्यातून मार्क्सवादाने अविकसित प्रदेशातील लोकंना मोकळे केले. एवढेच नव्हे तर, मानवाच्या ऐतिहासिक प्रगतीचे निरपराध, ट्रॅजिक बळी अशी प्रतिष्ठाही त्याना प्राप्त करून दिली. पाश्चात्त्यांच्या वैभवाने संस्कृतीच्या सर्वच क्षेत्रातील त्यांच्या वरचढपणामुळे आशिया आफ्रिकेतील मनाने खचलेल्या लोकांना त्यांचे नीतिधैर्य परत दिले. कारण पाश्चात्त्यांचे वैभव अन्यायाने, अनैतिकतेने ग्रासलेले वैभव होते. उलट पिळवणुकीचे, पाशवी सामर्थ्याचे बळी ठरलेल्या लोकांभोवती नैतिकतेचे वलय निर्माण झाले होते.

मार्क्सवादामुळे मागासलेल्या जनसमूहांना त्यांचा स्वाभिमान परत मिळाला, इतकेच नव्हे तर, त्यांना आशाही मिळाली. इतिहास त्यांच्या बाजूचा होता. इतिहासाच्या पोलादी नियमांमुळेच अंतिम जय त्यांचा होता हे निश्चित होते. आपल्या कर्तृत्वाचा पुरावा म्हणून काल्पनिक वैभवशाली भूतकाल रंगवायचे कारण त्यांना उरले नाही; उज्ज्वल भविष्याची स्वप्ने रंगवून ती प्रत्यक्षात उतरावयाच्या कार्याला लागणे त्यांना शक्य झाले. पण ह्याचा एक परिणाम असा झाला की, आपल्या समाजाची भूतकालातील किंवा वर्तमानकालातील वास्तव परिस्थिती स्वतःपासून दडवून ठेवण्याचेही कारण त्यांना उरले नाही. आपले दारिद्र्य, अज्ञान, सामाजिक विस्कळितपणा, स्वार्थ आणि भ्रष्टाचार स्थिरपणे न्याहाळणे त्यांना 'शक्य' झाले. कारण युरोपीय लोक सतत म्हणत असत त्याप्रमाणे ही परिस्थिती आपल्या जन्मजात नैतिक कमकुवतपणामुळे निर्माण झाली असल्यामुळे अटळ नव्हती. विशिष्ट ऐतिहासिक शक्तींचा तो परिपाक होता आणि ही सारी परिस्थिती बदलून टाकायचा मार्गही मोकळा होता.

मार्क्सने आणखी एक गोष्ट केली. साऱ्या जनसमूहांना मानवी संस्कृतीच्या प्रवाहात प्रविष्ट केले. मार्क्सवाद श्रमजीवी वर्गाच्या वर्गीय जाणिवेवर भर देतो आणि वर्गीय अस्मिता, श्रमजीवी वर्गाशी एकरूप होणे, ह्या वर्गाचा घटक असण्याचा अभिमान बाळगणे हा ह्या जाणिवेचा एक महत्त्वाचा घटक आहे. पण वर्ग हे मानवजातीचे, मानवजातीमध्ये पडलेले आणि मानवजातीमध्ये सामावलेले असतात. अखेरीस वर्गविहीन मानवजातीमध्ये साऱ्याच वर्गांचे विसर्जन होणार आहे. त्यामुळे इतिहासात विकसित झालेले सारे सांस्कृतिक धन हा मानवजातीचा सामायिक वारसा आहे. प्राचीन ग्रीक किंवा भारतीय शिल्प, रेनेसांची उत्तुंग कला, भांडवलशाही विज्ञान-तंत्रज्ञान व त्यामुळे शक्य झालेली सुबत्ता, जर्मन तत्त्वज्ञान - माणसांनी कष्ट, रक्त, अश्रू ह्यांची अमाप किंमत देऊन साधलेल्या ह्या निर्मिती आहेत. त्या एकांगी असतील, विकृत

अनुक्रमणिका






असतील आणि पिळवणुकीची घनदाट काळी बाजू त्यांना असेल. पण त्या मानवी निर्मिती आहेत आणि वर्गहीन समाज जेव्हा निर्माण होईल तेव्हा त्याचे परिष्करण करून मानवजातीचा सामायिक, सांस्कृतिक वारसा म्हणून त्यांचा आत्मीयतेने स्वीकार होईल. तेव्हा युरोपात निर्माण झालेले विज्ञान किंवा त्या समाजात रुळलेली नैतिक मूल्ये आपण स्वीकारतो तेव्हा आपण आपले स्वत्व गमावतो, परक्यांची नक्कल किंवा उसनवारी करतो असे नसते. आपण आपला वारसाहक्क बजावीत असतो. आपल्याच कष्टांनी निर्माण झालेली पण आपल्याला अन्यायाने जिच्यापासून वंचित केले होते, ती संस्कृती आपण आत्मसात करीत असतो. आपले स्वत्व तात्पुरते वर्गीय पण अखेरीस मानवी असते. सारांश, मार्क्सचे सिद्धान्त कितपत सयुक्तिक आहेत हा प्रश्न बाजूला सारला तरी, मागासलेल्या समाजापुढे इतिहासाने फेकलेले आव्हान स्वीकारायला त्यांना उद्युक्त करण्यात हे सिद्धान्त अतिशय प्रभावशाली ठरले यात शंका नाही. रॉय ह्यांनी आपल्या जीवनाच्या अखेरच्या पर्वात मार्क्सवादाचा, एक एकसंध, सर्वंकष तात्त्विक दर्शन, ह्या स्वरूपात अव्हेर केला असला, तरी त्यांच्या वैचारिक दृष्टिकोणाची घडण मार्क्सवादानेच केली होती यात शंका नाही. किंबहुना स्वतःला मार्क्सवादी म्हणविणाऱ्या समाजात मार्क्सवादाचे अधिष्ठान असलेला मानवतावादच नाकारला जातो असे जेव्हा त्यांना आढळून आले, तेव्हा मार्क्सवादाची फेरतपासणी त्यांना करणे भाग पडले.

### उदारमतवादाकडे...

पण मार्क्सवादाचे म्हणून जे सिद्धान्त आपण वर नमूद केले आहेत त्यांपैकी काही सिद्धान्तांचा प्रबोधनाच्या तत्त्वज्ञानाने (एन्लाइटनमेन्ट) पुरस्कार केला होता आणि त्यांचा खोल प्रभाव आपल्या उदारमतवादी नेत्यांवर पडला होता. मानवजातीची एकता त्यांनी स्वीकारली होती. भौतिक सृष्टीविषयीचे अज्ञान, मानवी प्रकृतीविषयीचे अज्ञान, अंधश्रद्धा ह्यांच्यामुळे माणूस परिणामकारक कृती करू शकत नाही; किंवा चूक कृत्ये करतो. आपल्याला खरोखर काय साधायचे असते आणि ते कसे साधता येईल ह्याचे ज्ञान समाजातील बहुसंख्य, निदान खूप माणसांना होईल, तेव्हा ह्या ज्ञानाला अनुरूप अशी अर्थव्यवस्था, नैतिक मूल्ये आणि दंडक, सामाजिक संस्था आणि चालीरीती ह्यांची व्यवस्था विवेकाधिष्ठित (रॅशनल) असेल; तर ती परंपरेवर आधारलेली आहे एवढेच प्रामाण्य तिच्या ठिकाणी असणार नाही. भारतीय उदारमतवादी पुढाऱ्यांनी हे प्रबोधनाचे तत्त्वज्ञान स्वीकारले होते. आपल्या मागासलेपणाचा गंड होऊ न देता निर्लेप मनाने परंपराधिष्ठित समाजाचे 'आधुनिकीकरण' करण्याच्या उद्योगाला ते लागले होते. म्हणजे परंपरागत समाजव्यवस्थेचे मानवी प्रकृतीशी आणि विज्ञानाने भौतिक सृष्टीविषयी उपलब्ध करून दिलेल्या माहितीशी अधिक अनुरूप अशा समाजव्यवस्थेत परिवर्तन करण्याच्या प्रयत्नांना त्यांनी सुरुवात केली होती आणि आधुनिक ज्ञानाचा समाजात फैलाव करणे हे ह्या परिवर्तनाचे सर्वात प्रभावी साधन होय, असा त्यांचा ठाम विश्वास होता. इतिहास आपल्या बाजूला आहे हे मार्क्सवादाकडून लाभणारे आश्वासन त्यांना नव्हते. पण आपली भिस्त सर्वस्वी आपल्या प्रयत्नांवरच ठेवली पाहिजे ह्या जाणिवेने त्यांना आपल्या जबाबदारीची ओळख अधिकच तीव्रतेने झाली असणे शक्य आहे. आपल्या जीवनाच्या अखेरच्या पर्वात जेव्हा रॉय ह्यांनी नवमानवतावादाचा उद्घोष केला तेव्हा त्यांना जे सिद्धान्त अभिप्रेत होते, उदा. आपला न्यूनगंड बाजूला सारून आपल्या वास्तव परिस्थितीचे यथार्थ आकलन आपण केले पाहिजे; सर्व मानवजात एक आहे आणि तिने निर्माण केलेले सांस्कृतिक संचित सर्व माणसांचा सामायिक वारसा आहे; मानवी प्रकृती आणि माणसाचा भौतिक परिसर ह्यांच्या सम्यक ज्ञानावरच योग्य समाजव्यवस्था आधारता येते, इ. ते त्यांना उदारमतवादात आढळले असते. मग ह्या सिद्धान्ताकडे मार्क्सवादाच्या वाटेने ते का आले?

आपल्या शत्रूची ओळख माणसाला करून दिली आणि त्याच्याशी झुंजणे हे केवळ आपल्या हिताचेच आहे असे नव्हे तर, न्याय्य आहे आणि ते आपले ऐतिहासिक कर्तव्य आहे हे त्याला पटवून दिले तर, त्याला लढायला चेव येतो. आणि ही एकंदरीत सुखद, रोचक अशी परिस्थिती असते. पण मार्क्सवादाचे हे भावनिक आकर्षण सोडून दिले तरी, मार्क्सवादाने एक महत्त्वाची बौद्धिक कामगिरी बजावली. उदारमतवादाने संसदीय लोकशाही, कायद्याचे राज्य आणि व्यक्तीला आपले आर्थिक हित साधण्याचे स्वातंत्र्य ह्यांच्यावर आधारलेली समाजव्यवस्था स्वीकारलेली होती. अशा समाजव्यवस्थेत स्थैर्याच्या आणि न्यायाच्या आवरणाखाली केवढी भयानक हिंसा आणि पिळवणूक दडलेली असते ह्याचे विदारक दर्शन मार्क्सने घडविले होते आणि ते नाकारणे अशक्य होते. माणसांचे कल्याण साधणारी समाजव्यवस्था निर्माण करण्याचे ध्येय स्वीकारलेले विचारवंत, जर ही

परिस्थिती सहन करीत असतील तर, ते अप्रामाणिक तरी असले पाहिजेत किंवा भाबडे तरी असले पाहिजेत. समाजाचे आमूलाग्र परिवर्तन करणे हाच ह्या भयानक वास्तवतेवरील तोडगा होय, ही मार्क्सची शिकवण होती. आणि परिस्थिती एवढी दुःसह होती की, इलाज तातडीने करणे आवश्यक होते. उदारमतवाद्यांनी आदर्श मानवी समाजाचे ध्येय अखेरीस गाठले जाणार आहे अशी दृढ आशा होती. पण हा लांबचा पल्ला होता आणि ठिकठिकाणी सावकाशपणे केलेल्या मर्यादित सुधारणा एकवटत जात जात तो गाठला जाणार होती. आपण पुरेसे प्रयत्न केले तर, हे ध्येय सिद्धीस जाणे जितके अनिवार्य होते, तितकेच हे प्रयत्न सावकाशीने होणेही अनिवार्य होते. उलट, वर म्हटल्याप्रमाणे समाजाच्या आमूलाग्र परिवर्तनाला वाहून घेणे हे मार्क्सच्या म्हणण्याप्रमाणे तातडीचे कर्तव्य होते आणि आपले कोणतेही तात्कालिक कर्तव्य ह्या उद्दिष्टासाठी घेतलेले (कितीही आडवळणाने घेतलेले) एक पाऊल म्हणून अर्थपूर्ण ठरत होते.

### कृतिप्रवणतेचे आवाहन

सामाजिक व्यवस्थेच्या पोटात असलेल्या दुरिताकडे (ईव्हिल) आणि ह्या व्यवस्थेत सहभागी होणाऱ्या व्यक्तींच्या अंतरंगात वसत असलेल्या दुरिताकडे मार्क्सने लक्ष वेधले आणि त्याच्याशी संघर्ष केल्याशिवाय तरणोपाय नाही असा उद्‌घोष केला. उलट, स्थिर समाजव्यवस्थेला धक्का न लावता तिचे सावकाश परिवर्तन करू पाहणारा उदारमतवाद दुरिताशी तडजोड करीत असल्यासारखे दिसत होते. इतर अनेक तरुण नेत्यांप्रमाणेच रॉय ह्यांच्या कृतिप्रवण मनाला दुरिताशी तातडीने मुकाबला केला पाहिजे हे मार्क्सचे आवाहन भिडले. प्रस्थापित समाजव्यवस्थेच्या स्थैर्याला धक्का न लावता करता येण्याजोगी परिवर्तनाची कृती इतकी मर्यादित व क्षीण असे की, ती कृती न ठरता हावभावच ठरत. मार्क्सने विचार आणि कृती ह्यांच्या एकतेचे प्रतिपादन केले होते. ज्ञान कृतीमध्ये परिणत झाले पाहिजे. आमूलाग्र सामाजिक परिवर्तनाचे ध्येय आणि कृती व विचार ह्यांच्या एकतेचे तत्त्व ह्या गोष्टी रॉय ह्यांनी कधीच सोडून दिल्या नाहीत.

मग मार्क्सवादाचा अव्हेर त्यांनी का केला? मार्क्सवादी क्रियाशील नेता म्हणून आयुष्य घालविल्यानंतर मार्क्सवादाला तिलांजली देणे सोपे नाही. मार्क्सवादाने सर्वच दलितांना स्वाभिमान दिला, आशा दिली, भूतकालाचा अर्थ लावला, वर्तमानकालाचे आकलन करून दिले, ज्याच्यासाठी सर्वस्वाचा होम करावा असे कर्तव्य माणसांपुढे उभे केले, मानवजातीशी एकरूपता दिली, थोडक्यात, जीवनाचा अर्थ स्पष्ट केला. मानवाच्या प्रतिष्ठेला साजेशी साधना माणसांनी दिली. धर्म जे जे माणसासाठी करतो ते सारे मार्क्सवाद करतो. मार्क्सवादी म्हणून जगल्यानंतर मार्क्सवाद आणि कम्युनिस्ट पक्ष ह्यांचा त्याग करणे म्हणजे जीवनाचा पायाच उखडून टाकणे. बोल्शेव्हिक क्रांतीनंतर, सोविएट रशिया स्थिर समाज म्हणून नांदू लागल्यानंतर तर हे करणे अधिकच कठीण झाले होते. कारण आता मार्क्सवादी दर्शनाच्या प्रामाण्याचे प्रत्यंतर लाभले होते. साम्यवादी समाजरचना, स्वर्गाचे हे राज्य पृथ्वीवर अवतरले होते; मार्क्सच्या आणि मार्क्सवादाने भरलेल्या ध्येयवादी कार्यकर्त्यांचे स्वप्न एवढ्यापुरतेच त्याचे अस्तित्व नव्हते; इतिहासात आणि भूगोलात आता त्याला प्रत्यक्ष स्थान, नामनिशाणी होती. त्याच्यात कितीही उणिवा, दोष असले तरी, ते काढून टाकता येण्याजोगे होते. पण मार्क्सवादी दर्शनाच्या सत्यतेची त्याच्यातून जी काही ग्वाही मिळत होती तिचे महत्त्व अलौकिक होते. आता मार्क्सवाद सोडून देणे म्हणजे ज्या दलितांशी एकरूप झालो होतो, त्यांच्या रक्ताळलेल्या इतिहासाशी आणि उज्ज्वल भविष्याशी लढाई संपत आली असताना, जय दृष्टिपथात आला असताना बेइमान होण्यासारखे होते आणि तरीही रॉय ह्यांनी मार्क्सवाद सोडून दिला.

### स्वातंत्र्यक्षेत्राचा लोप

कारण ज्या मानवतावादी नैतिक मूल्यांवर मार्क्सवाद अखेरीस आधारलेला होता त्यांनाच मार्क्सवादाला अनुसरून घडलेल्या आणि घडविण्यात आलेल्या समाजव्यवस्थेत स्थान उरले नव्हते. झपाट्याने बदलणाऱ्या परिस्थितीत मार्क्सवादाच्या सिद्धान्तांना अधिक, नेमका, रेखीव आदेश द्यावा लागला. वास्तव परिस्थिती कृती करताना, संभाव्य पर्यायातून निवड करावी लागली आणि अधिकृत मार्क्सवाद्यांची लगतची उद्दिष्टे आणि ती साधण्यासाठी त्यांना मान्य असलेली साधने स्पष्ट झाली. त्यांचा आणि मार्क्सला अभिप्रेत असलेल्या साम्यवादी समाजरचनेचा मेळ घालणे सोपे नव्हते. म्हणजे कोणतेही दूरचे, अतिशय उज्ज्वल, अतिशय शुद्ध मानवी जीवनाचे आमूलाग्र परिवर्तन करू पाहणारे ध्येय सिद्ध करण्यासाठी म्हणून वास्तव परिस्थितीत प्रत्यक्ष कृती करताना ज्या अडचणी येतात त्या मार्क्सवाद्यांपुढेही उभ्या राहिल्या. मार्क्सच्या म्हणण्याप्रमाणे वर्गविहीन साम्यवादी समाज हा

व्यक्तींचा समाज असतो. जोपर्यंत समाजाची परस्परविरोधी वर्गात विभागणी झालेली असते तोपर्यंत व्यक्तीचे सत्त्व (एसेन्स), हे ती ज्या वर्गाची असते त्या वर्गाचे सत्व असते; त्या वर्गाशी एकरूप होऊन, त्याच्या ऐतिहासिक कामगिरीत सहभागी होऊन व्यक्ती हे सत्त्व प्रकट, मूर्त करते, पण हे खंडित, एकांगी विकृत असे सत्त्व असते. वर्गविहीन समाजात व्यक्तीला तिचे सवंध, निरामय मानवी सत्त्व परत लागते. ह्या सत्त्वाचा मुक्त आविष्कार साम्यवादी समाजव्यवस्थेत होतो. माणूस हा एक देह असल्यामुळे, म्हणजे माणसाचे अस्तित्व हे भौतिक अस्तित्व असल्यामुळे माणूस कधीही पूर्णपणे मुक्त होऊच शकणार नाही. कारण देहधारणाला आवश्यक भौतिक वस्तूंचे उत्पादन करणे अनिवार्य होते. पण मार्क्सने स्वातंत्र्याचे क्षेत्र आणि अनिवार्यतेचे क्षेत्र ह्यांच्यात भेद केला होता. भांडवलशाहीत विकसित झालेल्या उत्पादनतंत्रांनी दिवसाच्या कांही तासांत श्रम करून प्रचंड प्रमाणावर संपत्ती निर्माण करता येईल, आणि भौतिकतेचे हे अनिवार्य देणे एकदा देऊन टाकले की, उरलेल्या काळात माणसांना स्वातंत्र्याच्या क्षेत्रात विहार करता येईल. मानवी सत्त्वाच्या मुक्त आविष्काराचे हे क्षेत्र असेल.

पण सोव्हिएट समाजव्यवस्थेत ह्या स्वातंत्र्याचा कुठेच प्रत्यय येत नव्हता. सोव्हिएट समाज अजूनही वर्गविहीन साम्यवादी समाज नव्हता. तो वर्गीय समाज होता, वर्गविहीन समाज निर्माण होण्याच्या अगोदरच्या पायरीपर्यंत म्हणजे 'कामगारवर्गाच्या हुकुमशाहीपर्यंत' तो पोचला होता हे मान्य करू. पण कामगारवर्गाच्या हुकुमशाहीचे रूपांतर कामगार-वर्गावरील हुकुमशाहीत झाले होते. ज्या कम्युनिस्ट पक्षाची ही हुकुमशाही होती तो एक कठोर, निर्घृण म्हणता येईल अशा शिस्तीत बांधला गेला होता. सैनिकाची शिस्त आणि योग्याची साधना ह्या शिस्तीने एकवटली होती. हे कम्युनिस्ट व्यक्तींनी स्वेच्छेने केलेले समर्पण होते असे म्हणता येईल. पण हे समर्पण कशासाठी होते? इतिहासाने व्यक्तीवर टाकलेली जबाबदारी, हिच्यात आणि पक्षनेत्याने वेळोवेळी दिलेले आणि पक्षाची शिस्त म्हणून हूं की चूं न करता स्वीकारलेले आदेश ह्यांच्यात भेद करता येईनासा झाला होता. कारण समाजावर, जर कम्युनिस्ट पक्षाची हुकुमशाही होती तर, कम्युनिस्ट पक्षावर पक्षनेत्याची हुकुमशाही होती. 'लोकशाही केंद्रीकरणा'ची (डेमॉक्रेटिक सेंट्रॅलिझम) कार्यपद्धती जरी पक्षाने तत्त्व म्हणून स्वीकारली होती तरी व्यवहारात लोकशाही हा उपचार ठरला होता. केंद्रीकरणाने लोकशाही ग्रासून टाकली होती. आदेश वरून खाली येत होते; एका करड्या अमानुष समाजाच्या सर्व थरांत आपली पाळेमुळे पसरविलेल्या नोकरशाहीने समाजाला एका दावणीत बांधले होते; कुणाची ब्र काढायची प्राज्ञा नव्हती. अशा समाजव्यवस्थेतून निर्माण होणारी माणसे इमानी, कष्टाळू, सोशीक, कार्यकुशल अशी असतील. पण मुक्तपणे आपल्या 'मानवी सत्त्वा'चा आविष्कार करणारी माणसे ती असणार नाहीत. भौतिक संपत्तीचे उत्पादनही तिच्यात प्रचंड प्रमाणावर साधता येईल. पण मार्क्सला अभिप्रेत असलेले 'स्वातंत्र्याचे क्षेत्र' त्याच्यात आढळणार नाही.

### मानवी सत्त्वाचे अधिष्ठान

मार्क्सवादाने धारण केलेले हे विकृत रूप होते असे म्हणता आले असते. पण मग मार्क्सवादाचे सरल, अविकृत रूप कोणते? मार्क्सवादाचा नव्याने पुनर्विचार करणे आवश्यक झाले होते. आणि त्यासाठी रॉय मार्क्सच्या मूलभूत नैतिक दर्शनाकडे वळले. हे दर्शन असे की, मुक्त व्यक्तींचा समाज हे मानवी समाजाचे नैतिकदृष्ट्या आदर्श रूप होय. प्रत्येक व्यक्ती अशा समाजात स्वतंत्र असते आणि सर्वच व्यक्ती स्वतंत्र असल्यामुळे प्रत्येक व्यक्ती इतर सर्व व्यक्तींच्या स्वातंत्र्याचा आदर राखते. अशा समाजात अर्थात सर्वच सांघिक कृती परस्पर सहकार्यावर आधारलेल्या असतात. व्यक्तींचे स्वातंत्र्य आणि व्यक्तींमधील सहकार्य ही आदर्श समाजाची लक्षणे असतात. व्यक्तीचे स्वातंत्र्य म्हणजे व्यक्तीच्या मानवी सत्त्वाचा अनिर्बंध (पण इतर सर्व समान स्वातंत्र्याशी सुसंगत असा) आविष्कार.

पण मानवी सत्त्व नेमके काय आहे हे कसे निश्चित करायचे? मार्क्सच्या मते (आणि येथे मार्क्स हेगेलच्या सिद्धान्ताचा अनुवाद करीत आहे) मानवी सत्त्वाचा आविष्कार इतिहासात होतो आणि इतिहासात सहभागी होऊन मानवी सत्त्वाचा विकास होतो. पण इतिहासात व्यक्त झालेले मानवी सत्त्व अनिवार्यतेने एकांगी व विकृत असते. जेव्हा इतिहासाच्या पलीकडची वर्गविहीन साम्यवादी समाजाची अवस्था गाठली जाते आणि प्रत्येक व्यक्तीला परिपूर्ण मानवी सत्त्वाचा पुनर्लाभ होतो तेव्हा ह्या सत्त्वाचा आशय आणि रूप काय असेल हा प्रश्न उरतोच, पण रॉय ह्यांनी मानवी सत्त्वाची इतिहासाच्या तावडीतून मुक्तता केली. ज्या निसर्गातून मानवाचा उदय होतो त्या निसर्गातच मानवी सत्त्वाचे अधिष्ठान त्यांनी पाहिले. माणसाच्या स्वाभाविक प्रेरणा आणि शक्ती ह्यांचे मिळून हे मानवी अस्तित्वाचे आदर्श आणि माणसाच्या कमीअधिक








प्रमाणात सिद्ध केलेले ते रूप आहे. मानवी सत्त्व म्हणजे माणसाच्या नैसर्गिक प्रेरणा आणि शक्ती. पण ह्या सत्त्वाची दोन ठळक आणि व्यापक लक्षणे म्हणजे माणसाची स्वातंत्र्याची प्रेरणा आणि त्याची विवेकशीलता (Rationality). माणसाच्या प्रेरणा आणि शक्ती आपल्या मुक्त आविष्कारासाठी धडपडत असतात आणि ही धडपड माणूस स्वातंत्र्याची प्रेरणा या स्वरूपात अनुभवतो. माणूस विवेकी आहे. सत्य आणि असत्य, प्रमाण आणि अप्रमाण ह्यांच्यात तो भेद करू शकतो आणि सत्याचा स्वीकार करणे ही त्याची स्थायी प्रवृत्ती आहे. कारण प्राण्याला जगायचे असेल तर, आपल्या परिसराचा शोध त्याला घ्यावा लागतो आणि त्याचे साधेल तितके यथार्थ ज्ञान करून घ्यावे लागते.

### स्वातंत्र्य-सहकार-आविष्कार

मानवी सत्त्वाचे रॉय यांनी केलेले हे वर्णन आणि त्याला दिलेले अधिष्ठान कितपत टिकण्यासारखे आहे हा प्रश्न बाजूला ठेवू. पण ह्या सिद्धान्तापासून काही नैतिक निष्कर्ष सरळ निघतात. म्हणजे नैतिक आदर्शांविषयीचे आणि ते साधण्यासाठी आवश्यक आणि उपयुक्त असलेल्या कार्यपद्धतीविषयीचे निष्कर्ष निघतात. एक तर इतिहासाला स्वतःची गती नसते पण माणसे इतिहासाला गती आणि दिशा देऊ शकतात. शिवाय स्वातंत्र्याची प्रेरणा आणि विवेकशीलता हे माणसाचे स्थायी धर्म असल्यामुळे इतिहासात प्रगती घडून येणे अतिशय संभवनीय असले पाहिजे आणि तशी ती घडून आलेली दिसतेही. प्रगतीचा एकमेव निकष असा : एखाद्या समाजातली माणसे, व्यक्ती ज्या प्रमाणात स्वातंत्र्य उपभोगतात आणि परस्परांशी सहकार्य करतात त्या प्रमाणात तो समाज प्रगत असतो. स्वातंत्र्य म्हणजे आपल्या सत्त्वाचा मुक्त आविष्कार करण्याची क्षमता. ह्यासाठी व्यक्तीवर कमीत कमी निर्बंध असले पाहिजेत आणि असा आविष्कार करायला अनुकूल परिस्थितीही असली पाहिजे. उदा. आवश्यक ती भौतिक साधनसामग्री उपलब्ध असली पाहिजे. पण अशा या स्वायत्त व्यक्ती समाजात नांदत असल्यामुळे परस्पर सहकार्यावर त्यांनी एकमेकांशी संबंध जोडले पाहिजेत. एका व्यक्तीने किंवा व्यक्तींच्या एका गटाने, संघटनेने, इतरांचे नियमन करणे ही परिस्थिती मानवी समाजात अटळ असेल पण ती कमीत कमी प्रमाणात आढळली पाहिजे. ह्याचा अर्थ पारंपरिक शासनसंस्थेची जागा वैयक्तिक आणि सांघिक स्वयंशासनाने घेतली पाहिजे. वरील निकष प्रगतीचा एकमेव निकष म्हणून आपण स्वीकारला तर सर्वच सामाजिक नियम, संस्था, व्यवस्था ह्यांच्याकडे पाहण्याचा एक विशिष्ट दृष्टिकोन प्राप्त होतो. उदा. अर्थव्यवस्था घ्या. भौतिक संपत्तीची, म्हणजे उपभोग्य वस्तू आणि सेवा ह्यांची अमाप निर्मिती हे प्रगत, 'विकसित' समाजाचे एक लक्षण मानले जाते. पण समजा, अनुभवाने असे आढळून आले की, असे उत्पादन करण्यासाठी प्रचंड कारखाने उभारावे लागतात, नियोजन आणि व्यवस्थापन करण्याचे अधिकार काही मूठभर व्यक्तींच्या ठिकाणी केंद्रित करावे लागतात, जीवनाच्या मोठ्या आणि महत्त्वाच्या क्षेत्रात आणि आपल्या जीवनाच्या मोठ्या कालखंडात असंख्य व्यक्तींना दुसऱ्यांच्या निर्णयांची तामिली करावी लागते, स्वतःचे निर्णय घ्यायचे स्वातंत्र्य उरत नाही, तर अशा अर्थव्यवस्थेने इतर काही साधत असो नसो, केवळ ह्या कारणामुळे ती 'प्रतिगामी' ठरते. उलट, लोकांनी सहकार्याने चालविलेले लहान लहान उद्योगधंदे जर लोकांच्या स्वातंत्र्याला, स्वायत्ततेच्या अनुभवाला पोषक ठरत असतील, तर त्यांच्याकडून उत्पादन कमी झाले तरी, ते स्वीकारार्ह ठरतील. मार्क्सने इतिहासाचा एक अटळ क्रम मानला होता. भांडवलशाहीने निर्माण केलेली सुबत्ता ही साम्यवादी समाजव्यवस्थेची - प्रत्येकाकडून त्याच्या कुवतीइतके घेणाऱ्या आणि प्रत्येकाला त्याच्या गरजेइतके देणाऱ्या व्यवस्थेची आवश्यक पूर्वतयारी आहे असे मार्क्सवाद्यांचे म्हणणे आहे. ह्यामुळे मार्क्सवादी सरकारे भौतिक संपत्तीच्या प्रचंड उत्पादनावर भर देतात. पण रॉय ह्यांना हा दृष्टिकोनच अमान्य होईल. सर्व व्यक्तींना आपल्या स्वतःच्या दैनंदिन जीवनात स्वायत्ततेचा जास्तीत जास्त प्रत्यय येईल, व्यक्तिस्वातंत्र्याचा परिपोष घडवून आणील अशीच अर्थव्यवस्था इष्ट ठरेल म्हणजे इतिहासाच्या कोणत्या एका क्षणी आदर्श समाजव्यवस्था अवतरणार आहे आणि तो क्षण जवळ आणण्याची इतिहासदत्त कामगिरी बजावणे हे प्रत्येकाचे कर्तव्य आहे असे ते मानीत नाहीत. जीवनाच्या सर्व क्षेत्रांत व्यक्तींना येथे आणि आता स्वातंत्र्य आणि सहकार्य ह्या मूल्यांचा प्रत्यय आला पाहिजे. तो किती प्रमाणात येईल हे अनेक गोष्टींवर, भौतिक परिस्थितीवर, इतिहासप्राप्त सामाजिक परिस्थितीवर, माणसाने अगोदर साधलेल्या प्रगतीवर, त्याच्या प्रयत्नांवर अवलंबून राहील. पण ही मूल्ये जीवनात, वैयक्तिक आणि सामाजिक जीवनात, मूर्त करण्यासाठी अगोदर पूर्वतयारी करायची आणि ती पूर्ण झाली, की त्यांना मूर्त स्थान द्यायचे ही विचारपद्धतीच रॉय यांना अमान्य आहे. ही मूल्ये सतत, प्रत्येक क्षणी, साधेल





त्या प्रमाणात, जीवनात उतरावयाची असतात. इतिहासाला स्वतःचा आशय नसतो आणि दिशा नसते. माणसांचे ज्ञान मर्यादित असते, कुवत मर्यादित असते व म्हणून अनुकूल परिस्थिती निर्माण करण्यात त्यांना मर्यादित यश लाभते. हे खरे असले तरी, त्या प्रमाणात माणसे परिस्थितीला वळण देऊ शकतात, त्या प्रमाणात त्या परिस्थितीला कोणते वळण देतील हे त्यांच्यावर अवलंबून असते. उदा. जर पुरेशा माणसांनी पुरेशा निश्चयाने असे ठरविले, की भांडवलशाही अर्थव्यवस्थेऐवजी छोट्या, सहकारी तत्त्वावर चाललेल्या उद्योगधंद्यांचे जाळे असलेली अर्थव्यवस्था स्थापन करायची तर बऱ्याच प्रमाणात ही गोष्ट ते साधू शकतील. मात्र त्यांचा निश्चय पाहिजे, आवश्यक ते ज्ञान त्यांना असले पाहिजे. तेव्हा लोकशिक्षण हे सामाजिक परिवर्तनाचे सर्वात प्रभावी साधन आहे. लोकशिक्षण म्हणजे मानवी प्रकृतीविषयीचे, माणसाच्या नैसर्गिक परिसराविषयीचे सामाजिक संस्था, व्यवस्था ह्यांच्या होणाऱ्या परिणामांविषयीचे ज्ञान सामाजिक फैलावणे. माणसांना स्वाभाविकपणे स्वातंत्र्याची आणि ज्ञान ग्रहण करण्याची ओढ असते. ते धर्माची, रूढीची, परंपरेची, एखाद्या तात्त्विक दर्शनाची गुलामगिरी स्वीकारीत असतील तर, आपल्या स्वाभाविक प्रवृत्तीचा अव्हेर करून ते असे करीत असतात आणि ह्याचे कारण मानवी प्रकृतीविषयीच्या, विश्वाविषयीच्या, समाजधारणेच्या नियमांविषयीच्या त्यांच्या गैर कल्पना. त्यांच्यापुढे दुरुस्त कल्पना सातत्याने मांडल्या तर, स्वतःच स्वतःभोवती घालून घेतलेल्या गुलामगिरीच्या कुंपणातून ते बाहेर पडतील.

पण एक प्रश्न असा, की माणूस या कुंपणात शिरलाच कसा किंवा सापडलाच कसा? माणसाची मूळची स्वातंत्र्याची प्रेरणा, विवेकशीलता लोपलीच कशी? ह्याचे उत्तर देता येईल. ज्ञान हळुहळू वाढते. आणि चूक कल्पना दुरुस्त करीत करीत ते वाढते. तेव्हा सुरुवातीचे ज्ञान केवळ अपुरे असते असे नाही. ते विकृत असते. आणि त्याचा परिणाम व्यवहार विकृत होण्यात होतो. दुसरा महत्त्वाचा प्रश्न असा; ज्या अर्थाने रॉय ह्यांना विवेकशीलता अभिप्रेत आहे त्या अर्थाने माणसाच्या ठिकाणी सत्य समजून घेण्याची कुवत आणि ते स्वीकारण्याची प्रवृत्ती असून भागत नाही. स्वतःच्या स्वातंत्र्याएवढीच दुसऱ्याच्या स्वातंत्र्याची कदर करण्याची वृत्तीही ह्या विवेकशीलतेत अंतर्भूत आहे. म्हणजे माणसाला आपण होऊन स्वार्थावर मर्यादा घालता आली पाहिजे. माणूस हिशोबाने समंजसपणे वागू शकेल. आपल्या स्वार्थावर काही प्रमाणात मर्यादा घालून घेतल्यानेच तो आपल्याला जास्तीतजास्त यशस्वीपणे साधता येईल, हे तो ओळखेल. पण स्वार्थाचे गणित सोडवू शकणारी विवेकशीलता वेगळी आणि दुसऱ्यांच्या हिताचे मूल्य आपल्या हिताच्या मूल्याइतकेच आहे हे ओळखणारी 'अपक्ष' दृष्टिकोन धारण करू शकणारी विवेकशीलता वेगळी. ह्या दुसऱ्या विवेकशीलतेच्या दृष्टीने पाहता माणूस जितका विवेकशील आहे, तितकाच तो अविवेकी आहे असे प्रथमदर्शनी तरी वाटेल. काही अपवादात्मक माणसे सर्वकाल विवेकी असतात आणि काही अपवादात्मक माणसे अपवादात्मक काळी विवेकशील असतात. बहुसंख्य माणसे अनेक प्रसंगी विवेकशील असतात आणि अनेक प्रसंगी अविवेकी असतात. माणूस मूलतः प्रकृतीनेच विवेकशील असतो ही रॉय यांची श्रद्धा आहे. परस्परविरोधी वर्गांच्या संघर्षातून वर्गविहीन समाज अटळपणे उदयाला येईल ही मार्क्सची श्रद्धा होती. प्रत्येक माणूस ईश्वराचा अंश असल्यामुळे शुद्ध चित्ताने त्याच्या सद्सद्बुद्धीला आवाहन केले तर तो प्रतिसाद देईलच ही गांधीजींची श्रद्धा होती. समाजाचे आमूलाग्र परिवर्तन करून त्याचे आदर्श रूप त्याला देण्याचे ध्येय जो व्यवहार्य म्हणून स्वीकारतो त्याला अशी श्रद्धा बाळगण्याशिवाय गत्यंतर नसते.

### गांधीजी - एक साधक

गांधीजी एक नैतिक साधक होते आणि त्यांची नैतिक साधना त्यांच्या अध्यात्मिक साधनेचा एक भाग होता आणि साधन होते. सत्य साधणे हे ह्या अध्यात्मिक साधनेचे उद्दिष्ट होते. पण सत्य म्हणजे केवळ बुद्धीने ग्रहण करायचे ज्ञानरूप सत्य नाही. ते व्यवहार्य सत्य आहे. आपली सत्य प्रकृती ओळखून तिला अनुसरून जगणे म्हणजे हे सत्य साधणे. हे विश्व एका चैतन्यतत्त्वाचा आविष्कार आहे, हे चैतन्य साऱ्या विश्वव्यापाराचे नियमन करते, आपण आणि इतर सारी माणसे (आणि इतर सर्वच काही) ह्या चैतन्याचे अंश आहोत असे सत्य थोडक्यात मांडता येईल, पण ह्या सत्याप्रमाणे कसे जगावे हे थोडक्यात मांडता येणार नाही. ते प्रत्येकाला स्वतःच्या अनुभवाने, सतत आत्मपरीक्षण करीत, आपल्या चुका ओळखत, दुरुस्त करीत, दुसऱ्यांच्या अनुभवांचा लाभ घेत ठरवावे लागते. गांधीजींचा हा दृष्टिकोन अध्यात्मिक आहे आणि परंपरेने तो भारतात दृढमूल आहे. पण ह्या परंपरेला गांधीजींनी एक वेगळेच वळण दिले.

अनुभवाने, चिंतनाने, विचाराने जे सत्य म्हणून मी ओळखतो ते सत्य माझ्यावर बंधनकारक असते. त्याला

अनुसरून मी जगलो नाही तर मी सत्याशी प्रतारणा केली असे होईल. मी दुसऱ्यापासून सत्य आयते स्वीकारले तर सत्य ओळखून तसे वागायची माझी जबाबदारी मी पार पाडली नाही असे होईल. उसने घेणे हा आपद्‌धर्म आहे. ती नेहमीची रहाटी होऊ शकत नाही. म्हणजे ह्या विशिष्ट प्रसंगी किंवा ह्या प्रकारच्या प्रसंगी मी कसे वागावे हे माझे मला ओळखावे लागते; मी दुसऱ्याचा सल्ला घेईन, अशा प्रसंगी वागायची नेहमीची प्रथा काय आहे हे जाणून घेईन, पण अखेरीस काय करणे योग्य आहे हे माझ्या सद्‌सद्‌बुद्धीला ठरवावे लागते. माझी सद्‌सद्‌बुद्धी चूक करणार नाही. पण तिची चूक झाली हे कळले की, ती दुरुस्त करण्याची शक्यता निर्माण होते. आपल्या चुका प्रांजळपणे स्वतःशी व इतरांशी कबूल करणे ही स्वतःला सुधारण्याची एक महत्त्वाची पायरी आहे. सत्य काय आहे हे जाणून घेण्याची आपली जबाबदारी इतर कुणावर किंवा कशावर सोपवून आपण तिच्यापासून मुक्त होऊच शकत नाही. ती आपल्याला नम्रत्वे, दृढनिश्चये पार पाडावीच लागते. थोडक्यात, गांधीजींनी व्यक्तींचे निर्णयस्वातंत्र्य मानले. व्यक्तीची जबाबदारी आणि व्यक्तीचे स्वातंत्र्य ह्या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. काळाच्या ओघात पिढ्यांच्या अनुभवाने गांधीजींनी परंपरेचे म्हणून किंवा धर्मग्रंथाचे म्हणून प्रामाण्य मानले नाही. परंपरेचे किंवा धर्मग्रंथांचे आदराने पण चिकित्सकपणे परीक्षण करण्याची, त्यात सत्य काय आहे आणि असत्य काय आहे हे ठरविण्याची, सत्याचा स्वीकार आणि असत्याचा त्याग करण्याची व्यक्तीची जबाबदारी व्यक्ती टाळू शकत नाही. परंपरेशी असलेला सांधा नष्ट न करता परंपरेच्या जोखडातून धर्मांची मुक्तता गांधीजींनी केली.

सत्य हे गांधीजींच्या मते व्यवहार्य असल्यामुळे गांधीजींनी विचार आणि कृती ह्यांची अभेद्यता स्वीकारली होती. सत्य व्यवहार्य असते ह्याचा अर्थ असा की, सत्याला अनुसरून जगले पाहिजे आणि सत्याला अनुसरून सुसंगतपणे जगता आले पाहिजे. जे व्यवहारात टिकत नाही, म्हणजे ज्याला अनुसरून सुसंगतपणे जगता येत नाही ते सत्य नव्हे. गांधीजींना उपपत्तीत विज्ञानात, केवळ वस्तूंचे स्वरूप समजून घेण्यात जो आनंद असतो त्यात रस नव्हता. आपण कसे जगावे, काय करावे, ते नेमके कसे करावे हे समजून घेण्यात आणि तसे करण्यात त्यांना रस होता. पण आपण काय करावे, ते का करावे, कसे करावे ह्याविषयीच्या आपल्या कल्पना अतिशय स्वच्छ नसतील तर आपली कृती बिघडेल ही भीती त्यांना होती. ह्यामुळे आपल्या कृतींच्या बारीकसारीक तपशीलांविषयीचेही आपले अनुभव ते इतरांना सांगत व त्यांचे ऐकून घेत.

### रॉय यांचा सर्वसमावेशक ज्ञानमार्ग

रॉय हे पाश्चात्त्य वैचारिक परंपरेतून मार्क्सद्वारा आपल्या नवमानवतावादाकडे आले होते. मध्ययुगीन समाजातून आधुनिक समाजाचा विकास होण्याच्या ह्या कालखंडात युरोपमध्ये जे वैचारिक मंथन झाले त्याला समाजपरिवर्तनाचे एक अंग होते तसेच शुद्ध वैचारिक असेही अंग होते. म्हणजे समाजाची घडी कशी असावी, ती कशी बसवावी, व्यक्तिव्यक्तींमधील परस्परसंबंध कसे असावेत, अर्थव्यवस्थेचे संघटन कोणत्या तत्त्वांवर करावे इ. प्रश्नांचा जसा विचार ह्या अवधीत झाला तसा माणसाची प्रकृती, मानवी समाजाची घडण समजून घ्यावी असाही प्रयत्न झाला. प्राकृतिक विज्ञानात माणसाविषयीचे ज्ञान मिळवून संग्रहित करावे अशी कल्पना होती. ह्या साऱ्यांचा रॉय ह्यांच्यावर प्रभाव होता. एका सर्वंकष, सर्वसमावेशक व्यवस्थेत सर्व ज्ञान एकत्रित करून त्याच्या पार्श्वभूमीवर मानवी प्रकृतीचा आणि इतिहासाचा अर्थ लावायची हेगेलची महत्त्वाकांक्षा होती, आणि ती त्याने पार पाडली. अशा ज्ञानाच्या सर्वसमावेशक समन्वयाच्या अधिष्ठानावरच मानवी जीवनाचा अर्थ लावता येतो आणि समाजपरिवर्तनाची कृती उभारता येते हे मार्क्सचे गृहीत कृत्य त्याने हेगेलपासून घेतले आणि त्याचा रॉय ह्यांच्यावर अखेरपर्यंत पगडा होता. गांधीजींना असे केवळ वैचारिक स्वरूपाचे कुतूहल नव्हते. ते नैतिक साधक होते. आपले हेतू शुद्ध असावेत, आपले आदर्श प्रत्यक्षात उतरविण्याचे आपले प्रयत्न अखंडपणे चालू राहावेत, त्यात शैथिल्य येऊ नये एवढे साधण्यासाठी आपल्या सर्व शक्तींचा विनियोग ते करीत. इतर गोष्टींविषयी ते स्वतः उदासीन होते. पण त्यांच्या विरुद्ध नव्हते. माणसे आपापल्या स्वाभाविक प्रेरणेनुसार शास्त्रज्ञ, चित्रकार, कवी इ. बनतील हे उघड होते. त्यांचा आग्रह एवढाच राहिला की, उदा. शास्त्रज्ञाची शास्त्रीय संशोधनामागची प्रेरणा शुद्ध राहिली पाहिजे. ती स्वार्थाने, आपल्या ज्ञानाचा उपयोग इतरांवर सत्ता गाजविण्यासाठी आपण करू, ह्या मोहाने डागळता कामा नये. आणि विशेष महत्त्वाची गोष्ट ही की, विज्ञानाने आपण सार्वभौम आहो, असा दावा करण्याचा मोह टाळला पाहिजे. चांगल्या जीवनाचा सुसंगत भाग म्हणून विज्ञानाची साधना झाली पाहिजे. ह्या अर्थाने ज्यांना गांधीवादी वैज्ञानिक म्हणता येईल अशा अनेक वैज्ञानिकांचा उल्लेख








करता येईल. उदा. आइनस्टाइन. पण गांधीजींच्या प्यूरिटन नीतीला भारताच्या त्या काळच्या व आजच्या भारताच्या वास्तव परिस्थितीच्या संदर्भात एक विशेष अर्थ आहे. ज्या देशात बहुसंख्य लोक दारिद्र्यरेषेवर जगत आहेत, त्या देशात त्यांना किमान मानवी प्रतिष्ठा प्राप्त व्हावी ह्यासाठी सर्व शक्ती खर्च व्हावी हे योग्य आहे. ह्या सामाजिक वास्तवाचा विसर पडू न देता विज्ञान आणि जीवनाच्या इतर 'स्वायत्त' क्षेत्रांचा विकास करावा लागेल. आणि सामान्य लोकांशी दुरावा निर्माण होईल अशी राहणी कुणाचीच असता कामा नये. सत्याचा एक भाग म्हणजे व्यक्तिव्यक्तींमधील परस्परसंबंध. सर्वच माणसे ईश्वराचा अंश असल्यामुळे सर्वांची प्रतिष्ठा समान असते. सत्याची साधना करण्याची कुवत आणि प्रवृत्ती प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणी असते, ह्यावर ही प्रतिष्ठा आधारलेली असते. ह्याचा अर्थ प्रत्येकाने इतरांच्या हिताची स्वतःच्या हिताइतकीच कदर केली पाहिजे. ही कदर म्हणजे प्रेम किंवा अहिंसा. पण माणूस स्वार्थामुळे इतरांवर आक्रमण करायला उद्युक्त होतो. असा अन्याय सहन करणारा माणूसही असत्याने वागतो. म्हणजे माणसामाणसांमध्ये ज्या प्रकारचे परस्परसंबंध असले पाहिजेत - समानतेचे, आस्थेचे, प्रेमाचे - त्यांच्याशी विसंगत ठरेल असे वागतो. तेव्हा अन्याय दूर करण्याचा निकराचा प्रयत्न करणे हा सत्याच्या साधनेचा भाग आहे. स्वतःवरील अन्याय किंवा इतरांवरील अन्याय. पण अन्याय करणाराही सत्याचा, सुप्त का होईना, साधक असतो. त्याने अन्याय केला आहे हे त्याला पटवून देता येते. त्याला हे पटवून देण्याचा सतत प्रयत्न करीत राहणे, त्याच्या सदसद्‌बुद्धीला आवाहन करणे आणि स्वतः होऊन तो दूर करायला त्याला प्रवृत्त करणे हा सत्याचा आग्रह धरून अन्यायाविरुद्ध केलेल्या संघर्षाचा आवश्यक भाग असतो. या संघर्षाला सहकार्याचे अधिष्ठान असते आणि त्याची परिणतीही सहकार्यात व्हायची असते. इतरांनी केलेल्या अन्यायाविरुद्ध केलेला संघर्ष जर सत्याच्या आग्रहावर आधारलेला असेल, तर सत्याग्रहाचे हेतूही शुद्ध असतात. आपण अन्यायाविरुद्ध संघर्ष करीत आहो, अन्याय करणाऱ्या व्यक्तीविरुद्ध नाही, अशी आपली खात्री असली पाहिजे; आणि आपण कोणत्याही बाबतीत इतरांवर अन्याय करीत नाही अशी खबरदारी घेतली पाहिजे. पण ही चित्ताची शुद्धताही सत्याग्रही मार्गाने जगत जगतच कमावता येते. चित्त शुद्ध होईपर्यंत मी संघर्ष करणार नाही असे म्हणणे म्हणजे पूर्वतयारी होईपर्यंत मी सत्याचा आग्रह धरणार नाही असे म्हणण्यासारखे आहे आणि ते हास्यास्पद आहे.

गांधीजींनी भारतीय माणसाला त्याची प्रतिष्ठा, स्वाभिमान आणि लढण्याची शक्ती दिली. उज्ज्वल भूतकालाच्या स्मृतीवर ही प्रतिष्ठा आधारलेली नव्हती; किंवा उज्ज्वल भविष्याचे वाहक आपण आहो ह्या दाव्यावरही ती आधारलेली नव्हती. माणूस म्हणून आपल्या प्रकृतीशी इमान राखत आपण अन्यायाविरुद्ध ठामपणे उभे राहू शकतो ह्या प्रत्ययावर आधारलेली होती. अशा जगण्यातूनच आपल्या माणुसकीचा, आपल्यातील दिव्य तत्त्वाचा परिपोष होतो. सत्य हे कधीतरी प्राप्त करून घ्यायचे आहे असे साध्य नव्हे. सत्याची साधना आता आणि तेथे, प्रत्येक क्षणी करायची असते. आणि या साधनेतूनच आपण आपल्याला आणि इतरांना सुधारतो.

### भिन्न परंपरांची जवळीक

सत्याची साधना करायची तर, स्वार्थ सोडला पाहिजे. माणसाला जगण्यासाठी सामग्री लागते. पण आपण संपत्तीचा संग्रह केला तर, तो सुरक्षित राखण्यासाठी, वाढविण्यासाठी इतरांवर अन्याय करायला आपण प्रवृत्त होऊ. सुखाची लालसा वाढली तर, सत्याच्या साधनेपासून आपण विचलीत होऊ. तेव्हा सत्याचा साधक म्हणून जगण्यासाठी जेवढे आवश्यक असेल तेवढेच आपण घ्यावे. ह्यापेक्षा अधिक घेणे म्हणजे चोरी करण्यासारखे आहे. जे आपले नाही ते हस्तगत करण्यासारखे आहे. ह्या साऱ्या विचाराला अध्यात्मिक बैठक आहे ह्यात शंका नाही. पण ह्यामागचे एक तत्त्व असे, की आर्थिक व्यवस्था ही अनेक अर्थशास्त्रज्ञ मानतात तशी स्वायत्त नसते. माणसाचा साराच आर्थिक व्यवहार, संपत्तीचे उत्पादन व वाटप, हा चांगले जीवन जगण्याचाच एक भाग असतो व त्याचे एक साधन असते. संपत्तीची बेदरकारपणे निर्मिती करणे व तिचा बेदरकारपणे उपभोग घेणे म्हणजे माणसाच्या प्रकृतीशी आणि मानवेतर विश्वाशी केलेला द्रोह आहे.

चांगले जीवन म्हणजे सत्याला वाहिलेले जीवन. सत्याचा साधक स्वयंशासक आणि स्वयंशासित असतो. अशा व्यक्तींचा समाज सहकार्यावरच आधारता येतो. त्याची अर्थव्यवस्था त्याच्या ह्या स्वरूपाला अनुरूप असावी लागते. रॉय आणि गांधी हे भिन्न वैचारिक परंपरांतून आलेले दोन महापुरुष. पण व्यावहारिक पातळीवर ते एकमेकांच्या किती जवळ आले आहेत हे पाहून आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाही.



# तर्कतीर्थांचे धर्मचिंतन - शोध व बोध

शं० रा० तळघट्टी

१. माणसाच्या व्यक्तिगत व सामाजिक जीवनाचे नियंत्रण करणारी 'धर्म' ही मूलभूत, व्यापक आणि सामर्थ्यसंपन्न संस्था असल्याचे मानवेतिहासावरून आपणास दिसून येते. जगातील सर्व प्रदेशांमध्ये, इतिहासपूर्व काळापासून आजतागायत, आढळून येणाऱ्या सर्व मानवी समाजांमध्ये या ना त्या स्वरूपात धर्म प्रभावी असल्याचे आपणास इतिहास सांगतो. याची कारणे दोन - अ) धर्म-भावना ही मानवी स्वभावातच अंगभूतपणे वास करते. *"धर्मो हि एको अधिको विशेषो । धर्मेण हीनाः पशुभिः समानाः ।।"* या सुभाषितात मानव प्राण्याचे वैशिष्ट्य म्हणूनच तिचा उल्लेख केला आहे. ब) दुसरी गोष्ट म्हणजे सुस्थिर समाज-जीवनासाठी धर्माची असलेली आवश्यकता (निदान धर्म आवश्यक असल्याची समाजघटकांची धारणा.) ही धारणा व्यक्त करणारे प्रसिद्ध वचन म्हणजे - *"धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा ।"*. या कारणांनी धर्माला मानवी जीवनात व परिणामतः मानवी संस्कृतीमध्ये, केंद्रवर्ती स्थान प्राप्त होणे साहजिकच म्हणावे लागेल. अशा 'धर्माला', 'संस्कृती'सह, आपल्या आयुष्यभरच्या चिंतनाचा मुख्य विषय म्हणून निवडण्यात तर्कतीर्थांची मर्मग्राही आणि विवेकी दृष्टी दिसून येते. इतरही काही विचारवंतांच्या चिंतनाचा 'धर्म' हा विषय असल्याचे दिसते. - उदा. : म.म. काणे, विद्वद्रत्न दफ्तरी, न्या. रानडे, विवेकानंद इत्यादी. तर्कतीर्थांनी त्यांचा संक्षिप्त परामर्शही घेतला आहे. (हिंदु, स. प्र. २). परंतु विचारवंत म्हणून तर्कतीर्थांचे स्वतंत्रप्रज्ञ धर्म-चिंतन या सर्व विचारवंतांमध्ये उठून दिसणारे आहे. शास्त्रीजींच्या मते इतरांच्या चिंतनात "धर्मतत्त्वांची बुद्धिवादी व मूलगामी चिकित्सा नाही" (पृ. ८६). ती त्यांनी केली आहे. त्यांच्या विचारांना येथे "धर्म-चिंतन" असे म्हटले असले तरी त्यांनी स्वतः आपल्या ग्रंथांना "धर्म समीक्षा" असे नाव दिले आहे. याचा अर्थ त्यांचे चिंतन समीक्षात्मक आहे. त्यांचे मुख्य ग्रंथ दोन - (एक) हिंदुधर्माची समीक्षा; व (दोन) सर्वधर्मसमीक्षा. पण माझ्या दृष्टीने "वैदिक संस्कृतीचा विकास" हा त्यांचा ग्रंथही तितकाच महत्त्वाचा आहे. एवढेच नव्हे तर १९२८ साली प्रसिद्ध झालेला "आनंदमीमांसा" हा लघुकाय पण गुणाने मोठा ग्रंथही त्यांचे चिंतन समर्थपणे आविष्कृत करतो. समीक्षा ही द्विविध असल्याचे दिसते. एक प्रकार म्हणजे समीक्ष्य विषयाचे परीक्षण करून त्यातील गुण आणि दोष दोन्ही दाखवून द्यायचे. दुसरा प्रकार - हा केवळ टीकात्मक; म्हणजे त्यात समीक्ष्य विषयातील केवळ दोष दाखवून द्यायचे. मराठी भाषेत टीकेचा अर्थच ही दुसऱ्या प्रकारची समीक्षा असा होतो. सामान्यपणे वैचारिक टीक करताना एका विशिष्ट तात्त्विक वा तत्सम वैचारिक भूमिका स्वीकारून त्या दृष्टिकोनातून ती (टीका) केली जाते. तर्कतीर्थांचा 'हिंदुधर्माची समीक्षा' हा ग्रंथ अशा प्रकारच्या टीकात्मक समीक्षेचा उत्कृष्ट नमुना आहे. 'हिंदुधर्मावर टीका करणे हे फारच जबाबदारीचे व अवघड काम आहे.'- (प्रास्ताविक पृ. २) असे स्वतः शास्त्रीजी म्हणतात. परंतु ऐतिहासिक जबाबदारी म्हणून त्यांनी हे काम स्वीकारले व परखडपणे हिंदुधर्मातील दोषांचे दिग्दर्शन केले आहे. या प्रकारच्या नकारात्मक (टीकात्मक) समीक्षेची एक अंगभूत उणीव ही आहे की, ज्या वैचारिक भूमिकेवरून टीका केली जाते ती भूमिकाच जर निर्दोष नसेल तर केलेली टीका पण सदोष असते. एक प्रकारचा अभिनिवेश त्यात शिरण्याची शक्यता असते. तसे घडले तर निष्कर्ष हे एकांगी स्वरूप धारण करतात. 'हिंदुधर्माची समीक्षा' या ग्रंथामध्ये हिंदुधर्मावर जी टीका केली आहे ती मार्क्सवादाच्या भूमिकेतून. ही भूमिका म्हणजे ऐतिहासिक भौतिकवाद (Historical Materialism) पहिल्याच व्याख्यानात शास्त्रीजींनी 'ऐतिहासिक धर्मसमीक्षेची तत्त्वप्रणाली' स्पष्ट केली आहे. तिची चर्चा येथे प्रस्तुत नाही. येथील मुद्दा एवढाच की, ही तत्त्वप्रणाली जर सदोष असेल तर त्याआधारे केलेल्या समीक्षेचे निष्कर्षही सदोष असणार.

या पार्श्वभूमीवर 'वैदिक संस्कृतीचा विकास' आणि 'सर्वधर्मसमीक्षा' या ग्रंथांमधील शास्त्रीजींचे विवेचन अधिक समतोल व मर्मग्राही असल्याचे दिसून येते. पहिल्या प्रकारच्या

अनुक्रमणिका






समीक्षेचा तो उत्कृष्ट नमुना म्हणावा लागेल. हिंदुधर्म आणि संस्कृतीमधील विविध संस्था, त्यामागील विचारसरणी आणि एकूणच त्यांचे ऐतिहासिक कार्य, शास्त्रशुद्ध पद्धतीने समजून घेण्याचा व देण्याचा साधार व सक्षम प्रयत्न शास्त्रीजींनी यशस्वीपणे केल्याचे या ग्रंथामधून दिसून येते. विषयाची व्याप्ती फारच मोठी आहे. तथापि अनेक शास्त्रांच्या मूलगामी अध्ययनाने संस्कारित झालेली तर्कतीर्थांची प्रज्ञा (व प्रतिभा) या विषयाला न्याय देऊ शकेल एवढी प्रगल्भ व व्यापक असल्याचे ग्रंथ वाचताना जाणवते. त्यांचे ज्ञानमय तप निश्चितच प्रखर आहे. हिंदुधर्माचे व संस्कृतीचे अंतरंग उलगडून दाखविण्याचे सामर्थ्य अशा तपोवृद्ध ज्ञान्यांमध्येच असू शकते.

२) 'हिंदुधर्माची समीक्षा' या ग्रंथातील धर्मचिंतन हे मार्क्सवादाच्या प्रभावाखाली झाले होते. परंतु मी याआधी म्हटल्याप्रमाणे ही भूमिकाच जर सदोष असेल तर टीका व चिंतनही सदोष होणार. मार्क्सवादी गृहीतकृत्याच्या मर्यादांची जाणीव झाल्यानंतरचे त्यांचे धर्मचिंतन अन्य ग्रंथात असल्याने ते मुक्त व समतोल झाले आहे. वैचारिक प्रामाणिकपणा असल्याशिवाय वैचारिक विकास होत नाही, याची साक्ष स्वतः शास्त्रीजींनी 'वैदिक संस्कृतीचा विकास' या ग्रंथाच्या प्रस्तावनेत दिली आहे. ते म्हणतात, "भारतीय संस्कृतीची टीकाप्रधान मीमांसा आम्ही 'हिंदुधर्माची समीक्षा' या पुस्तकात पूर्वी केलेली होती. त्यातील दृष्टिकोन व या निबंधातील दृष्टिकोन यांत फरक आहे. 'हिंदुधर्माची समीक्षा' या पुस्तकावर मार्क्सवादी विवेचनपद्धतीचा प्रभाव अधिक आहे. वर्ग-विग्रहाच्या तत्त्वाची पकड त्यावर अधिक आहे. मानवी विचारांना भौतिक वा आर्थिक उत्पादनपद्धतीच्या मर्यादांचे बंधन वाजवीपेक्षा अधिक प्रमाणात त्यात मानले आहे. उलट, या निबंधात अध्यात्मिक किंवा वैचारिक स्थिर मूल्यांची शक्ती समाजातील भौतिक प्रवृत्तीवर आधिपत्य गाजवू शकते या कल्पनेला महत्त्व दिले आहे. आर्थिक उत्पादनपद्धतीत अनेक स्थित्यंतरे झाली तरी युगानुयुगे आपले सामर्थ्य किंवा प्रभुत्व टिकवणारीही काही मानसिक मूल्ये असू शकतात; या तत्त्वाची जाणीव ठेवून हा निबंध लिहिला आहे." (पृ. ३) याचा अर्थ तर्कतीर्थांचे विकसित धर्मचिंतन हे 'वैदिक संस्कृतीचा विकास' आणि 'सर्वधर्मसमीक्षा' या उत्तरकालीन ग्रंथांमध्ये पाहावयास मिळते. अर्थात, एक तात्त्विक समीक्षा या दृष्टीने 'हिंदुधर्माची समीक्षा' या पुस्तकाचे महत्त्व अभ्यासकांना निश्चितच वाटत राहील. त्यामधील धर्मचिंतनासंबंधी जे काही प्रश्न उपस्थित होतात त्यांची चर्चा तात्त्विकदृष्ट्या उपयुक्त ठरेल; म्हणूनच केवळ काही महत्त्वाचे प्रश्न मी आपणासमोर मांडू इच्छितो. अर्थातच पहिला प्रश्न समोर येतो तो धर्मसमीक्षेच्या पद्धतीसंबंधी. संस्कृती ही व्यापक संकल्पना आहे. धर्म हे तिच्या वैचारिक वा अध्यात्मिक आविष्काराचे केंद्रवर्ती स्वरूप आहे. तथापि समकक्ष नसल्या तरी समलक्षण संकल्पना म्हणून धर्म व संस्कृती यांच्या समीक्षेमध्ये मूलभूत भिन्नता असणार नाही असे म्हणता येते. शास्त्रीजींना ही गोष्ट मान्य असावी असे त्यांच्या पूर्वोक्त अवतरणावरून दिसून येते.

३) शास्त्रीजींनी धर्मसमीक्षेची ऐतिहासिक पद्धती स्वीकारली आहे आणि हीच पद्धती सर्वांत अधिक योग्य व पुरेशी असल्याची त्यांची धारणा आहे. समाज व त्याची सर्व अंगे इतिहासबद्ध आहेत. धर्म ही हीन अवस्थेपासून उच्च अवस्थेपर्यंत विकास पावलेली ऐतिहासिक घटनांची मालिकाच आहे. त्यातील प्रत्येक विशिष्ट दुवा व त्या सर्व दुव्यांमधील कार्यकारणभाव केवळ बुद्धीच्या साहाय्याने अवगत करून घेणे हे ऐतिहासिक समीक्षेचे स्वरूप आहे. (पृ.३) तिच्या तीन बाजू अशा - अ) धर्मतत्त्वांचे सत्यत्व; ब) धर्मसंस्थांचे ऐतिहासिक प्रयोजन आणि क) धर्मतत्त्वांचा व संस्थांचा ऐतिहासिक कार्यकारणभाव (पृ.११). सामान्य ऐतिहासिक पद्धतीचे स्वरूप थोडक्यात असे आहे. ही पद्धती धर्म वा संस्कृतीचे ऐतिहासिक ज्ञान करून देण्यास निश्चितच उपयुक्त आहे. त्याद्वारा धार्मिक विकासक्रमाचे ऐतिहासिक कारणांसह स्वरूप अवगत होते. या संबंधात प्रश्न असा निर्माण होतो की, हे ऐतिहासिक ज्ञान धर्मांचे सर्वांगीण ज्ञान करून देण्यास पुरेसे आहे काय? धर्म ही अत्यंत गुंतागुंतीची संकीर्ण 'संस्था' आहे. विचार, भावना आणि कृती हे मानवी व्यक्तिमत्त्वाचे तीनही घटक धर्माच्या उद्‌गम आणि विकासाशी आवश्यकपणे संबंधित आहेत. 'धर्मा'मध्ये जसे मानवाचे ज्ञान व्यक्त होते तसेच मानवाच्या आशा, आकांक्षा, मूल्ये, ध्येयवाद इत्यादी गोष्टीही त्यात प्रतिबिंबित झालेल्या असतात. त्यामुळे तौलनिक धर्ममीमांसेचे साहाय्य घेऊनही ऐतिहासिक ज्ञान हे धर्माचे, धर्मभावनेचे अंतरंग पूर्णपणे उलगडून दाखवू शकेल असे वाटत नाही. त्यासाठी निदान धर्माचे मानसशास्त्र समजून घेणे नितांत आवश्यक आहे. याचा अर्थ, ऐतिहासिक समीक्षेप्रमाणेच धर्माची

मानसशास्त्रीय समीक्षा करणे आवश्यक आहे. एका अर्थाने ती अधिक महत्त्वाची म्हणता येईल. कारण ऐतिहासिक घटनांमागे मानवी मन सक्रीय असते. बाह्य आचार वा संस्था म्हणजे माणसाच्या मानसिकतेचे केवळ आविष्कार असतात. संभवतः ऐतिहासिक भौतिकवादाच्या प्रभावाखाली येण्यापूर्वी लिहिलेल्या 'आनंदमीमांसा' या महत्त्वपूर्ण पुस्तकात स्वतः तर्कतीर्थांनी तात्त्विक सिद्धान्ताच्या परीक्षणाच्या तीन रीती सांगितल्या आहेत. विशेष म्हणजे त्यांत ऐतिहासिक पद्धतीचा उल्लेख नाही. त्या पद्धती म्हणजे - अ) प्रमाणांनी वस्तूची किंवा विषयाची सिद्धी, म्हणजे प्रमाणपद्धती. ब) मानसशास्त्रीय परीक्षण, म्हणजे मानसिक पद्धती. क) नीतिशास्त्रीय परीक्षण, म्हणजे नैतिक पद्धती. (पृ.५). पुढे ते असे सांगतात की, आनंदसिद्धांताचा विचार मुख्यतः दुसऱ्या व तिसऱ्या पद्धतीने करावयाचा आहे. येथे ही गोष्ट सांगणे आवश्यक आहे की, शास्त्रीजींनी 'आनंदमीमासा' ग्रंथात मीमांसा केली आहे ती औपनिषदिक आनंदसिद्धांतांची; आणि तो *'जयिष्णु आर्यांच्या वेदांतातील परम सिद्धान्त'* असल्याचे ते सांगतात (पृ.४). पहिल्या प्रमाणपद्धतीने आनंदमय तत्त्वाचे परीक्षण करता येत नाही हे सांगताना ते म्हणतात - 'प्रमाणाने किंवा तर्काने आनंदमय तत्त्वाचे परीक्षण करण्याची शक्ती प्रस्तुत लेखकाचे ठायी नाही. *'नैषा तर्केण मतिरापनेया*। (कठ. १-२-९)' हे तर्कतीर्थांचे विधान आहे! ही गोष्ट धर्मसमीक्षेला विशेषत्वे लागू होते. कारण हे 'आनंदमय तत्त्वच' हिंदुंच्या धर्मसंकल्पनेचा मूलाधार आहे. पुरुषार्थ, अभ्युदय, निःश्रेयस या सर्व मूल्यात्म संकल्पनांचा आनंदमयतत्त्वाशी साक्षात संबंध आहे, आणि धार्मिक जीवन हे मूल्यांकित जीवन आहे. या संदर्भात 'भव्य' धर्म आणि 'भूतवस्तु' ब्रह्म यांच्या स्वरूपातील शंकराचार्यांनी दाखवून दिलेली भिन्नता विशेष महत्त्वाची आहे. तात्पर्य, धर्मपरीक्षणासाठी मानसशास्त्रीय व नैतिक पद्धती मौलिक महत्त्वाच्या आहेत.

सामान्य ऐतिहासिक पद्धतीसंबंधी एवढे सांगितल्यावर - ऐतिहासिक भौतिकवादासंबंधीची शास्त्रीजींची बदललेली भूमिका थोडक्यात पाहू. "आर्थिक पद्धती हा संस्कृतीचा प्राण आहे असे मार्क्सचे म्हणणे आहे. संस्कृतीच्या सर्व अंगांची प्रगती आर्थिक प्रगतीचे आनुषंगिक पर्यवसान होय. असे त्याच्या म्हणण्याचे तात्पर्य आहे... हा मार्क्सवादी दृष्टिकोन दिसण्यात फार सुसंबद्ध दिसतो. परंतु इतिहासाची साक्ष आणि तात्त्विक पृथक्करण यांचा यास पूर्ण पाठिंबा मिळत नाही... म्हणून अर्थमूलक सर्वांगीण प्रगतीची कल्पना तपशीलवार तपासली असता निर्दोष ठरत नाही." (वैदिक संस्कृतीचा विकास, आ.१ ली, पृ. ११-१२). त्यांचे स्वतःचे मत आहे - "परंपरेने प्राप्त झालेल्या उच्चतम मूल्यांच्या संरक्षणाने आणि नवीन उच्चतम मूल्यांच्या आविष्कारानेच संस्कृतीची प्रगती होत असते." (पृ.१२). हेच त्यांच्या धर्मचिंतनाचेही सूत्र असल्याचे दिसून येते. धर्म व संस्कृतिविषयक अनेक महत्त्वाच्या विषयांचा त्यांनी ऊहापोह केला आहे. त्या सर्वांचा परामर्श घेणे शक्य नाही. त्यांपैकी काहींच्या आधारे शास्त्रीजींच्या चिंतनाचा मागोवा घेऊ.

४) धर्ममीमांसेमध्ये धर्मलक्षण व धर्मप्रमाण हे दोन विषय सर्वाधिक महत्त्वाचे आहेत. प्रारंभीच एक प्रश्न निर्माण होतो. तो 'धर्म' या संज्ञेविषयी. इंग्रजी 'रिलिजन' आणि भारतीय हिंदू परंपरेतील 'धर्म' सांकल्पनिक दृष्ट्या एकच आहेत का? विशेषतः धर्माचे पुरुषार्थ म्हणून जे स्वरूप आहे त्याचा गाभा 'नीती' - (नैतिक मूल्ये, नैतिक नियम व कर्तव्ये इ.) हा आहे. धर्माचे दुसरे रूप 'ईश्वरोपासनापंथ' हे आहे. ख्रिश्चन, इस्लाम या ऐतिहासिक धर्मांप्रमाणेच (रिलिजन) 'हिंदू' हाही एक धर्म आहे असे गृहीत धरून 'रिलिजन' आणि 'धर्म' हे एकार्थक आहेत असे सामान्यपणे मानले जाते. तर्कतीर्थांनी या प्रश्नाची स्पष्टपणे चर्चा करून काही निष्कर्ष काढल्याचे दिसत नाही. मात्र धर्मविकासाचे तीन स्तर हिंदुधर्मात सापडतात असे ते म्हणतात; ते स्तर म्हणजे - अ) जादू, निसर्ग-भूत-पितृ, पूजा; ब) मानवसदृश देवतासमूह पूजा व शक्ती-पूजा; क) एकेश्वरवाद, ब्रह्मवाद व तत्त्ववाद (हिंदु, समीक्षा पृ.११३). त्यांच्या मते "एकेश्वर व सर्वेश्वर मानणारा भक्तिसंप्रदायच धर्मसंस्थेची खरी परिणती होय." (पृ.१२२) मला असे वाटते की, सांकल्पनिक सुस्पष्टतेच्या दृष्टीने 'धर्म' आणि 'रिलिजन' यांच्यामध्ये, आणि 'रिलिजन' या दृष्टीने 'हिंदू' व 'ख्रिश्चन', 'इस्लाम' हे प्रेषित-धर्म यांच्यामधील भेदांचे स्वरूप जाणणे इष्ट होईल.

या संदर्भात आणखी एका ऐतिहासिक स्वरूपाच्या प्रश्नाचा उल्लेख करणे आवश्यक आहे. आज ज्या धर्माला आपण 'हिंदुधर्म' या नावाने ओळखतो त्याला प्राचीन काळी केवळ 'धर्म' या सामान्य नावानेच उल्लेखिलेले आढळते. त्याला 'हिंदू' हे नामाभिधान केव्हा, कसे व कोणत्या अर्थाने प्राप्त








झाले, याचा ऐतिहासिक आढावा हिंदुधर्माच्या स्वरूपावर प्रकाश टाकू शकेल. शास्त्रीजींच्या समीक्षेमध्ये या प्रश्नाचाही ऊहापोह आढळत नाही. मात्र 'संस्कृती'संबंधात ते म्हणतात - "भारतीय संस्कृती म्हणजे मुख्यतः हिंदुसंस्कृती होय... हिंदुसंस्कृती ही वैदिक संस्कृतीचेच विस्तार पावलेले स्वरूप होय. वैदिक संस्कृतीच्या परिणत ध्येयवादाच्या प्रेरणेने हिंदुसंस्कृती निर्माण झाली आहे." (वैदिक सं. विकास, प्रस्तावना, पृ.१३). याचा अर्थ हा 'धर्म', 'वैदिक धर्म' होय. कर्मकांड, उपासनाकांड आणि औपनिषदिक ज्ञानकांड या रूपांत विकसित होऊन तो विश्वात्मक धर्मात परिणत झालेला दिसतो.

शास्त्रीजींनी स्वतः सांगितलेले धर्माचे सामान्य लक्षण असे - "अलौकिक शक्तीच्या कल्पनेवर आधारलेले व श्रेयस्कर मानलेले मानवी आचरण म्हणजे धर्म." (हिंदु, सं.पृ.५८). येथे श्रेयस म्हणजे व्यक्तीचे, वर्गाचे किंवा समाजाचे हित. सामान्यपणे ईश्वराच्या (देवतेच्या) रूपात शक्तीची कल्पना केली जाते. येथे मुख्यतः भक्ती वा उपासनामार्गाचा अवलंब करून ईश्वरी शक्तीला प्रसन्न करून घेण्यासाठी कराव्या लागणाऱ्या आचरणाला - क्रियांना - धर्म म्हटले आहे. या अर्थाचा विस्तार करून असे म्हणता येईल की, शक्तिउपासनेद्वारा व्यक्ती व समाजाचे हित साधणारे आचरण म्हणजे धर्म. 'हित' ही संकल्पना धर्मविचारात केंद्रवर्ती आहे असे दिसून येते. पण शास्त्रीजींचा भर आहे तो 'अलौकिका'वर. तेथे श्रद्धेला अवसर प्राप्त होतो. सुधारलेल्या धर्माविषयी ते सांगतात की "नैतिक आचरण (सद्‌गुण) हा त्याचा गाभा आहे. परंतु त्यांच्या मते सगळ्या धर्मसंस्था नीतीची स्थापना अलौकिक शक्तीच्या अधिष्ठानावरच करतात, आणि नीतीचा संबंध पारलौकिक जीवनाशी जोडतात." (पृ.५९). प्रस्तुत विवेचनात 'अलौकिक' ही संकल्पना केंद्रवर्ती आहे. तिचे स्वरूप शास्त्रीजींच्या शब्दांत असे- "तर्कशास्त्राच्या नियमांच्या आधारे बुद्धिद्वारा किंवा अनुभवाने व प्रयोगाने, ज्या वस्तूंची तपासणी करीता येत नाही अशा वस्तू अलौकिक होत." (पृ.६०). अमर आत्मा, देवता, ईश्वर, निर्गुण ब्रह्म, अपूर्व मंत्रसामर्थ्य, नरक, मोक्ष इत्यादी धर्मशास्त्रोक्त वस्तू बुद्धिगम्य नसल्याने अलौकिक होत. आणि 'बुद्धिगम्य' याचा अर्थ विज्ञानातील वस्तूंच्या अवगतीसाठी जी वौद्धिक पद्धती वापरतो तिने गम्य. थोडक्यात विज्ञानाव्यतिरिक्त अन्य क्षेत्रेही कमी-अधिक प्रमाणात अलौकिक वस्तूंचा संग्रह करतात, असा याचा अर्थ होता. या मतांचे परीक्षण मी येथे करणार नाही; एवढेच म्हणेन की, मानवी लौकिक जीवन हे केवळ विज्ञानापुरते मर्यादित नाही. मूल्यांचे विश्व हे कदाचित वैज्ञानिक विश्वापेक्षा मानवी हिताच्या दृष्टीने अधिक महत्त्वपूर्ण असेल. स्वतः शास्त्रीजींनी - 'संस्कृती' संकल्पनेची व्यापकता दाखवून तिच्या विकासाची मीमांसाही विस्तृतपणे केली आहे. मुख्य प्रश्न असा, की धर्माचे लक्षण 'पारलौकिका'शी आवश्यकपणे संबद्ध आहे का? 'धर्म' हा 'रिलिजन' असलाच पाहिजे काय? या दृष्टीने महाभारत व वैशेषिक सूत्र यांनी केलेले धर्माचे लक्षण विशेष चिंतनीय आहे. ते थोडक्यात पाहू.

*"धारणात् धर्ममित्याहुः ।"* हे वचन सर्वज्ञात आहे. प्रजेचे, समाजाचे धारण करतो तो धर्म... पुढे लागलीच 'अहिंसा' व 'प्रभव' ही धर्माची लक्षणे व्यासांनी सांगितली आहेत. धारण व प्रभव (याचा अर्थ 'विस्तारवाढसामर्थ्य' असा शास्त्रीजी करतात) मिळून 'अभ्युदय' असा एक शब्द वापरता येईल. महत्त्वाची गोष्ट म्हणजे धर्माचे प्रयोजन 'लोकयात्रा' म्हणजे लोकव्यवहार नीट चालविणे हे आहे असे व्यास सांगतात - *"लोकयात्रार्थमेवहे धर्मस्य नियमः कृतः ।"* शास्त्रीजींनी तळटीपेत *"लोकव्यवहार-स्थापनं धर्मशास्त्रस्य विषयः ।"* (न्यायभाष्य, ४।१।६२) हे वचन उद्‌धृत केले आहे. (पाहा - हिंदु, स.पृ.६६). त्यांचा निष्कर्ष असा, की व्यासांची धर्मविचारांची भूमिका बुद्धिवादी होती आणि त्याकाळी धर्ममीमांसा ही समाजधारणशास्त्र बनण्याच्या मार्गास लागली होती.

दुसरी प्रसिद्ध व्याख्या वैशेषिक सूत्रात केली आहे ती म्हणजे *"यतः अभ्युदयनिःश्रेयससिद्धिः स धर्मः ।"* ज्याच्या योगे अभ्युदय व निःश्रेयस प्राप्ती होते तो धर्म होय. तर्कतीर्थांच्या मते अभ्युदय म्हणजे ऐहिक किंवा पारलौकिक आनंद व त्याची साधने. आणि निःश्रेयस म्हणजे मोक्ष, शाश्वत किंवा सर्वोच्च अंतिम साध्य. ज्या स्थितीत कशाचीच अपेक्षा राहात नाही, व संपूर्ण समाधान होते अशी स्थिती निःश्रेयस होय. पुरुषार्थाच्या भाषेत अर्थ-काम म्हणजे अभ्युदय, आणि मोक्ष म्हणजे निःश्रेयस असे म्हणता येईल. दोहोंच्याही प्राप्तीसाठी 'धर्म' आवश्यक आहे. दोहोंचेही स्वरूप व्यक्तिगत व सामाजिक हित, कल्याण असे असून त्याचा आशय, 'सुख' वा 'आनंद' हाच आहे. *"सुखं वांछन्ति सर्वेहि तच्च धर्मसमुद्‌भवम् ।"* असे

दक्षस्मृतीत स्पष्ट विधान आहे. *"धर्मात् अर्थश्च कामश्च।"* असे महाभारतकार सांगतात. अहिंसा, सत्य, अपरिग्रह, दान, दया, प्रेम, इत्यादी सद्गुणांच्या समुच्चयाला 'धर्म' असे म्हटले आहे ते याच कारणाने. ही धर्माची उच्च नैतिक संकल्पनाच हिंदुधर्माने प्रमाण मानली आहे. त्यानुसार 'सर्वभूतहितेरताः' असे साधु-संत हे धर्म-मूर्ती होत. यात अलौकिक काही नाही.

५. धर्मप्रमाणविचार हा अत्यंत महत्त्वाचा विषय आहे परंतु प्रस्तुत निबंधाच्या मर्यादेत त्याची चर्चा करणे अशक्यप्राय आहे. एकाच मुद्द्याचा थोडक्यात परामर्श घेऊ; तो मुद्दा आहे शब्दप्रामाण्याचा. धर्माचे (अधर्माचे) ज्ञान धर्मग्रंथ वा धर्मज्ञ पुरुष यांच्या रूपातील शब्दप्रमाणाने होते, असे मानले जाते. *"वेदोऽखिलो धर्ममूलं"* हे मनूचे विधान प्रसिद्ध आहे. तसेच *"चोदना लक्षणोऽर्थो धर्मः।"* ही पूर्वमीमांसेतील व्याख्याही धर्माचे वेदमूलत्व व्यक्त करते. परंतु स्मृतींमध्ये श्रुतीबरोबर अन्य ज्ञापकांचाही उल्लेख आहे. उदा. *"वेदोखिलो धर्ममूलं स्मृतिशीले च तद्विदाम्। आचारश्चैव साधूनां आत्मनस्तुष्टिरेव च।।"* (मनु.२-६) किंवा *"वेदः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः।"* याच्या जोडीला याज्ञवल्क्यस्मृतीने *"सम्यक् संकल्पजः कामो"* चाही उल्लेख केला आहे. धर्माचे तत्त्व अत्यंत गहन - सुदुर्विज्ञेय- असल्यामुळे 'एकसे भले चार' असे ज्ञापक उल्लेखिले आहेत. त्यांच्यामध्ये परस्परमेळ गृहीत आहे. मात्र 'आचार'- अर्थात सद्विचार व सद्भावनापूर्वक सदाचार ही खरी धर्माची (धार्मिकतेची) कसोटी आहे. महाभारताच्या शांतिपर्वातील धर्ममीमांसेचा गौरव तर्कतीर्थांनी स्वतःच केला आहे. (पृ. ७८-८९). त्यातील एक श्लोक विशेषत्वाने उल्लेखनीय आहे - *"सर्वेषां यः सुहृद् नित्यं सर्वेषां च हिते रतः। कर्मणा मनसा वाचा स धर्मं वेद जाजले।।"* (२६२.९) यावर भाष्य करण्याची आवश्यकता नाही.

या संदर्भात आत्मज्ञानविषयक प्रतीतित्रयाचा उल्लेख समर्पक व उद्बोधक होईल. शास्त्रप्रतीती, गुरुप्रतीती आणि आत्मप्रतीती अशा तीन प्रतीतींचा उल्लेख वेदांतात होतो. धर्मप्रमाणाच्या संदर्भातही त्या महत्त्वाच्या आहेत. 'वेद' म्हणजे शास्त्रप्रतीती. *"तस्मात शास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्य व्यवस्थितौ।।"* हे गीतावचन ध्यानात घ्यावे. याचा अर्थ खऱ्या अर्थाने 'वेद-प्रामाण्य' म्हणजे 'शास्त्र-प्रामाण्य' होय. 'आधी केले मग सांगितले' या न्यायाने ज्या सत्पुरुषांनी धर्मतत्त्वे स्वानुभवाने जाणून त्यांच्या सत्यतेची प्रतीती घेतली व मगच जिज्ञासूंना ती सांगितली ते सद्गुरू. महाभारताच्या पूर्वोक्त श्लोकात त्याचे वर्णन आहे. ही गुरुप्रतीती. परंतु शेवटी शास्त्र व गुरू यांच्याकडून प्राप्त झालेल्या ज्ञानाची सत्यासत्यता स्वतःच्या अनुभवाने जाणणे - त्यासाठी श्रवण-मनन-निदिध्यासन (किंवा आचार) यांचा उपयोग करणे ही आत्मप्रतीती. हे अंतिम प्रमाण खरे तर संत म्हणजेच चालता-बोलता धर्म!

६. कर्मसिद्धांत आणि वर्णाश्रमव्यवस्था ही दोन हिंदुधर्माची वैशिष्ट्ये मानली जातात व त्यांवर टीकाही होते. त्यांची सविस्तर चर्चा स्वतंत्रपणे करणे इष्ट आहे. त्यामुळे येथे मी त्यांची चर्चा करणार नाही. त्यांच्यासंबंधी माझी धारणा अशी आहे की, मानवी जीवनासंबंधीच्या अनेक प्रश्नांची उत्तरे शोधताना मांडलेली 'कर्मसिद्धांत'ही स्पष्टीकरणात्मक सिद्धांतसंकल्पना (एक्स्प्लनेटरी हायपोथेसिस) आहे; आणि 'वर्ण'संकल्पना म्हणजे मानसशास्त्रीय 'व्यक्तिमत्त्व-प्रकार' (पर्सनॅलिटी टाइप) ची संकल्पना आहे. .

प्रस्तुत निबंधाला पूर्णविराम देण्यापूर्वी एका अत्यंत महत्त्वपूर्ण विषयाला स्पर्श करणे आवश्यक आहे. तो विषय म्हणजे भागवत धर्म. धर्मसमीक्षेमध्ये शास्त्रीजींनी जरी त्याची दखल घेतलेली नसली तरी वैदिक-संस्कृतीच्या विकासाचा साक्षेपी आढावा घेताना त्यांनी 'भागवत धर्माचे तात्त्विक समालोचन' संक्षेपाने का होईना केले आहे. वैदिक धर्माचाच तो विकास असल्याचे ते सांगतात. (पृ. १६१) माझ्या मते हिंदूंच्या धर्मसंकल्पनेचा, ईश्वरोपासना व नैतिकता या दोन्ही अंगांनी झालेला उत्कृष्ट आविष्कार म्हणजे भागवत धर्म. महाराष्ट्रीय संतांच्या वाङ्मयात आढळणारी त्याची मांडणी अत्यंत उद्बोधक व मनोज्ञ आहे. *'आत्मनो मोक्षार्थं जगत् हिताय च'* प्रतिपादलेल्या वैश्विक धर्माचे स्वरूप त्यातून आपल्या दिव्यत्वाने प्रकट झालेले दिसते. ज्ञानेश्वरांच्या दार्शनिक भूमिकेचे विस्तृत विवेचन मी 'ज्ञानेश्वर विचारदर्शन' या पुस्तकातील लेखांमधून केले आहे. वैदिक कल्पतरूला लागलेले भागवतधर्म हे परिपक्व अमृत फल आहे असे जे भागवत महापुराणाच्या प्रारंभीच म्हटले आहे ते यथार्थ आहे. मुळात श्रीमद्भगवद्गीतेतच मनुष्यपणास -अभ्युदय निःश्रेयसाची प्राप्ती करून देणाऱ्या या विश्व-धर्माची प्रवृत्ती-निवृत्ती या दोन्ही अंगाने मांडणी केली आहे. ज्ञानेश्वरी म्हणजे, नामदेवांच्या शब्दांत *"गीताअलंकार नाम ज्ञानेश्वरी। ब्रह्मानंदलहरी प्रगट*

*केली* ।।" स्वतः तर्कतीर्थांनी 'सर्वधर्म समीक्षे'च्या प्रस्तावनेत हिंदुधर्म व गीता यांच्याविषयी काढलेले उद्गार महत्त्वाचे आहेत. ते म्हणतात - "हिंदुधर्मातील धार्मिक तत्त्वज्ञान धार्मिक निग्रहातून मानवी समाजांना मुक्त करणारा दृष्टिकोन स्पष्ट रीतीने मांडते. धर्मसंप्रदायांचे आपसातील हिंसक विग्रह टाळण्याचा आणि शेजारधर्माने चिरकाल शांतिमय जीवन जगण्याचा प्रयोग यशस्वी रीतीने हिंदू समाजाने केलेला आहे असे हिंदू धर्माचा इतिहास सांगतो" (पृ. ७) गीतेविषयी ते म्हणतात - "सर्व धर्मांचा महासमन्वय करणारे तत्त्वज्ञान प्रथम भगवद्गीतेने सांगितले आहे." (पृ. ९) वैश्विक दृष्टिकोन स्वीकारल्याशिवाय असे सर्वसमावेशक-व्यापक-तत्त्वज्ञान मांडता येत नाही हे उघड आहे. "ईशावास्यमिदं सर्वम् ।", "सर्वं खल्विदं ब्रह्म ।"; "वासुदेवः सर्वम् ।" इत्यादी सिद्धान्तांमधून आणि विश्वात्मक ईश्वराच्या संकल्पनेमधून हा व्यापक दृष्टिकोन वेदांपासून भागवत धर्मापर्यंत अखंडितपणे मांडलेला आढळतो. माणसाने स्वार्थावर मात करून परार्थाची व त्याहीपुढे जाऊन परमार्थाची साधना करावी हा त्यामागील हेतू त्याच्याही मुळाशी आहे. औपनिषदिक श्रेय-प्रेय-विवेक या विवेकावरच अधिष्ठित आहे 'आनंदमीमांसा'. तिचेच आचारनियमनाच्या अंगाने अभिव्यक्त झालेले रूप म्हणजे 'धर्म'. या दृष्टीने तर्कतीर्थांची 'आनंदमीमांसा' ही हिंदूंच्या वैश्विक 'धर्मा'च्या अधिष्ठानाची मीमांसा आहे असे मी मानतो. तिचे मूलभूत सूत्र आहे - "को जीवेत् कः प्राण्यात्, यद्येष आकाशे आनंदो न स्यात् ।" "आनंदाचे आवारू मांडूं जगां" किंवा "आनंदें भरीन तीन्ही लोक" या संतश्रेष्ठ ज्ञानेश्वरांच्या वचनांमधून भागवतधर्माचे प्रयोजन व्यक्त होते. त्यासाठी "जें जें भेटें भूत । तें तें मानिजे भगवंत ।।" अशा 'सर्वभूतहिते रत' राहण्याची शिकवणही तो देतो. "सणुं भोगिजे सणें विश्वाचेनी" या उद्देशाने ज्ञानेश्वरांनी विश्वात्मक देवालाच मागितलेले पसायदान हा हिंदूंच्या धर्मभावनेचा सर्वश्रेष्ठ आविष्कार होय.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या धर्मचिंतनाच्या स्वरूपाचा शोध घेऊन त्यापासून कोणता बोध होतो हे यथामति दर्शविण्याचा प्रस्तुत निबंधात प्रयत्न केला आहे. त्यावरून त्यांचे धर्मचिंतन किती प्रामाणिक, मौलिक, व्यापक व मर्मग्राही आहे याची आपणास कल्पना येते. त्या निमित्ताने माझ्याकडूनही 'धर्मकीर्तन' घडले. त्याचे श्रेय परिसंवादाचे संयोजक, विशेषतः डॉ. जोशी, यांना आहे; तसेच ते आपणा सर्व सहृदय अभ्यासकांनाही आहे. म्हणून ज्ञानेश्वरांच्या समर्थ शब्दांत माझी भावना व्यक्त करून निबंधाला पूर्णविराम देतो.

"किंबहुना तुमचें केलें । धर्मकीर्तन हें सिद्धी नेलें ।
येथ माझें जी उरलें । पाईकपण ।।" इति शम् ।



**धर्मात बदल नको, जीवनात हवा !**

हिंदुस्थान पाहायला आलेले एक अमेरिकन प्रवासी शृंगेरीपीठाचे शंकराचार्य श्रीचंद्रशेखर भारतीस्वामी यांना नुकतेच भेटले. त्या अमेरिकन प्रवाशाची हिंदु धर्मात यायची इच्छा होती. त्याबाबत शंकराचार्यांनी त्यांना जो सल्ला दिला त्यावरून धर्मांतर करण्याबाबत हिंदुधर्माची भूमिका स्पष्ट होते. त्यांचा झालेला संवाद संक्षेपाने पुढे दिला आहे :

अमेरिकन - परधर्मीयांना तुम्ही हिंदू धर्मात का घेत नाही? तुमचा धर्म किती छान आहे ! तुम्ही 'हो' म्हणा, मी आज हिंदू व्हायला तयार आहे.

शंकराचार्य - धर्मांतर करायची तुम्हाला जरूरच काय? ख्रिस्त धर्म काय वाईट आहे?

अमेरिकन - (अनपेक्षित उत्तराने गोंधळून जाऊन) ते मला नाही सांगता येत. पण मला तरी ख्रिस्त धर्माने समाधान मिळालेले नाही.

शंकराचार्य - असं असेल तर दुर्दैव खरं ! पण मला सांगा की ख्रिस्ताचा धर्म खरा समजून घ्यायचा, त्याप्रमाणे जीवन जगायचा तुम्ही खरोखरी प्रयत्न केला आहे का?

अमेरिकन - तसा मी प्रयत्न केला आहे असे म्हणता येणार नाही.

शंकराचार्य - मग माझा तुम्हाला सल्ला असा की, तुम्ही पहिल्यांदा खरे ख्रिस्ती बना, ख्रिस्ताच्या वचनाप्रमाणे जीवन जगा. परिवर्तनाची जरूर आहे खरी. पण ती धर्माच्या परिवर्तनाची नव्हे तर जीवनाच्या परिवर्तनाची आहे.

अमेरिकन - (हर्षाने) मग तुमच्या हिंदू धर्माची अशी शिकवण आहे तर, की ख्रिश्चनाने चांगला ख्रिश्चन बनावे, मुसलमानाने चांगला मुसलमान बनावे, बौद्धाने चांगला बौद्ध बनावे ! आज तुमच्या हिंदू धर्माच्या एका निराळ्याच उदात्त तत्त्वाचे मला भव्य दर्शन झाले आहे. दे दर्शन आपण करून दिल्याबद्दल धन्यवाद.

वरील संवाद 'हरिजना'च्या संपादकांनी देऊन पुढे म्हटले आहे की, धर्मांतराबाबत गांधीजींची भूमिका अशीच होती.

'हरिजन' - (२१-११-५३ वरून संक्षिप्त)
(नवभारत १९५४)

# प्राज्ञपाठशाळा

ब्र. केवलानंद सरस्वती ह्यांनी काही विशिष्ट उद्दिष्टे स्वीकारून प्राज्ञपाठशाळा मंडळाची स्थापना केली होती. पारंपरिक पाठशाळांहून वेगळ्या स्वरूपाची अशी ही पाठशाळा होती. भारतीय शास्त्रे आणि दर्शने ह्यांच्या अध्ययन-अध्यापनाची परंपरा टिकवून धरावी आणि तिला उजाळा द्यावा हे मंडळाचे एक उद्दिष्ट होतेच, पण त्यावरोबरच आधुनिक, मानवतावादी मूल्यांना अनुसरून हिंदू धर्माच्या प्रचलित स्वरूपात परिवर्तन घडवून आणावे, हिंदू धर्माच्या विशाल आणि दीर्घ परंपरेत ह्या मूल्यांना दृढ असे अधिष्ठान आहे हे दाखवून देऊन, इष्ट आणि आवश्यक अशा सामाजिक सुधारणा स्वीकारण्यासाठी, जनमत अनुकूल करून घेण्यासाठी, सातत्याने प्रयत्न करावेत हेही मंडळाचे प्रमुख उद्दिष्ट होते. आधुनिक काळाला अभिमुख अशी ही पाठशाळा होती आणि आहे. परंपरा आणि आधुनिकता ह्यांचा समन्वय साधण्याचा तिने सातत्याने प्रयत्न केला आहे. भारतीय विद्यांच्या क्षेत्रात चोखपणे अध्यापन संशोधन करण्यावरोबरच सर्वसामान्य जनतेचे प्रबोधन करणे हेही स्वतःचे कार्य म्हणून तिने स्वीकारले आहे.

मंडळाचे संस्थापक ब्र. केवलानंद सरस्वती ह्यांनी आणि त्यांच्यामागून मंडळाचे अध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी व प्रा. मे. पुं. रेगे ह्यांनी त्याच्या ह्या द्विविध स्वरूपाचा समर्थपणे विकास केला. स्वातंत्र्यपूर्व काळात शास्त्रांचे अध्ययन, अध्यापन चालू असतानाच मंडळाच्या अध्यापक विद्यार्थ्यांनी स्वातंत्र्याच्या आणि समाजसुधारणेच्या आंदोलनात सक्रिय सहभाग घेतला. धर्मपरिवर्तनाशी संबंधित असलेल्या वैचारिक मंथनात मंडळ अग्रेसर होते. अस्पृश्यतेच्या रूढीचे निराकरण करण्यासाठी गांधीजींनी सुरू केलेल्या आंदोलनात तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी प्रमुख धार्मिक सल्लागार होते.

संशोधनाच्या क्षेत्रात तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या नेतृत्वाखाली धर्मकोश हा प्रचंड प्रकल्प मंडळाने १९३१ साली हाती घेतला. धर्माच्या विविध अंगांचा विकास कसा होत गेला आणि त्यात परिवर्तन कसे होत गेले ह्याची ऐतिहासिक रूपरेखा स्पष्ट करणे हे धर्मकोशाचे उद्दिष्ट आहे. वेदापासून सोळाव्या शतकातील निबंधापर्यंतच्या सर्व उपलब्ध प्रमाणग्रंथातून संबंधित वेचे निवडून, त्यांची कालक्रमाने मांडणी करून, धर्माचा इतिहास धर्मकोशात साक्षात उभा करण्यात आला आहे. सुमारे ३५ शतकांचा हा कालखंड आहे. धर्मकोशाची ११ कांडे संकल्पलेली आहेत, आणि ४ प्रसिद्ध झाली आहेत. धर्मकोशाला आंतरराष्ट्रीय ख्याती आणि प्रतिष्ठा लाभली आहे.

आतापर्यंत प्राज्ञपाठशाळामंडळाने हिंदू धार्मिक परंपरेमध्ये संशोधन केले आहे. ह्या कार्यक्षेत्राचा विस्तार करून बौद्ध, मुस्लिम, ख्रिस्ती, शीख, जैन इत्यादी इतर भारतीय धार्मिक परंपरांचाही मानवतावादी मूल्यांच्या दृष्टिकोणातून अभ्यास करण्यात यावा आणि सर्वधर्मसमभावाच्या दृष्टिकोणाचा जनतेमध्ये प्रसार करण्यासाठी प्रयत्न करावेत असा निर्णय समितीने घेतला. त्यासाठी प्राज्ञ शोध संस्थेमध्ये सर्व धर्म अध्ययन केंद्र स्थापन करण्यात आले आहे.

### नवभारत मासिक

ह्यावरोबरच समाजापुढे असलेल्या सांस्कृतिक, आर्थिक, राजकीय इ. समस्यांची मोकळेपणे चर्चा करणारे व्यासपीठ म्हणून 'नवभारत' हे मासिक मंडळाने गेली ४८ वर्षे आर्थिक झीज सहन करीत चालवले आहे.

गेली काही वर्षे नवभारताला आर्थिक अडचणींना तोंड द्यावे लागत आहे. त्यामुळे अंक नियमितपणे प्रसिद्ध करणे जड जाऊ लागले. तथापि शक्य होईल तसतसे अंक प्रसिद्ध करून अंकांचा अनुशेष भरून काढला जात आहे.

नवभारताच्या अडचणीच्या काळातही कला-साहित्य-विचार इ. क्षेत्रांतल्या ज्येष्ठ आणि थोर व्यक्ती आपले सहकार्य अत्यंत आस्थेने आणि निरपेक्षपणे देत आहेत.

**'या अंकाच्या मागील पृष्ठावरील आवाहन पाहावे.'**






आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

# प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

सुधारित किंमत :
१ एप्रिल १९९७
पासून लागू

| | |
|---|---|
| ☐ **वैदिक संस्कृतीचा विकास** (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु. |
| ☐ **अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर** (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु. |
| ☐ **पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास** । डॉ. सुमंत मुरंजन | ६० रु. |
| ☐ **हिंदी साहित्यविचार** । प्रा. प्यारेलाल गोहेल | ५ रु. |
| ☐ **श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ** | ६० रु. |
| ☐ **संशोधन साधना** । डॉ. वसंत स. जोशी | ४० रु. |
| ☐ **तरंगयामिक व पुंजयामिक** । मा. ग. टोळे | १० रु. |
| ☐ **आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास** । ऋग्वेदी | ८० रु. |
| ☐ **वागीश्वरी** । डॉ. गो. के. भट | ४० रु. |
| ☐ **प्रस्थानभेद** (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. वा. लेले | २५ रु. |
| ☐ **गिर्यारोहण परिचय** । अच्युत खोडवे | १० रु. |
| ☐ **इतिहासाचे तत्त्वज्ञान** (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | ८० रु. |
| ☐ **दासशूद्रांची गुलामगिरी** (भाग २) । शरद पाटील | १०० रु. |
| ☐ **शाहीर हैबती** । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु. |
| ☐ **गीताचिकित्सा** । भाऊ धर्माधिकारी | १०५ रु. |
| ☐ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी** (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु. |
| ☐ **बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार** । प. ल. वैद्य | ३० रु. |
| ☐ **हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन** (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु. |
| ☐ **पाच पुस्तक-परीक्षणे** । वा. म. कुलकर्णी | ४० रु. |
| ☐ **भेदविलोपन : एक आकलन** । अशोक केळकर | २० रु. |
| ☐ **कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य** । रा. भा. पाटणकर | ८० रु. |
| ☐ **धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार** । दि.के. बेडेकर | १५ रु. |
| ☐ **आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार** | १०० रु. |
| ☐ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार** | १५० रु. |
| ☐ **इहवाद आणि सर्वधर्मसमभाव** । मे. पुं. रेगे | ८० रु. |
| ☐ **प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा** | २०० रु. |
| ☐ **चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान** (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | ८० रु. |
| ☐ **विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे** (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु. |
| ☐ **नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन** । द.ना. धनागरे | ४० रु. |
| ☐ **प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती** (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु. |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता* : **चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)**

अनुक्रमणिका








## आवाहन

अध्ययन अध्यापनात आणि संशोधनात मग्न असलेली संस्था एवढेच प्राज्ञपाठशाळेचे स्वरूप कधीही नव्हते. हिंदू धर्माचे जे पारंपरिक स्वरूप होते, धर्माविषयीच्या ज्या कल्पना लोकांच्या आचारविचारांत मुरलेल्या होत्या आणि ह्या कल्पनांवर आधारलेल्या ज्या रूढ सामाजिक प्रथा होत्या, त्यात सुधारणा घडवून आणण्याची निकड स्वामीजींना, त्यांचे सहकारी आणि शिष्यपरिवार ह्यांना सतत तीव्रतेने जाणवत होती. ह्या शिष्यपरिवारात आणि सहकाऱ्यांत तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी प्रमुख होते हे प्रसिद्धच आहे. ही धर्मसुधारणा आणि समाजसुधारणा त्यांना मानवतावादी मूल्यांच्या आधारे घडवून आणायची होती. मानवी समता, व्यक्तिस्वातंत्र्य, माणसाच्या ऐहिक उत्कर्षाचे स्वयंभू महत्त्व, करुणा इ. मूल्यांच्या अधिष्ठानावरच निकोप अध्यात्मिक आणि ऐहिक जीवन उभारता येते अशी ह्या विद्वानांची श्रद्धा होती. ह्या मूल्यांना अनुसरून धार्मिक आणि सामाजिक सुधारणा घडवून आणण्यासाठी लोकशिक्षण करण्याचे कार्य प्राज्ञपाठशाळेने प्रारंभापासून हाती घेतले होते. उदा. स्वामीजी आणि शास्त्रीजी ह्यांनी धर्मपरिवर्तनवादी दृष्टिकोण प्रभावीपणे मांडण्याच्या उद्देशाने अनेक धर्मपरिषदांत भाग घेतला. स्वामीजींच्या सूचनेनुसार गांधीजींच्या अस्पृश्यता निवारणाच्या कार्यात शास्त्रीजींनी त्यांचे प्रमुख धर्मशास्त्रज्ञ सल्लागार ही भूमिका पार पाडली. तेव्हा ह्या स्वरूपाचे विस्तारकार्य (एक्स्टेन्शन वर्क) हे प्राज्ञपाठशाळेच्या कार्याचे प्रथमपासूनच महत्त्वाचे अंग होते.

प्राज्ञपाठशाळेच्या अध्ययन-अध्यापन-संशोधन व समाजपरिवर्तनासाठी जनप्रबोधन अशा दुहेरी कार्यक्रमातील दुसऱ्या विभागातील कार्यात 'नवभारत' अग्रेसर राहिले आहे. 'नवभारत' - विचारधारेचा प्रवाह पुढील अंगांनी विकसित करता आला तर पाहावयाचे आहे. या दृष्टीने दोन कार्यक्रम आयोजित केले जातील.

१. 'नवभारत'मध्ये नेहमीच्या पद्धतीचे लेखन तर येत राहीलच परंतु तिशीच्या आसपास असणाऱ्या प्रौढ युवागटातून लेखक आणि लेखन शोधण्याचा विशेष प्रयत्न केला जाईल. असे लेखन पाठवताना झेरॉक्स प्रत मात्र स्वतःकडे ठेवावी. लेखन मिळाल्याचे कळवले जाईल व त्या दिवसापासून दोन आठवड्यात त्याविषयी निर्णय कळवला जाईल. लेखकाशी प्रत्यक्ष चर्चा करणे आवश्यक आहे असे वाटल्यास सातारा येथे येण्याजाण्याचा खर्च दिला जाईल.

२. आज अनेक समस्या खदखदत आहेत. त्याविषयी आपल्याला नवे वेगळे असे काही म्हणावयाचे आहे असे वाटणारे विचारवंतही आहेत. त्यांनीही वरील पद्धतीने आपले लेखन पाठवावे. कितीही सविस्तर चालेल. उभयपक्षी उचित वाटल्यास ते लेखन नवभारतमध्ये प्रसिद्ध केले जाईल व त्यासाठी सुमारे आठ-दहा जणांची दोनतीन दिवसांची एक सकस चर्चा बैठकही वाई किंवा सातारा येथे आयोजित करता येईल. याचा खर्च लेखकावर पडणार नाही याची दक्षता घेतली जाईल.

प्रायोगिकरीत्या हे कार्यक्रम २००५ डिसेंबर अखेरपर्यंत राबवले जातील.

याविषयी सर्व संपर्क माझ्याशीच साधावयाचा आहे.

**- देवदत्त दाभोलकर**

'शान्तिनिकेतन' ४३, गुरुकृपा हौसिंग सोसायटी, शाहूनगर, गोडोली

सातारा शहर - ४१५००१. फोन - (०२१६२) २२०३७८, २२०६५९

हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




अनुक्रमणिका



